# साहित्य आणि संस्कृति

[ आचार्य शं. द. जावडेकर यांच्या प्रस्तावनेसह ]

: ले ख क :

दु. का. संत, एम. ए.

मराठीचे प्राध्यापक

र. प. गोगटे कॉलेज, रत्नागिरी.

मूल्य तीन रुपये

प्र का श क

श्री. दु. का. संत,
पाध्ये यांचा बंगला,
शिवाजीनगर, रत्नागिरी.



अधिकृत विक्रेते—
रामकृष्ण बुक डेपो
गिरगांव, मुंबई नं. ४.

प्रथमावृत्ति ऑगस्ट १९५०

मुद्रक

(१) ना. कुं. धूत नव-राजस्थान प्रेस, ( इतर सर्व मजकूर ) पुणें २.
(२) व. शां. कडूसकर कल्पना आर्ट प्रेस, ( पृ. १ तें ८० ) पुणें २.
(३) कव्हर, अर्पण पत्रिका, न्यू जॅक प्रिंटिंग वर्क्स, मुंबई १३.

# निवेदन

## भूमिका—

साहित्य आणि संस्कृति यांच्या परस्पर संबंधाविषयींचें हें विवेचन आहे. मनुष्याने जी संस्कृतीची साधना केली आहे, त्या साधनेंत सर्वांत महत्त्वाचें असें जें मूल्यरूपी धन, तें निर्माण करण्यात व जतन करण्यात साहित्याचें कोणतें साहाय्य झालें, आणि तें साहित्याने कसें केलें, तें करीत असतांना त्याच्याहि स्वरूपात व तसेंच सौंदर्य भावनेंत कसा कसा बदल संस्कृति-विकासाबरोबर झालेला आहे, ह्याचें लेखकाला अभिप्रेत असणाऱ्या दृष्टिकोणातून येथे दिग्दर्शन केलें आहे. विवेचनात उणीवा आहेत याची जाणीव लेखकाला आहे. गेल्या पाच सहा वर्षांतून कॉलेजात अध्यापन हा व्यवसाय निश्चित झाला असें दिसतें. तरी इतर प्रकारची अनिश्चितता असल्याने पानोपानीं आधार, अवतरणें इ. देऊन विवेचन अधिक परिपूर्ण करता आलें नाही. शिवाय दोन अडीच वर्षे वाट पाहून अखेर लेखकालाच प्रकाशनाचें धाडस करावें लागलें आहे! पांडित्याचें दर्शन घडविण्यापेक्षा विशिष्ट दृष्टिकोणांतून मांडणी हेंच उद्दिष्ट होतें. संस्कृति नि साहित्य यांचे अभ्यासक ह्या प्रयत्नाचें योग्य ते परिशीलन आणि स्वागत करतीलच.

## ऋणनिर्देश—

प्रस्तावनालेखक आचार्य जावडेकर यांचे मी अगदी मनःपूर्वक आभार मानतों. त्यांचा माझा व्यक्तिगत परिचय नसतां, केवळ पत्रद्वारें केलेल्या विनंतीनुसार त्यांनी ह्या पुस्तकास जी विवेचक प्रस्तावना दिली आहे तीबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. विशेषतः प्रकृति अस्वास्थ्याला न जुमानता त्यांनी ती दिलेली आहे, आणि त्यामुळे त्यांच्या ह्या ऋणाने मी अधिकच भारावून गेलों आहें. अनेक ग्रंथकारांचा पण मी आभारी आहें. कांहींचा उल्लेख विवेचनाच्या ओघात आलेला आहेच. कांहींचा साधन-ग्रंथांचे यादीत समावेश केला आहे. बन्धु प्रा. शि. का. संत यांचाहि येथे आवर्जून उल्लेख

करतों. मुखमुद्राची, अर्पणपत्रिकेची कल्पना, इतर साहाय्य नि उत्तेजन त्याचेंच आहे. घरच्या माणसाचेंच आभार मानणें चमत्कारिक वाटतें, म्हणून नुसत्या उल्लेखावर भागवितों. मित्र. प्रा. स. रा. उर्फ शाम गाडगीळ ह्यांचाहि उल्लेख करणें आवश्यक आहे. आम्ही दोघांनी ह्या विषयावर वेळोवेळी इतकी चर्चा केली आहे की, कोणते विचार माझे नि कोणते त्यांचे हें कळणें अशक्य झालें आहे. आणि म्हणून ते उजेडांत येत असताना त्यांचा निर्देश न करणें अयोग्य होईल. गुरु. डॉ. वाटवे यांनी आपल्या ग्रंथांतील उतारा घेण्याची आनंदाने नि सत्वर परवानगी दिल्याबद्दल त्यांचा पण मी ऋणी आहे. मित्र स. मा. गर्गे यांनी आपल्या छापखान्यांत पुस्तकाचा उर्वरित भाग छापायला घेऊन जे साहाय्य केलें त्याबद्दल त्यांचेहि मी आभार मानतों.

अशा प्रकारचा विचारप्रधान ग्रंथ प्रकाशित करण्याचा लेखकाचा पहिलाच प्रयत्न आहे.गेली दोन अडीच वर्षे प्रकाशनाची वाट पाहात असलेलें हें लेखन आज प्रकाशात येत आहे ह्याबद्दल समाधानहि होत आहे.

रत्नागिरी,
२५ ऑगस्ट, ५०

—दु. का. संत

---

## अनुक्रम

# प्रस्तावना



'साहित्य आणि मस्कृति' या विषयावरील श्री संत याचें हे पुस्तक वाचून मला फार समाधान झाले. आज साहित्यासबंधी अनेक वाद आणि अनेक तात्त्विक उपपत्ति समाजापुढे माडण्यात येत आहेत साहित्य-क्षेत्रांत फार मोठचा घडामोडी होत असल्याचें हे एक स्पष्ट चिन्ह आहे. या साहित्य-क्षेत्रातील घडामोडीचें आद्य कारण मानवी संस्कृतींतील घडामोडीत आणि त्या घडामोडीमुळे मानवी जीवनात घडून येणाऱ्या क्रांतिकारक परिवर्तनांत आहे. श्री. संत यानी या पुस्तकांत सास्कृतिक क्रांति घडल्यामुळें साहित्यांत क्रांतिकारक बदल घडून येत असल्याचे ऐतिहासिक दृष्टीने दाखवून दिले आहे. ज्या ज्या वेळी मानव संस्कृतीत आमूलाग्र क्रांति घडून आली त्या त्या वेळी मानवी जीवनांत आणि मानवी जीवनाचें प्रतिबिब ज्यामध्यें पडतें अशा साहित्यांतहि क्रांतिकारक बदल झाल्याचे दिसून येतें. आज मानवसमाज अशाच एका क्रांतिकालांत वावरत असून या सर्वांगीण क्रांतीचें स्वरूप काय असेल, अथवा असावे, या सर्वांगीण सामाजिक क्रांतीमुळे मानवाच्या जीवन-मूल्यात कोणते फेरबदल घडून येत आहेत अथवा यावेत आणि मानवी जीव-नाच्या मूल्यांतील हें मूलभूत परिवर्तन घडून आल्याचे परिणाम साहित्य-क्षेत्रात कशा प्रकारचे घडत आहेत, घडणार आहेत, आणि घडणें इष्ट आहे या विषयासबंधीचे आपले विचार श्री. संत यानी या पुस्तकांत विशद केलेले आहेत. मानवी सस्कृतीच्या इतिहासाकडे पाहण्याचा आणि आजच्या युगांतील सास्कृतिक घडामोडीकडे पाहण्याचा त्यांचा विशिष्ट दृष्टिकोण आहे. मला असें वाटतें की, हा त्यांचा दृष्टिकोण आजच्या युगांतील आधुनिक बुद्धिमंताना सामान्यतः ग्राह्य होण्यासारखा आहे.

मानवसमाजात आज जी क्रातिकारक आंदोलने चालू आहेत त्यामुळे आजपर्यंत जे निरनिराळे संस्कृतीचे नमुने मानवाने निर्माण केले ते सर्व वितळून जात असून मानवसंस्कृतीला एक नवा सर्वमान्य असा आकार येईल अथवा ही मानवसंस्कृति या संघर्षात नष्ट तरी होईल. आजपर्यंत मानवसमाजांत

अनेक संघर्ष निर्माण झाले, पण, त्यापैकीं कोणत्याहि संघर्षाला जागतिक स्वरूप येऊ शकले नाही. आज अशा प्रत्येक संघर्षाला जागतिक स्वरूप येत आहे. मानवाची दळणवळणाची साधनें इतकी वाढलेली आहेत की, निरनिराळ्या समाजातील स्थलकालाचे अंतर नष्ट होत आहे. त्याचप्रमाणें मानवाची संहारसाधनें इतकी वाढलेली आहेत, की, सर्व मानवजात अक्षरशः नष्ट करणें ही गोष्ट अगदी व्यवहार्य बनली आहे. हे जें मानवाचें सामर्थ्य इतक्या प्रचंड प्रमाणात वाढले त्याचे बहुतेक श्रेय त्याच्या भौतिक विद्येतील प्रगतीलाच दिले पाहिजे. पण या भौतिक विद्येतील प्रगतीमुळे मानवाचा संहारकाल निकट यावा असा काही त्या विद्येचा अंगभूत गुण नाही. भौतिक विद्या ही मानवाचा संहार करीत नसून मानव हा भौतिक विद्येच्या साहाय्यानें स्वतःच्या जातीचा संहार करीत आहे. आणि हे कर्म तो संहाराचा हेतु स्पष्टपणे दृष्टीपुढे ठेवून करीत नाही. मानवी संस्कृतीतील द्वैत नष्ट करावे, सर्व मानवाचें एकराज्य निर्माण करावे, आणि त्याची एक संस्कृति स्थापावी हीच त्याची उद्‌घोषित ध्येयें आहेत. या ध्येयासाठी तो अनेक संस्थांच्या मार्फत प्रयत्न करीत आहे. मात्र या सर्व प्रयत्नांचा परिणाम त्या ध्येयांच्या दिशेने होत नसून काही तरी विपरीत घडत आहे. हा विपरीत परिणाम कसा टाळावा आणि मानवतेचे सत्ययुग कसे निर्माण करावें हाच आजच्या मानवापुढे एकमेव प्रश्न आहे. या प्रश्नांची उत्तरे देण्याच्या प्रयत्नांतून आज अनेक वाद निर्माण झालेले आहेत. त्यापैकी समाजवाद आणि सर्वोदय हे दोन प्रमुख आहेत. आज ज्या घडामोडी समाजघटनेत होत आहेत, त्यांना समाजवादी स्वरूप येणार आहे व येणे इष्ट आहे असा दृष्टिकोण या पुस्तकात गृहीत धरलेला आहे व तो सामान्यतः मला मान्य आहे. आजच्या समाजांत एक सर्वांगीण सामाजिक क्रांति घडत असून तिचा आकार समाजवादी आणि लोकशाही या स्वरूपाचा बनला पाहिजे असे वाटणाऱ्यांचे असे म्हणणें आहे की, मानवसमाजाला असा आकार दिल्यानेंच मानवाच्या जीवनाचा सर्वांगीण विकास आज होऊ शकेल, आणि त्याला आपल्या जीवनाचा आदर्श प्राप्त करून घेण्याची जी सनातन तळमळ आहे ती या समाजरचनेखाली अधिकाधिक तृप्त होऊ शकेल.

येथे असा प्रश्न उपस्थित होतो की, आपल्या जीवनाला आदर्श स्वरूप

प्राप्त व्हावें ही जी मानवाची तळमळ आहे त्या तळमळींतून आजपर्यंत कोणते आदर्श निर्माण झाले व यापुढे कोणते आदर्श निर्माण होऊ शकतील. शिवाय मानवी जीवनाचा आदर्श हा एकच व सनातन आहे की, त्याची विविध स्वरूपें असून ती निरनिराळ्या काळी निरनिराळ्या प्रकाराने व्यक्त होतात. सामान्यतः ऐतिहासिक दृष्टीने पाहू गेल्यास आपणास असे दिसून येईल की, मानव समाजाला कृषि-अवस्था प्राप्त झाल्यानतर आधुनिक कालात ज्याला भौतिक सस्कृतीचें युग असें म्हणतात तो काल प्राप्त होईपर्यंत मानवी जीवनाचे विशिष्ट आदर्श निर्माण होऊन ते स्थिरस्वरूपी बनले होते. अशा आदर्शात ऋषि आणि राजे त्याचप्रमाणे ऋषिपत्नी आणि राण्या असे द्विविध आदर्श सामान्य मानवाच्या मनःचक्षूपुढे वावरत होते. हे जे मानवांचे आदर्श तेच उच्च गणलेल्या साहित्याचेहि विषय बनले होते. आपल्या सस्कृत वाङ्मयांतील व्यास-वाल्मीकिपासून कालिदास-भवभूतिपर्यंतच्या कवींनी या आदर्शाचें विविध रूपानी वर्णन केलेलें आहे सामान्यतः मध्ययुगाचा अंत होईपर्यंत हेच आदर्श मानवापुढे होते असे म्हणण्यास हरकत नाही समाजातील श्रेष्ठ गणलेल्या वर्गातील या आदर्शाचें चितन सामान्य जनतेने करावें आणि त्याच्या गुणगानांत व सेवेंत तल्लिन राहावें अशा प्रकारची एक समाजरचना या कालात बहुतेक सर्व देशात रूढ झालेली होती. हिंदु संस्कृतीने वर्णाश्रमधर्म या नांवाने या समाजरचनेचें गुणगान केलेले आहे. ख्रिस्ती व इस्लामी सस्कृतीनीहि मध्ययुगाच्या अतापर्यंत सामान्यतः अशाच प्रकारच्या समाजरचनेला व मानवी जीवनाच्या आदर्शांना थोड्याफार फरकाने धर्माचा आधार दिलेला होता. धर्माने व तत्त्वज्ञानाने मान्यता दिलेली चातुर्वर्ण्य सस्था हिंदूनी जन्मसिद्ध बनवून तिच्यात जातिभेदाचे दृढ बधन निर्माण केले यामुळे या वर्णाश्रमधर्माची चौकट त्याना पारतत्र्य प्राप्त होईपर्यंत मोडता आली नाही. मुसलमान व ख्रिस्ती धर्माने आपल्या समाजातील चातुर्वर्ण्याला जन्मसिद्ध बधनाचे इतके दृढ आवरण घातले नव्हते. यामुळे हिंदु-संस्कृतीची वाढ खुटल्यानतर पुढे बराच काळ मुसलमान व ख्रिस्ती सस्कृतीत वाढलेल्या समाजाची वाढ होत राहिली. तरीहि आधुनिक भौतिक शास्त्रांत प्रगती होऊन सृष्टीच्या भौतिक घटनेचे ज्ञान होईपर्यंत एक प्रकारचे चातुर्वर्ण्य सर्वच समाजात रूढ होते. कोठे ते जन्मसिद्ध असेल तर कोठे त्यात गुणकर्मानुसार

व्यक्तीला वर्णांतर करण्याची थोडीफार मुभा असे. परंतु जोपर्यंत भौतिक विद्येच्या वाढीमुळे मनुष्याची उत्पादनशक्ति कृषि-संस्कृतीच्या पलीकडे गेली नव्हती तोपर्यंत ही चातुर्वर्ण्याची चौकट मोडण्यास फारसे कोणालाच यश आलें नाही. या समाजरचनेत सामाजिक विषमता ही समाजस्थैर्याला आधारभूत अशी गणली गेली होती. त्याचप्रमाणे समाजांतील आर्थिक, राजकीय व सामाजिक सर्व प्रकारच्या व्यवहारावर धर्माचें नियंत्रण बसविलेले होते. समाजातील व्यक्तीचा कोणताहि व्यवहार धार्मिक नियत्रणापासून मुक्त नव्हता. आणि सामाजिक, राजकीय व आर्थिक व्यवहारांची उभारणी विषमतेवर केलेली असणे हेच नैसर्गिक, न्याय्य अथवा ईश्वरनियोजित तत्त्व होय अशी श्रद्धा त्या वेळच्या समाजात, सामान्य जनतेत, रूढ होती.

या विषमता-मूलक मानवी व्यवहाराना एक अपवाद होता. तो अपवाद म्हणजे मानवाचे आत्मोन्नतीचे क्षेत्र. सामाजिक व्यवहारात नैसर्गिक व न्याय्य मानलेली विषमता आध्यात्मिक क्षेत्रातून नाहीशी करण्याचा प्रयत्न अनेक धर्मसंस्थापकानी वा धर्मपुरुषांनी केलेला होता. श्रीकृष्ण, गौतम बुद्ध, येशु ख्रिस्त व महमद या सर्वांनी या आध्यात्मिक क्षेत्रातील समानतेला मान्यता दिलेली आहे पण त्यांनी संस्थापन केलेल्या किंवा त्यांच्या नावाने चालू असलेल्या कोणत्याहि धर्माने ही आध्यात्मिक क्षेत्रातील समता व बधुभावना सामाजिक, आर्थिक व राजकीय क्षेत्रात प्रविष्ट करण्यांत यश मिळविले नाही. या बाबतींत आधुनिक युरोपांत जी नवी संस्कृति निर्माण झाली तिने लोकशाही व समाजवाद या ध्येयाचा पुरस्कार करून पूर्वीच्या धर्मसंस्थापकानी केवळ आध्यात्मिक क्षेत्रात संस्थापन करण्याचा प्रयत्न केलेली समता सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहारात आणण्याचें ध्येय आधुनिक मानवापुढे ठेविलेले आहे यामुळें कृषि-संस्कृतीच्या उदयापासून मध्ययुगाच्या अंतापर्यंत मानव संस्कृतीला जें एक स्वरूप प्राप्त झाले होते त्याहून भिन्न आणि अधिक श्रेष्ठ असे स्वरूप तिला प्राप्त करून देण्याची आकाक्षा आधुनिक मानवाच्या अंत.-करणात निर्माण झालेली आहे. आधुनिक संस्कृति व आधुनिक मानव यांचे हे एक वैशिष्टय आहे. समता संस्थापन करण्याच्या आपल्या ह्या उद्देशांत आपण यशस्वी होऊ असा आत्मविश्वास त्याला जो वाटत आहे त्याचे एक मुख्य कारण म्हणजे त्याला भौतिक विद्येच्या उपासनेमुळे जें भौतिक

सामर्थ्य लाभलेलें आहे तेंच आहे. पण या भौतिक सामर्थ्याचा उपयोग या नवसंस्कृतीच्या व नवमानवाच्या निर्मितीसाठी न करतां त्या सामर्थ्याचा उपयोग आज मानवाचा संहार करण्याच्या कामी होऊ लागला आहे.! हे पाहून आज नवसंस्कृतीच्या व नवमानवाच्या निर्मितिसंबंधीचा हा आत्म-विश्वास पुन्हा डळमळू लागलेला दिसत आहे.

यूरप खंडात सुमारे ३०० वर्षे स्वातंत्र्याची, सहिष्णुतेची आणि समतेची वाढ होत असल्याचा देखावा विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत दिसत होता. पण गेल्या तीस वर्षात दोन महायुद्धे होऊन सर्व खंडांत अग्रेसर बनलेलें युरोपखंड बेचिराख झालेले आहे. पहिल्या महायुद्धाच्या कालांत रशियांत जी क्रांति झाली तिच्यांतून सर्व मानवसमाजांत क्रांतीचा मार्ग उपलब्ध होईल आणि नवें जग निर्माण होईल अशी आशा कांही काळ वाटली. पण तीहि आशा आज दुरावली आहे. यामुळें मानवाला नवसंस्कृति निर्माण करण्याची आवश्यकता भासत आहे. हे खरे असले तरी त्या संस्कृति-निर्मितीचा मार्ग कोणता ह्यासंबंधीचा निर्णय आज एकमताने देतां येत नाही अशा एका संधिकालात आपण आहोंत. जुन्या संस्कृती टिकू शकत नाहीत याबद्दल फारसा मतभेद उरलेला नाहीं. पण नव्या संस्कृतीचा आधार कोणता याबद्दल मात्र तीव्र मतभेद आहेत. ज्या युरोपियनांनी गेली तीनशें वर्षे आधुनिक संस्कृतीची वाढ केली ते या ३०० वर्षात निर्माण केलेल्या आपल्या संस्कृतीत येशु ख्रिस्ताची जीवनमूल्ये अंतर्भूत झालेली आहेत असें सांगत आहेत. अमेरिकेत या आधुनिक यूरोपीय संस्कृतीची पूर्ण परिणती झालेली आहे असा अहंकार त्या राष्ट्रांना आहे. मात्र अमेरिकेच्या भांडवलदार संस्कृतीला येशु ख्रिस्ताने आपल्या जीवनात प्रकट केलेल्या जीवित-मूल्यांचा आधार आहे ही गोष्ट खुद्द यूरोपातील विचारवंतानाहि आज पटण्यासारखी नाही. तरी अमेरिका हे एक आजच्या जगातील प्रभावशाली राष्ट्र आहे. याच्या विरोधी अशी शक्ति केवळ रशियामध्यें आज दिसत आहे. पण ह्या रशियांत प्रकट झालेली क्रांतिशक्तीहि नवसंस्कृतीला कितपत आधारभूत होऊ शकेल याबद्दल विचारवंताना जबरदस्त शंका वाटत आहे. अशा वेळीं मानवी जीवनाचा आमूलाग्र विचार करून मानवाची जीवननिष्ठा तपासून पाहण्यावाचून अथवा तिच्यांत आमूलाग्र क्रांति घडविण्यावाचून दुसरा उपाय उरलेला नाही. ही

जीवननिष्ठेसबंधीची क्राति कशा स्वरूपाची होणार आणि त्या क्रातीनंतर मानव सस्कृतीला कोणतें स्वरूप प्राप्त होणार याचें उत्तर शोधण्याची आकांक्षा प्रत्येकास आज वाटली पाहिजे. अर्थात् या आकांक्षेचें प्रतिबिब साहित्यांत पडणें अवश्य व अपरिहार्य आहे

आजपर्यंत मानवाच्या समाजधारणेचा आणि जीवननिष्ठेचा विचार करून त्याचे मार्गदर्शन धर्माने केलेले आहे गेल्या एक दोन शतकांत धर्माने केलेले हे मार्गदर्शन मानवाला अपुरे, विकृत, अथवा प्रतिगामी भासू लागले आहे. यामुळें आपल्या अतःकरणाचे सार्वभौमत्व आधुनिक मानवाने धर्माकडून हिरावून घेतले आहे धर्माला पदच्युत केल्यानतर आपली जीवन-निष्ठा कोणाला अर्पण करावी असा प्रश्न उपस्थित केल्यास त्याला आधुनिक मानव असे उत्तर देऊ पाहात आहे की, ही माझी जीवननिष्ठा मी माझ्याहून इतर कोणालाहि अर्पण करणार नाही. मीच माझा ईश्वर आहे आधुनिक युगांत प्राप्त करून घेतलेल्या शास्त्रीय ज्ञानामुळे आधुनिक मानवाला हा आत्मविश्वास लाभलेला आहे मात्र हा आत्मविश्वास केवळ पोकळ अहंकार ठरता कामा नये. ज्ञान हाच मानवाचा विशेष आहे पण त्या ज्ञानाचाहि अहकार हा मानवाला अधोगतीस नेऊ शकतो आधुनिक काळांत पुष्कळ ज्ञानवृद्धि झालेली आहे पण ती सर्वांगीण नाही भौतिक ज्ञान, सामाजिक ज्ञान, आणि आत्मिक ज्ञान, अशी जर ज्ञानाची तीन क्षेत्रें कल्पिली तर त्यापैकी भौतिक ज्ञानांत गेल्या तीन शतकात फार मोठी भर पडलेली आहे. सामाजिक ज्ञानात किंवा समाजशास्त्रविषयक ज्ञानांत जी भर पडलेली आहे त्या सर्वाचे रहस्य लोकशाही व समाजवाद या दोन शब्दांत सामावून घेतां येण्यासारखे आहे. पण मनुष्याच्या मानसशास्त्रात व अध्यात्मशास्त्रांत या तीन शतकांत फारच थोडी प्रगति झालेली आहे हें विसरून चालणार नाही. पण मानस-शास्त्रात व आत्मशास्त्रांत प्रगति फारशी झालेली नाही हा खरा दोष नसून मनुष्याच्या जीवनाला व संस्कृतीला आवश्यक व आधारभूत अशी जी सामा-जिक शास्त्रे त्या सामाजिक शास्त्रांवर भौतिक शास्त्रीय विचारपद्धतीचा फार मोठा प्रभाव पडलेला आहे व पडत आहे, आणि त्या मानाने सामाजिक शास्त्रात मानस व आध्यामिक शास्त्रांना जें अग्रस्थान मिळावयास हवें तें मिळत नाही हा खरा दोष आहे. विश्वाच्या भौतिक घटनेची नियति भौतिक शास्त्रांनी

विशद केलेली आहे या भौतिक नियतीच्या ज्ञानाचा प्रभाव आधुनिक मानवाच्या मनावर एवढ्या मोठ्या प्रमाणावर पडलेला आहे की, या भौतिक नियतीच्या यत्राबाहेर पडण्याचे आपले सामर्थ्य तो विसरू लागला आहे भौतिक नियतीच्या यत्रातून तो बाहेर पडू लागला तर त्याचे पाय व त्याच्या शक्ति सामाजिक व आर्थिक नियतीच्या खोडयांत जखडल्या जातात. आज समाजाची घटना यत्रे निर्माण करून नवसमाजनिर्मितीचे प्रयोग करण्यावर मनुष्याचा विश्वास इतक्या मोठ्या प्रमाणावर बसू लागला आहे की, या सामाजिक घटनांचाच तो दास बनणार की काय अशी भीति उत्पन्न झाली आहे समाजवादी समाजशास्त्र व क्रांतिशास्त्र या नावाने जे विचार आज जगभर फैलावत आहेत त्या विचारांत या सामाजिक व आर्थिक दास्याचा धोका निर्माण झालेला आहे हें कोणत्याहि साहित्यभक्तास किंवा संस्कृतीच्या उपासकास विसरतां येणार नाही विश्वाला एक नियति आहे हा अनुभव व त्या नियतीचे ज्ञान यांत मानवाच्या प्रगतीबरोबर वाढच होणें साहजिक आहे. या अनुभवाच्या व ज्ञानाच्या आधारावरून तो अनेक शास्त्रे निर्माण करीत असतो ती शास्त्रे निर्माण करीत असताना त्याला असत्यातून सत्याकडे जावें लागतें, सत्यासत्यविवेक हा सर्व शास्त्राला आधारभूत असा विवेक आहे पण याच्या पुढें जाऊन त्या सत्यासत्य विवेकानतर त्याला सद्सद्विवेक करावा लागतो सत्यासत्यविवेक करणारी बुद्धि सद्सद्विवेक करूं लागली म्हणजे ती नैतिक व सामाजिक प्रश्न सोडवू शकते पण या नैतिक व सामाजिक प्रश्नाच्या उत्तरात त्याला आपल्या स्वतःच्या आत्मस्वरूपाचे प्रश्न आढळू लागतात या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी त्याला सद्सद्विवेकातून आत्मानात्म विवेकात जावे लागते माझे सुख कशात आहे? माझें खरे सुख कोणते व खोटे सुख कोणते? माझें चिरंतन सुख कोणते? आणि तात्कालिक सुख कोणते? या विचारातून तो अखेरीस माझें खरे स्वरूप कोणतें अथवा माझे आदर्श स्वरूप कोणते? व माझ्या आजच्या प्रत्यक्ष स्वरूपाहून तें किती भिन्न आहे? हे प्रश्न त्याला सतावू लागतात. यांतूनच अध्यात्मशास्त्राचा उगम होतो. हें अध्यात्मशास्त्र आणि नीतिशास्त्र ह्याना मानसशास्त्राचा आधार घ्यावा लागतो. पण ह्या तीनहि शास्त्रांत आधुनिक काळांत फारशी भर पडलेली नाही, यामुळें मानव संस्कृतीला आपली नवी रचना

करण्याच्या कामी त्यांचा व्हावा तसा उपयोग होऊ शकत नाही. केवळ भौतिक शास्त्रें मानवसंस्कृतीचें मदिर रचण्यास पुरेशी नाहीत. मानव संस्कृतीच्या नवनिर्मितीस अध्यात्मशास्त्र, नीतिशास्त्र, व मानसशास्त्र याचा आधार घेतलाच पाहिजे. आणि या शास्त्राचे स्वरूप अद्यापि आधुनिक शास्त्रीय अवस्थेला पोहोचलें आहे असे म्हणता येत नाही आमचे नीतिशास्त्र व अध्यात्मशास्त्र येशु ख्रिस्त, किवा गौतम बुद्ध याच्या पलीकडे फारसें गेलेले नाही. आणि त्याचे विचार आधुनिक कालात कसे अमलांत आणावेत याचे ज्ञानहि आम्हास बरोबर होत नाही. यामुळें मानवसस्कृतीची वाढ आज खुटू पाहात आहे. केवळ भौतिक विद्येच्या आधारावर हे कार्य तडीस जाणारे नाही, एवढी जाणीव ठेवून आज आपणांस पुढे पाऊल टाकले पाहिजे. मानवाने आपली जीवननिष्ठा धर्माला वाहिलेली होती, आज धर्म पदच्युत झालेला आहे व मानव आपल्या जीवनाची निष्ठा पुन्हा बनवीत आहे. या निष्ठेच्या स्वरूपावर त्याच्या संस्कृतीचें सर्व भवितव्य अवलबून आहे आणि अर्थातच त्याच्या साहित्याचेहि भवितव्य त्यावरच अवलबून आहे. मानवाची जीवननिष्ठा साहित्यात प्रतिबिबित झाली पाहिजे आणि ती सामान्य जनतेच्या अत:करणावर ठसविण्याचे कार्य साहित्याच्या उपासकानी केले पाहिजे हें मत या पुस्तकात लेखकाने निश्चितपणें प्रतिपादन केलेले आहे व त्याशी मी सहमत आहे.

पण आधुनिक मानवाची जीवननिष्ठा कोणती असावी ह्यासबंधी लेखकाचे सर्वच विचार कोणासहि पूर्णपणें मान्य होणें शक्य नसते या बाबतीत विचारस्वातत्र्याच्या आजच्या काळात प्रत्येकाचे एक विचारवैशिष्टच असतें, निदान असावयास हवे. असे जर विचारवैशिष्टच नसेल तर ग्रथलेखनाचे कार्यच फारसे लोक अंगावर घेणार नाहीत. अर्थात् स्थूलमानाने आजच्या मानवाच्या जीवननिष्ठेसबधी लेखकाचा समाजवादी दृष्टिकोण मला मान्य आहे. विशेषत: त्यात लोकशाही समाजवादावर आणि व्यक्तिस्वातंत्र्यावर जो भर दिलेली आहे त्याच्यामुळे मला ते विचार अधिकच पसत आहेत. परतु लोकशाही समाजवाद हीसुद्धा एक समाजाच्या बाह्यांगाची रचना आहे. ती एक विशिष्ट भौतिक परिस्थितीत मानवी जीवनाच्या विकासास पोषक होणारी आर्थिक, सामाजिक व राजकीय घटना आहे. ज्याप्रमाणे

कृषिसंस्कृतीच्या कालांत हिंदूनी वर्णाश्रम धर्म किवा चातुर्वर्ण्य व चार आश्रम या संस्था निर्माण केल्या त्याचप्रमाणे आजच्या आधुनिक युगास साजेल अशा सामाजिक, आर्थिक व राजकीय संस्था कशा असाव्यात ह्यासबधीचा बोध लोकशाही समाजवाद ह्या ध्येयावरून होत असतो. परतु मानवी जीवनाचें अतरग या सर्व प्रकारच्या सस्थाहून भिन्न व श्रेष्ठ आहे. या सर्व संस्था निर्माण कराव्यात, कांही काल त्यांची वाढ करावी, आणि कालांतराने त्या मस्थाच्या बधनात राहून होणारा विकास होऊन गेला म्हणजे पुन्हा त्या सस्था विस्कटून टाकाव्यात, त्याचे जाच झुगारून द्यावेत, आणि त्यांच्या अतीत जाऊन आपला आत्मविकास साधून घ्यावा ही मानवाची अंतिम आकांक्षा आहे. अखेरीस मी सर्व बंधनाच्या अतीत आहे, ही बंधने मीच निर्माण करतों, आणि त्याचे प्रयोजन झाल्यानतर मीच ती तोडून टाकीत असतो, हा आत्मविश्वास मनुष्याच्या सर्व संस्कृतीच्या व उन्नत व्यवहाराच्या बुडाशी असला पाहिजे. मानवाचें आत्मस्वातत्र्य, तें हेंच म्हणता येईल. या आत्मस्वातंत्र्याच्या प्राप्तीचा मार्ग त्याला समाजपराङ्मुख होऊन शोधण्याचें कारण नाही ती आत्मप्राप्ति मर्व समाजांत राहून मर्वांच्या सहकार्याने आणि सर्वाच्या स्नेहाने कशी उपभोगतां येईल हा मानवापुढील एक सनातन प्रश्न आहे. मानवी आत्म्याचे हे स्वातत्र्य सर्वांना उपभोगता यावें ह्यासाठी विशिष्ट प्रकारची भौतिक व आर्थिक परिस्थिति निर्माण करावी लागते. ती भौतिक व आर्थिक परिस्थिति निर्माण करण्याचे सामर्थ्य भौतिक शास्त्राच्या वाढीपूर्वी मनुष्याला लाभलेले नव्हतें. आज ते लाभलेले आहे. ह्यामुळे त्याला कृषिसस्कृतीहून श्रेष्ठ प्रकारची सस्कृति निर्माण करण्याचे बल मिळालें आहे. पण मनुष्याच्या ह्या वाढत्या सामर्थ्याला सामाजिक संयोजनाची आवश्यकता आहे. हे सामाजिक संयोजन मुख्यत: आर्थिक नियोजनाच्या रूपाने यावयास हवे आणि हे आर्थिक नियोजन व सामाजिक संयोजन मानवाचें आत्मस्वातत्र्य, त्याची सामाजिक समता, आणि वर्गभेदरहित बधुभावना ही तीन ध्येयें मान्य करून, करण्यात आले पाहिजे. आर्थिक व्यवहारांना नियोजनाचे प्रयोजन आहे हे तत्त्व आता बहुमान्य झाले आहे. पण हे आर्थिक नियोजन, एक वर्गसमाज स्थापन करण्यासाठी करावे की, द्विवर्ग समाज रचना चिरतन करण्यासाठी करावें, हाच आजच्या मर्व मामाजिक प्रश्नांच्या

बुडाशी वादग्रस्त मुद्दा आहे या वादग्रस्त प्रश्नाचें उत्तर आपण जसें देऊ तशी आमची संस्कृति बनणार आहे. म्हणजे हा प्रश्न आमच्या संस्कृति-विषयक दृष्टिकोणातून निर्माण होत आहे. मध्ययुगातील चातुर्वर्ण्य आता मोडून गेले आहे; हिंदूचा जातिभेद आता टिकत नाही; हिंदु-मुसलमान-ख्रिस्ती-बौद्ध, हे धर्मभेदहि मानवामानवांत भेदभाव निर्माण करण्यास फारसे कारण यापुढें होणार नाहीत आर्थिक वर्गभेद आणि त्यांतून निर्माण झालेली द्विवर्ग समाजरचना यांचा अंत करावयाचा की नाही, या प्रश्नाच्या उत्तरावर मानव समाजाच्या संस्कृतीचे सर्व भवितव्य आज अवलंबून आहे. समाजवादी संस्कृति म्हणजे एकवर्ग समाजाची निर्मिति.

सस्कृतीच्या विकासाबरोबर साहित्याचा विकास होत असतो संस्कृतीत क्रांति घडली म्हणजे साहित्याचें स्वरूप भिन्न बनतें अर्थात् साहित्याचे मूल्यनिदान करण्याच्या कसोटीसुद्धा बदलू लागतात अशी या पुस्तकाची एकदर मांडणी आहे. कृषिसस्कृतीचा उदय झाल्यापासून इसवी सनाच्या सतराव्या शतकाच्या सुमारास आधुनिक युरोपात उद्योगसंस्कृतीचा उदय होईपर्यंतच्या कालांत मानवसमाजाच्या मूलभूत घटनेंत फारशी मोठी क्रांति झाली नाही या कालात एकदर समाजजीवन हळूहळू विकास पावत असले तरी त्यात आमूलाग्र उलथापालथ किंवा क्रांति अशी फारशी घडलेली नाही. सामाजिक जीवनात धर्माला मिळालेले प्रभुत्व आणि धर्माने मान्यता दिलेली समाजाच्या भौतिक अगातील विषमता व तज्जन्य मानवामानवांतील उच्चनीच-भाव यांना मानवाच्या जीवननिष्ठेत कायमचे स्थान मिळाले याचा परिणाम समाजातील बहुसख्याक व्यक्तीच्या जीवनाचा विकास रोखून धरण्यांत झाला एकंदर सामाजिक व वैयक्तिक जीवन साचेबद आणि सामाजिक नियतीनें निबद्ध असेच बनले. या कालात साहित्यांत केवळ रसपरिपोष, अलकार व ध्वनि एवढ्याच मूल्याना अवसर देण्यात आला. आधुनिक युगात समाज-नियतीच्या बधनातून मुक्त होण्याची आकांक्षा समाजांतील सर्व व्यक्तीत निर्माण होऊ लागली. यामुळे सामाजिक जीवनांत स्वभाववैचित्र्य, विचार-स्वातत्र्य आणि व्यक्तिजीवनांतील विविधता इकडे लक्ष जाऊ लागले. याचा परिणाम जसा सामाजिक क्रांतीत झाला तसाच तो साहित्याच्या मूल्यनिदानातहि होत गेला. रसपरिपोष एवढीच कसोटी न लावता स्वभावपरिपोष, त्यांतील

वास्तवता, मानवस्वभावाचें वास्तव स्वरूप, मानवी मनांतील गुप्त विकार आणि वासना, याचें विश्लेषण आणि प्रतिगामी व पुरोगामी विचारांतील सघर्ष ह्यांना साहित्याच्या मूल्यनिदानात अधिकाधिक महत्त्व प्राप्त होत गेले. हा सर्व मानवसस्कृतीत होत असलेल्या परिवर्तनाचा व क्रातीचा परिणाम आहे हे या पुस्तकांत थोडक्यात विशद करण्यात आलेले आहे. या पुस्तकाचा मुख्य विषयच तो आहे. पण इसवी सनाच्या सतराव्या शतकात युरोपात सुरू झालेली मानवसस्कृतीतील क्राति अद्यापि पुरी झालेली नाही त्या क्रांतीचा प्रवाह कोणत्या दिशेने वाहात आहे, व तिचा ओघ अखेरीस मानवाला कोठे घेऊन जात आहे ह्यासबधीचें विवेचनहि या पुस्तकांत केलेले आहे थोडक्यात म्हणजे मानवी सस्कृतीचा भूतकाल, वर्तमानकाल व भविष्यकाल या तिन्हीकडे दृष्टिक्षेप टाकून आजच्या साहित्याचें कार्य आणि स्वरूप यासंबंधीची लेखकाची लेखकाची भूमिका माडण्यात आलेली आहे

या भूमिकेशी मी सामान्यत. सहमत आहे. तथापि मला त्यासंबंधीच्या माझ्या मताचे वैशिष्ट्य येथे थोडक्यात नमूद करणें अवश्य वाटते इसवी सनाच्या सतराव्या शतकापासून आधुनिक युरोपात जी सांस्कृतिक क्रांति घडू लागली आहे तिचे स्वरूप मी असे मानतो. आजपर्यंत सामान्य मानवाच्या सामाजिक व्यवहारांत स्वातत्र्य, समता आणि बंधुभाव याना स्थान नव्हतें, व तें अद्यापहि प्राप्त झालेले नाही ही ध्येये केवळ आध्यात्मिक क्षेत्रात कोडली गेलेली होती आता ती आध्यात्मिक क्षेत्रात कोडलेली ध्येये मानवाच्या सामाजिक, आर्थिक व राजकीय व्यवहारात प्रविष्ट होण्याचा प्रयत्न करीत आहेत प्राचीन व मध्ययुगीन इतिहासात ही गोष्ट अव्यवहार्य व अवास्तव गणली गेली होती भौतिक विद्या आणि सामाजिक शास्त्रे याच्यातील प्रगतीमुळे आज सामाजिक जीवनातील ही क्राति व्यवहार्य बनलेली आहे यामुळे प्रत्येक व्यक्तीला आत्मविकासाचे पूर्ण स्वातंत्र्य असावे त्याचबरोबर समाजातील सर्व व्यक्ती समान गणल्या जाव्या आणि त्याच्यातील बधुभावना त्याच्या सर्व व्यवहारांत प्रकट व्हावी याबद्दल आधुनिक कालात क्रातिकारक आंदोलने सुरू झालेली आहेत मानव समाजांतील या क्रातिकारक आंदोलनाच्या लाटा कोणत्याहि एका राष्ट्राच्या, किंवा सामाजिक संस्कृतीच्या बंधनात सामावलेल्या नसून त्यांना विश्वव्यापक स्वरूप प्राप्त

झालेलें आहे. युरोपांत निर्माण झालेली संस्कृति आज दुभगलेली असून तिचे एक शकल अमेरिकेंत व दुसरे रशियांत जाऊन पडलेले आहे. विसाव्या शतकाच्या प्रारभी आधुनिक युरोपीय सस्कृतीची अशी शकले झालेली नव्हती. तिचा संथ प्रवाह स्वतंत्रता, समता, आणि बधुता ह्या एकाच दिशेने वाहात असून अखेरीस तो प्राचीन कालापासून मानवाच्या मनाला आकर्षण करणाऱ्या सत्ययुगाच्या अथवा परमेश्वरी साम्राज्याच्या सागराला जाऊन मिळेल अशी आशा यूरपला व त्याच्या मागे राहिलेल्या इतर खंडातील मानवाना वाटत असे. लोकशाही, बुद्धिस्वातंत्र्य, सामाजिक समता आणि व्यक्तिविकास ह्या सर्वांना अवसर देणारी संस्कृति यूरपात निर्माण होऊन थोड्याच कालात ती सर्व जगांत फैलावणार असा आशावाद पहिल्या जागतिक महायुद्धाच्या पूर्वी सर्वत्र फैलावू लागला होता. पण आज हा आशावाद उरलेला नाही. यूरपीय सस्कृतीची शकले झालेली आहेत. अमेरिकेत व्यक्तिस्वातंत्र्याच्या नावाने आर्थिक विषमता आणि द्विवर्ग समाजरचना याचे संरक्षण करण्यानेच खिस्ती सस्कृति अथवा येशु खिस्ताने मानवाला दिलेली जीवननिष्ठा चिरतन होईल असा विश्वास दृढमूल बनू लागला आहे. याच्या उलट खिस्ताची जीवननिष्ठा आधुनिक मानवाने झुगारून दिली पाहिजे आणि सामाजिक, आर्थिक समतेच्या प्रस्थापनेसाठी काही काल तरी व्यक्तिस्वातत्र्य व लोकशाही ह्याचा लोप करून मानव समाजात एकपक्षीय अनियंत्रित राजसत्ता किवा हुकुमशाही प्रस्थापित केली पाहिजे हा विचार मानवाच्या शास्त्रीय बुद्धीचा अतिम आदेश म्हणून रशियातून सर्व जगभर फैलावण्यात येत आहे. रशियातील हा हुकुमशाहीचा विचार किवा अमेरिकेंतील व्यक्तिस्वातंत्र्याच्या नावाने सामाजिक व आर्थिक विषमतेला चिरतन करण्याचा विचार ह्या दोहोतूनहि मानवाला ज्या नव्या सस्कृतीची तहान लागलेली आहे तिची निर्मिति व प्राप्ति होणार नाही याबद्दल विचारी मनुष्याने आता नि:सदेह बनलें पाहिजे. आधुनिक यूरपात निर्माण झालेल्या सस्कृतीचा केवळ अंधःश्रद्धेने वा आदराने स्वीकार करण्याने मानवाचें जीवन सुखी, समृद्ध आणि सुसस्कृत होणार नाही. त्यासाठी बुद्धिबलाहून श्रेष्ठ असे आत्मबल जागृत केले पाहिजे

आधुनिक युरोपात जेव्हा नवयुगाचा अवतार झाला तेव्हा तेथे मानवाचें आत्मबल व बुद्धिबल आणि त्याचें भौतिक बल या तिन्हींचीहि वाढ करण्याचा

प्रयत्न झाला. पण त्यांतील आत्मबलाची वाढ खुटत गेली. इग्लंडांत प्युरिटन लोकांनी जी क्राति लोकशाहीच्या नांवाने केली, तिच्या बुडाशी सामान्य जनतेचें आत्मबल जागृत करून ते राजसत्तेच्या शस्त्रबलाविरुद्ध प्रभावी करण्याचा पहिला प्रयत्न झाला पण येशु ख्रिस्ताच्या जीवनसदेशाचा पुनरुद्धार करू पाहणाऱ्या या प्युरिटन क्रातिकारकानी आपणास अभिप्रेत असणारें परमेश्वरी साम्राज्य भूतलावर स्थापन करण्यासाठी शस्त्रबलाचा अतिरिक्त प्रयोग केला. याच्यातून क्रॉम्वेलची हुकुमशाही निर्माण झाली आणि प्यूरिटन पंथाला हवे असणारें परमेश्वरी साम्राज्य तर दूरच राहिले पण लोकशाहीसुद्धा नष्ट झाली. यानतर अमेरिका व फरान्स ह्या देशांत लोकशाहीच्या नांवाने ज्या क्रांत्या झाल्या त्यातून निर्माण झालेली लोकशाही आज धनिकशाहीच्या आहारी जाऊन परमेश्वरी साम्राज्याच्या ऐवजी धनिकांचे आसुरी साम्राज्यच लोकशाहीच्या नावाने जगात मिरवू लागलें आहे. लोकशाहीला धनिकशाहीचा जडलेला रोग नष्ट करण्यासाठीच समाजवादाचा उदय झाला असून समाजवाद म्हणजे दुसरे तिसरें काही नसून आर्थिक क्षेत्रातील लोकशाहीच आहे; असे म्हणता येते. पण रशियात ह्या आर्थिक लोकशाहीच्या संस्थापनेसाठी राजकीय लोकशाहीचा अंत करण्यांत आलेला आहे. तेव्हा मानव संस्कृतीत आपणांस जी क्रांति घडवून आणावयाची आहे तिची प्राप्ति रशियांतील समाजवादानेसुद्धा होऊ शकेल हा पहिल्या महायुद्धानतर कांही काल निर्माण झालेला आशावादहि आज विचारवंताना साधार वाटेनासा झाला आहे. पण समाजवादावाचून मानवसंस्कृतीचा तरणोपाय नाही. अमेरिकनाची समाजवादविरोधी लोकशाही ही जगांत स्वतंत्रता, समता, बन्धुता, याची स्थापना करूं शकत नाही ह्याबद्दलहि संदेह उरलेला नाही. अशा अवस्थेंत जगाला महात्मा गाधींनी एक नवी निष्ठा दिलेली आहे, ती निष्ठा म्हणजेच सत्याग्रहनिष्ठा होय. या निष्ठेंतून आधुनिक मानवाला आपल्या मानव्याचा आदर्श प्राप्त होऊ शकेल आणि त्याच निष्ठेच्या आधारावर मानवसमाजात जी सर्वांगीण क्राति आज अपरिहार्य झालेली आहे ती करण्याचाहि प्रभावी मार्ग सापडू शकेल असे माझे मत आहे.

ही सत्याग्रहनिष्ठा आणि आधुनिक युगात निर्माण झालेली मानवता याबद्दल दोन शब्द येथे लिहिणे अवश्य आहे. बुद्ध-ख्रिस्तादि प्राचीन धर्म-

संस्थापकाच्या जीवनात प्रकट झालेली सत्यनिष्ठा व अहिंसा वृत्ति ह्यातच महात्मा गांधींनी दिलेल्या सत्याग्रहनिष्ठेचा उगम असला तरी त्या सत्याग्रह निष्ठेने सामाजिक, आर्थिक व राजकीय क्षेत्रांत आज अपरिहार्य असलेली सर्वांगीण क्रांति करण्याचें ध्येय अंगिकारिलेले आहे. या दृष्टीने विचार केल्यास सत्याग्रही निष्ठेने मानवाच्या नीतिशास्त्रांत व अध्यात्मशास्त्रात नवी भर घातलेली आहे असें मान्य करावें लागेल. आधुनिक युगात भौतिक विद्येंत व सामाजिक शास्त्रांत बरीच प्रगति झालेली असली तरी नैतिक व अध्यात्म-शास्त्रात अद्यापि मानवाचे विचार बुद्ध व ख्रिस्त याच्या पलीकडे फारसे गेलेले नाहीत असे एक विधान या प्रस्तावनेत मागे केलेले आहे. त्यात येथें थोडी दुरुस्ती करावयाची आहे. महात्मा गांधींनी बुद्ध आणि ख्रिस्त यांनी मानवाला दिलेल्या जीवननिष्ठेंत महत्त्वाची भर घालून सामान्य जनतेच्या आत्मबलाचा प्रभाव सामाजिक, राजकीय व आर्थिक क्षेत्रात कसा पाडतां येतो ह्याचा एक प्रयोग दोन जागतिक महायुद्धांच्या मध्यंतरीच्या काळांत करून दाखविला. हा प्रयोग राजकीय क्षेत्रात बराचसा सफल केल्यानंतर भारताच्या सामाजिक व आर्थिक क्षेत्रात त्याचा प्रयोग करण्यासाठीच ते पुढे सरसावले असतांना त्यांचा बळी घेण्यांत आला. पण या बलिदानानंतर महात्मा गांधींनी मानवाला दिलेली सत्याग्रह निष्ठा नामशेष होणारी नाही. प्यूरिटनांनी ज्या क्रांतिकार्याचा प्रारंभ केला त्याचा तुटलेला धागा महात्मा गांधींनी आपल्या हाती घेऊन त्यांनी हातात घेतलेले शस्त्रबल निर्धारपूर्वक वर्ज्य केले. तसेच सांस्कृतिक क्रांतिकार्याला युरपांत निर्माण झालेला केवळ बुद्धिनिष्ठ मानवतावाद पुरेसा पडणार नाही हें ओळखून आत्मबलाच्या अधिष्ठानावर त्यांनी सत्याग्रहनिष्ठा निर्माण केली व ती मानवाला अर्पण केली. बुद्धिनिष्ठ मानवतावाद ह्या क्रांतिकार्याला अपुरा पडतो असे पाहिल्या-नंतर आधुनिक युरपात मानवतेच्या उपासकांनी शस्त्रबलाची आराधना केली. पण या आराधनेमुळे बुद्धिवाद, व्यक्तिस्वातंत्र्य आणि लोकशाही या मानवी जीवनमूल्यांचा अंत होत आहे याच पेचातून पुढे जाण्याचा मार्ग सत्याग्रहाची निष्ठा निर्माण करून महात्मा गांधींनी आधुनिक मानवाला दिलेली आहे. यामुळे त्याची बुद्धिनिष्ठा मंद न बनतां प्रखर बनेल. त्याचें व्यक्तिस्वातंत्र्य स्वार्थ आणि अहंकार यांच्या आहारीं जाऊन समाजांत विष-

मता निर्माण न करता निरहकारी व निर्भय वृत्तीने अखिल मानवाच्या सेवेत समाधान मानू लागेल. त्याची लोकशाही धनिकशाहीच्या आहारीं न जाता धनिकशाहीचे उन्मूलन करील आणि त्याचा समाजवाद हुकुमशाहीच्या खोड्यांत जनतेचे पाय न अडकविता, सर्वोदयाचे शिखर गाठण्याचा स्वावलबी मार्ग समाजातील प्रत्येक दलित व्यक्तीला दाखवून देईल यांतून मानवतेचा भावी विकास होणार असून ज्या सामाजिक सर्वागीण क्रातीचा प्रारंभ आधुनिक यूरपात इ० सनाच्या सतराव्या शतकात झाला तिची पूर्तता करण्याचें श्रेय आधुनिक भारताला मिळू शकेल असा विश्वास मला वाटतो. अर्थात् या दृष्टिकोणातून मानव संस्कृतीतील क्रांतीकडे साहित्यिक जेव्हा पाहू लागतील तेव्हा त्याच्या साहित्याचे सौदर्य अधिकच विकसित होईल असे म्हणण्यात अतिशयोक्ति नाही.

श्री. सत यानी हे पुस्तक लिहून मला प्रस्तावना लिहिण्याची विनती केली. त्या निमित्ताने माझे या विषयासबंधीचे विचार येथें महाराष्ट्रीय वाचकांपुढे थोडक्यात माडले आहेत. पुस्तकातील लेखकाच्या विचारांशी मी कितपत सहमत आहे व त्याची एकंदर विचारसरणी मला कशी योग्य वाटते यासबंधीचे स्पष्टीकरण येथपर्यत केलेलें आहे. आज हा विषय अत्यत महत्त्वाचा झाला असून सस्कृतिशास्त्र आणि साहित्य या दोहोंच्याहि अभ्यासकास त्या विषयाचे महत्त्व पटू लागलेले आहे. या पुस्तकाच्या वाचनाने त्याना बरेच साहाय्य होईल असे मला वाटते. विचारस्वातत्र्य म्हटले की मतभिन्नताहि आलीच पण जेथे मतभिन्नता असेल तेथे तिचें निराकरण बुद्धिबलाने करण्याचा प्रयत्न करणें आणि आपल्या बुद्धीस सत्यनिष्ठ बनविण्यासाठी सहिष्णुतावृत्ति धारण करणें हे एक आधुनिक मानव सस्कृतीचे आद्य लक्षण आहे. या वृत्तीनेच ह्या पुस्तकाचा उपयोग मराठी वाचक करून घेतील आणि आपल्या स्वतत्र बुद्धीने त्यातील ग्राहयाग्राहयतेचा विवेक करतील अशी मला दृढ आशा वाटते. मला ह्या निमित्ताने आपले विचार मराठी वाचकास सादर करण्याची एक नवी सधि लेखकांनी दिली आहे याबद्दल मी त्याचा आभारी आहे.

इस्लामपूर,<br>
जि. द. सातारा

शं. द. जावडेकर

---

*



संस्कृतीचे रसिक व समीक्षक
पंडित जवाहरलाल नेहरू यांस



# संस्कृति : तीन अवस्था

**कृषि-संस्कृति : उद्योग-संस्कृति : संयोजन-संस्कृति**



**सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचा प्रश्न —**

ब्रिटिशांची राजवट संपुष्टांत येऊन दोनवर वर्षे झाली. या अवधीत आपलें राष्ट्र राजकीय दृष्ट्या सार्वभौमहि झाले आहे. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर जो कांही नैसर्गिकरीत्या आनंद होणें शक्य होते त्याचा भर संपला आहे असे म्हणावयास हरकत नाही. त्याप्रमाणे एखादा दुसरा अपवाद सोडून दिला तर ब्रिटिशांच्या राजकीय धोरणामुळे जे कांही अडथळे वा संकटें निर्माण होणें शक्य होतें तीं पण निवारण झाली आहेत असे गृहित धरावयास प्रत्यवाय नाही. अर्थातच स्थिर असे राजकीय नि सामाजिक जीवन सुरू व्हावयास सुरवात झाली आहे, असे म्हणतां येईल. त्या बरोबरच आपण नवें सांस्कृतिक जीवन सुरू करीत आहोत. या सांस्कृतिक जीवनाच्या स्वरूपाबाबत मात्र बराच घोटाळा दिसतो. विचारवंतांच्या मनांतहि गोंधळच दिसतो. म्हणूनच नव्या सांस्कृतिक जीवनाचे स्वरूप ठरवितांना कांही निष्ठा वा संकेत ठरविले जाणे आवश्यक झालें आहे. त्याशिवाय आपले सांस्कृतिक जीवन गतिशील राहील असें वाटत नाही. अर्थातच सांस्कृतिक दृष्ट्या आपण कोणती भूमिका घेणे आवश्यक आहे, व आपले तद-

विषयक धोरण कसें असावयास हवें, याचा थोडा उहापोह येथे करण्याचे ठरविलें आहे. आजच्या परिस्थितीत तें आवश्यक आहे असें वाटतें.

ब्रिटिशांची राजवट येथून संपुष्टांत येण्यास कांहीं विशिष्ट प्रमाणांत आंतरराष्ट्रीय परिस्थिति कारण झालेली आहे, हें अमान्य करण्यांत अर्थ नाही. ज्या वेळी प्रत्यक्ष क्रांति होते त्या वेळी सर्व क्षेत्रांच्याप्रमाणे वैचारिक क्षेत्रांतहि एक नवी लाट येत असते, नवें वातावरण निर्माण होत असते. आणि त्यांतून नवी नवी मूल्यें निर्माण होत असतात. त्यांच्या अनुषंगानें विशिष्ट विचारप्रणालीला मान्यता व महत्त्व प्राप्त होत असतें. त्यांतच नव्या राज्याच्या यशापयशाची बीजें रोवलेली असतात. क्रांति होत असतांनाही एक प्रकारची विधायक बुद्धि वाढीस लागत असते. येथे तसें कांहीही झालेलें नाही. व त्यामुळे, वैचारिक दृष्ट्या व ध्येयात्मक दृष्टीने पाहतां एक पोकळी निर्माण झाली असे दिसतें. क्रांतिकाळांत कदाचित् जी जीवनध्येयें वाढीला लागली असतीं तीं आज वाढीस लावण्याची अत्यंत आवश्यकता निर्माण झालेली आहे. ही आवश्यकता ओळखून सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या प्रश्नाचें परि-शीलन थोड्याशा खोलांत जाऊन येथे करण्याचें ठरविलें आहे.

तत्पूर्वी संस्कृतीसंबंधी थोडें विवेचन करणें आवश्यक आहे. आजच्या जगांत संस्कृतीची प्रादेशिक वा भौमिक कल्पना घेणें हें चूक आहे. सर्व जगभर मानव जातीचीं ध्येयें आज कांही स्वरूपाने सारखीच आहेत. त्या ध्येयांच्या साध्यासाठी प्रयत्न करण्याच्या हक्क वा अधिकार हा कांही कोणा एकाच प्रादेशिक गटाला नाही.

थोड्या फार प्रमाणांत हीच परिस्थिति निरनिराळ्या काळीं होती असें म्हणावयास हरकत नाही. ह्या वस्तुस्थितीचें अधिक विवेचन या पुस्त-कांतून येणार आहेच. संस्कृति म्हणजे मानवी प्रज्ञा, कर्तृत्व व मन (आत्मा) यांचा अविष्कार. या अविष्कारास कांहीं भौतिक स्वरूप असतें व त्याच्या अनुषंगाने वैचारिक वा आध्यात्मिक स्वरूप येतें. आज तर या अविष्काराचें स्वरूप सार्वदेशीय झालें आहे हें स्पष्ट आहे. इतिहासकालांत देश वा खंडें

ही इतकी निगडित झालेली नव्हती. त्यामुळे प्रत्येक देशांतील लोकांस आप-आपल्या इतिहासांत थोडा वेगळेपणा असल्यासारखें वाटतें, व एका मर्यादे-पर्यंत तें खरेंहि आहे. आज मात्र ऐतिहासिक विवेचन करतांना आपणांस प्रादेशिक कक्षांत राहण्याचें कांहींच कारण नाहीं. त्यामुळे भारतीय संस्कृति ही कांही स्वयंभू व स्वयंपूर्ण आहे, असे बुद्धिवादी दृष्टीनें मानण्याचें कारण नाही. व तशी ती खरोखर नाहीहि. कांहीं विचारवंत आजहि हे मान्य करतात. येथील विवेचनांत हीच भूमिका आहे. संस्कृति हा संकेत प्रादेशिक अर्थानें न घेतां ऐतिहासिक अर्थानें घेणें आवश्यक वाटतें.

या दृष्टीनें आपलें नवें सांस्कृतिक जीवन ठरवितांना एकंदर जगाच्या सांस्कृतिक इतिहासाची स्थूलमानाने कल्पना असणें आवश्यक आहे. कारण आज वा यापुढ संस्कृतीचें जें कांहीं संगोपन वा संवर्धन व्हावयाचें आहे त्याचें स्वरूप एक देशीय, प्रादेशिक वा वांशिक असें रहाणें शक्य नाही. अर्थातच आपल्या नव्या जीवनाची ही जी जागतिक पार्श्वभूमि आहे, तिचा विसर पडूं देणें उचित होणार नाहीं. व म्हणून एकंदर सांस्कृतिक विका-साची जागतिक पार्श्वभूमि व तिचें स्वरूप विचारांत घेणें आवश्यक आहे.

**संस्कृति–मापनाचा मानदंड : मानवी कर्तृत्व —**

भौतिक, अध्यात्मिक, बौद्धिक...इ० क्षेत्रांतील प्रगतीचा समावेश ज्यांत अभिप्रेत आहे अशा जीवनाच्या संकलनात्मक स्वरूपास प्रामु-ख्यानें सस्कृति हें नांव देण्याची पद्धति आहे. संस्कृति ही पूर्णांशाने मानवी-कृत आहे. त्यामुळे तिचें स्वरूप परिस्थिति-सापेक्ष असणें अपरिहार्य आहे. जगाच्या इतिहासाचें अवलोकन करीत असतां सांस्कृतिक प्रगतीला प्रामुख्य देण्याची पद्धति आज रूढ आहे. त्यामुळे कालदृष्ट्या विवेचन करतांना सुद्धा संस्कृतींत तरतम असा फरक करणें शक्य आहे. तो फरक करण्यास कांहीं तरी विशिष्ट गमक ठरवावयास हवें. ते गमक ठरवितांना मानवी कर्तृत्वाचा मानदंड हाच विचारांत घ्यावयास हवा. त्यादृष्टीने असे म्हणतां येईल कीं, ज्या प्रमाणांत भौतिक परिस्थितीवर मानवाचें नियंत्रण वा प्रभुत्व

असेल त्या प्रमाणांत ती संस्कृति श्रेष्ठ. या दृष्टीने पाहूं गेलें तर इतिहासास ज्ञात कालांत आपल्या कालाची आधुनिक, संस्कृति श्रेष्ठ असूं शकेल, पण खऱ्या श्रेष्ठ संस्कृतीचें युगमान अद्याप पुढेच आहे, असें म्हणावें लागेल.

विविध क्षेत्रांतील मानवी कर्तृत्वाचा हा मानदंड नवीन आहे असें नाहीं. पण तें गमक देश–निरपेक्षतया जगाच्या इतिहासास लावावयास हवें. व हें मात्र जरा नवीन आहे. कारण या संबंधींची पुष्कळशी चर्चा ही वर्ण व देश–निरपेक्ष अशी नाहीं. कांहीं ठिकाणीं तशी ती आहे, तिचा आधार घ्यावयास कांहींच हरकत नाहीं. राजवाड्यांनी संस्कृतीच्या स्वरूपाचें विवेचन करतांना "जसें शस्त्र तशी संस्कृति" असें एक गमक दिलेलें आहे. संस्कृतीची उच्चनीचता ठरविण्यांत 'शस्त्रा'चा उल्लेख केला जावा ही मानवी–कर्तृत्वाचा गौरव होण्याच्या दृष्टीने योग्य अशी पायरी झाली. परतु राजवाड्यांनी 'शस्त्रा'ची व्याप्ति – हीं युद्ध कालचें वा युद्धांत यश मिळवून देणारें अस्त्र, इतकीच घेतली आहे. संस्कृतीच्या व्यापक स्वरूपाचा विचार करतांना हें गमक संकुचित आहे, अतएव अपुरें आहे. कारण शस्त्राबरोबर फक्त मानवाच्या विघातक वा विध्वंसक कृत्याचा उल्लेख आला, तरी पण त्याच्या ठायींच्या विधायक वृत्तींला या गमकांत स्थान आहे असें म्हणतां येत नाहीं. दुसरा प्रयत्न मार्क्सनें केला. ( कालदृष्ट्या पहिला म्हणावयास हवें,) त्याचे मतें ज्याचे हातीं उत्पादनाचीं साधनें त्याची संस्कृति. राजवाड्यांपेक्षा हें लक्षण अधिक व्यापक आहे. व त्यांत पुष्कळसें तथ्य पण आहे. परंतु मार्क्सनें हें विवेचन वर्गकलह इतिहासांत कसा दडून बसला आहे हें स्पष्ट करण्यासाठीं प्रामुख्यानें केलें आहे. सांस्कृतिक श्रेष्ठकनिष्ठता ठरविण्यास त्याचा उपयोग होत असला तरी तें गमक तसेंच घेणें या ठिकाणीं योग्य होणार नाहीं. समाजाच्या कोणत्या वर्गाची सांस्कृतिक जीवनावर छाप पडणें शक्य आहे, याचा उलगडा त्यामुळे होतो. पण संस्कृतीचें स्वरूप अधिक व्यापक व भव्य आहे. मानवी कर्तृत्वाला प्राधान्य दिल्यानंतर व भौतिक जीवनावर मानवाच्या सत्तेच्या प्रभुत्वाचा दंडक जो विचारासाठीं वर उल्लेखिला आहे त्यांत ह्या दोनही गम-

कांच्या अनुकूल भागाचा समावेश झालेला आहे. तेव्हां नवें गमक द्यावयाची कांहीं जरूर आहे असें नाहीं. दिलेंच तर असें देतां येईल कीं,

**निर्वाहाचीं साधनें तशी संस्कृति —**

हा विचार स्पष्ट करण्यासाठीं हे गमक मानवी संस्कृतीच्या प्रगतीला लावण्यास हवें, व त्या साठीं या दृष्टीने मानवी संस्कृतीच्या वाढीचा थोडासा आढावा घेणं प्राप्त आहे. मनुष्याला मनुष्यत्व प्राप्त झाल्यावर, म्हणजे त्याच्या बुद्धीचा थोडा विकास झाल्यावर, बौद्धिक वा सांस्कृतिक प्रगति शक्य झालेली आहे. अगदी प्रथमावस्थेत, माणूस संचय ( फळे वा आयते धान्य जमा करणें ), पारध व भ्रमंति ह्या दशांतून गेला. व यांतून पुढे गेल्यावर, यांत जे ज्ञान वा अनुभव मिळाला त्यांचा ठेवा घेऊन मनुष्याने ' कृषि ' या अवस्थेत प्रवेश केला. कृषि अवस्थेपर्यंत येण्याचा हा जो पल्ला आहे तो बराच गुंतागुंतीचा आहे. व त्याचे स्वरूप बव्हंशी तर्कगम्य असेच असणे अपरिहार्य आहे. कृषि अवस्थेप्रत येण्यापूर्वी केव्हां तरी, वा प्राथमिक-कृषि अवस्थेंत–माणसानें, गुरें पाळणे, अग्नीचा उपयोग व घरें बांधणें, या गोष्टी आत्मसात केल्या असाव्यात. या गोष्टी क्षुल्लक वा पार्थिव स्वरूपाच्या वाटल्या तरी त्यांच्या योगाने माणसाच्या विचारांत, बुद्धींत व कृतीत विलक्षण क्रांति होत होती असें म्हणतां येतें. व अशा प्रकारें शेतीची क्षेत्रं बदलतां बदलतां मोठ्या नद्यांच्या खोऱ्यांत माणसांना स्थिरता लाभली, समृद्धि लाभली, शांतता लाभली, व ह्यांच्या पोटीं नव्या संस्कृतीचा जन्म झाला. हिलाच आपण " कृषि–संस्कृति " म्हणूं या. कारण उपर्युक्त तत्पूर्व संस्कृतीपासून ती पूर्णपणे भिन्न होती, भव्य होती.

**कृषि-संस्कृति व तिचीं दर्शनें —**

जगांतील पहिली मोठी संस्कृति म्हणजे ही कृषिसंस्कृति होय. व येथपासूनच मानवाच्या ज्ञात इतिहासास सुरवात होते. कारण नमूद करून ठेवण्यासारखी बौद्धिक वा अध्यात्मिक वा भौतिक प्रगति येथपासूनच होणे शक्य झालें. ही संस्कृति, नाईल, गंगा, पो, यांगत्सी, सिंधू, यूफ्रातीस, तैग्रिस इ. नद्यांच्या खोऱ्यांतून निरनिराळ्या काळी वर्धमान झाली. व त्या दृष्टीने

इजिप्त, भारत, इटली, चीन, बॅबिलॉन, खाल्डिया...,ग्रीस इ. या वेगळ्या संस्कृति म्हणण्यापेक्षा कृषि–संस्कृतीची ही वेगवेगळी दर्शनें होत, असें म्हणतां येईल. कारण, प्रत्येक दर्शनाचें सर्वसाधारण अधिष्ठान वा धारणा ही जवळ जवळ सारखीच होती. म्हणजे बहुसंख्य शेतकरी वर्गाने राबावें व थोड्या लोकांना सांस्कृतिक प्रगतीचा मार्ग खुला राहावयाचा. थोडा फार फरक जो कांही असेल तो भौगोलिक परिस्थितीमुळे निर्माण झालेला असावयाचा. या प्रत्येक दर्शनाने कांही विशिष्ट क्षेत्रांत जी कांही प्रगति केली ती सर्व मानवजातीची पैदास होय. व आपल्या जीवनांतल्या कितीतरी गोष्टी यापैकी कोणत्याना कोणत्या संस्कृतीतून घेतल्या आहेत.

कृषि–संस्कृतीत मानव समाजाची खूपच प्रगति झालेली आहे. तथापि त्याचबरोबर कांही कालाने त्या प्रगतीला परागतीची कठिण कवचें पण चढली. भौतिक प्रगतीचे दृष्टीने पाहूं गेल्यास बाह्यसृष्टीवर प्रभुत्व प्रस्थापित करणारे निरनिराळे 'शोध' निरनिराळ्या राष्ट्रांत लागले. व बाह्य सृष्टीवर मनुष्याची सत्ता बरीच प्रस्थापित केली गेली. म्हणजे निरनिराळ्या शास्त्रांत कलांत आश्चर्यकारक प्रगति झाली. इतकी की, आजच्या प्रमुख विज्ञान-शास्त्रांची बीजें याच कालांत आढळतात. किती विविधप्रकारचे शोध लागले होते. याचे सविस्तर विवरण, विज्ञान बोधाच्या प्रस्तावनें'त सांपडते. परतु शेवटी प्रगति झाली तरी ती तेवढीच राहिली. या ज्ञानकणांच्या जाणिवतून निरनिराळी ' शास्त्रें ' मात्र बनली नाहीत.

राजकीय व सामाजिक बाबतीतहि तसेच म्हणतां येईल. समाजाचा बहुसंख्य गट शेतीवर कष्ट उपसूं लागला. कांही लोक निरनिराळ्या कलांतून आपली शक्ति बुद्धि खर्च करूं लागले. पण या क्षेत्रांत खरी प्रगति म्हणजे राज्यसंस्था निर्माण होऊन ती बद्धमूल झाली, ही होय. व त्या दृष्टीने 'राजा' हा पूर्णतया कृषि–संस्कृतीचा प्रतीक म्हणावयास प्रत्यवाय नाही. राजा हा जमीनीचा व सर्व भौतिक संपत्तीचा मालक बनला, व त्याच्या सबधीची निष्ठा ही एक अत्यंत प्रबल अशी सामाजिक शक्ति बनली. ह्या

निष्ठेच्या योगानेच या संस्कृतीच्या कालांत मोठमोठीं युद्धें, रक्तपात झालेले आहेत.

परंतु कृषि–संस्कृतीचें खरें मोठेपण वा क्रियाशीलपण तिनें केलेल्या अध्यात्मिक प्रगतीत आहे. विश्वासंबंधीचें ज्ञान व मानवा–मानवांचे संबध, त्यांचा जीवित हेतू, इ. मूलभूत विषयांचा उहापोह व खल या संस्कृतीत बराच झाला. आणि यांतून तत्त्वज्ञानात्मक विचारांची शीग पोचली. देव धर्म यांची आवश्यकता वा अपरिहार्यता, हे ह्या संस्कृतीतल्या अध्यात्मिक विचारांचें एक महत्त्वाचें लक्षण म्हणून म्हणतां येईल. परंतु ही तत्त्वज्ञानात्मक व समाज–शास्त्रात्मक चर्चा वा वाढ ही धर्म–संस्थेशी अविभाज्यपणें निगडित झाली वा वाढीस लागली. तेथून बाहेर पडून ही शास्त्रें वा तत्त्वज्ञानें स्वतंत्रपणें वाढीस लागूं शकलीं नाहीत. तथापि मानवी प्रगतीच्या दृष्टीनें ते व्हावयास हवें होतें. कृषि–संस्कृतीतला हा परमेश्वर विषयक विचार होता तो मात्र अत्यंत प्रभावी होता, त्यानें अप्रगत जमातींना एकत्र आणून त्याच्या ठायीं मानवीजीवन, उच्च विचार यांच्या विषयीं निष्ठा निर्माण करून मानव जातीची विधायक क्रियाशीलता वाढीस लावली.

ही कृषि संस्कृति जगावरली पहिली व एका दृष्टीनें आक्रमक संस्कृति होय. तिचें आक्रमण वन्य, पारध, भ्रमण, ... या पूर्वसंस्कृतीवर होत होतें. परंतु या संस्कृतींना पार्थिव, सामाजिक, अध्यात्मिक पसारा फारसा नसल्यामुळे व हें आक्रमण जवळ जवळ शांततापूर्ण असल्यानें फारसे अत्याचार न होतां ही संस्कृति वरील मोठमोठ्या नद्यांच्या सुपीक खोऱ्यांतून स्थायी झाली व वाढीस लागली. जगांत आजपर्यंतच्या संस्कृतीत दीर्घकाल असणारी अशी हीच संस्कृति. तिच्या निरनिराळ्या दर्शनांत श्रेष्ठ कनिष्ठ असा तरतम भाव कल्पितां आला तरी तो महत्त्वाचा नाही. प्रथमावस्थेंत ही अत्यंत प्रगतिशील होती. शेवटल्या अवस्थेत तिची प्रगतिशीलता नष्ट झालेली होती. पार्थिव स्वरूपांत ती कशी तरी जीव धरून होती व हाच काल जगाच्या इतिहासांत अज्ञात युगें, मध्ययुग वा अंधारयुग म्हणून प्रसिद्ध आहे. प्रत्येक देशाच्या इतिहासांत हाच प्रकार झालेला असल्यानें सांस्कृतिक

प्रगतीचा आढावा घेतांना हा मध्ययुगीन काल तसाच—अमहत्त्वाचा म्हणून—वगळावा लागतो. आपल्याहि इतिहासांत हजार वर्षांपूर्वीच हिची प्रगतिशीलता संपली. आपणांस आज जी सारी अभिमानभूत वाटणारी प्रगति आहे तीही या संस्कृतीच्या प्रगत अवस्थेतच झालेली आहे. पुढे ती संस्कृति उतारास लागली. मानवाच्या ठायी असणाऱ्या गतानुगतिकतेने शेवटी विजय मिळविला व या संस्कृतीचें केवळ पार्थिव स्वरूप आपणांपर्यंत येऊन पोचले आहे.

**उद्योग–संस्कृतीचा जन्म —**

सर्व जगांत अशा प्रकारें कृषि–संस्कृतीच तिच्या कलल्या अवस्थेत असतां यूरपमध्यें तिच्यावर मात करणाऱ्या उद्योग–संस्कृतीचा जन्म झाला. व या संस्कृतीचें जिकडे तिकडे आक्रमण सुरू झालें. गेलीं ४।५ शतकें ती जगावर सगळीकडे अव्याहतपणें पसरली. ही संस्कृति कृषि–संस्कृतीपेक्षा निश्चितपणें प्रभावी असल्याने कृषि–संस्कृतीला प्रत्येक ठिकाणी हार खावी लागली. पहिल्या अवस्थेत हीहि पण संस्कृति अत्यंत प्रगतिशील होती. यूरप, अमेरिका व पूर्वेस जपान ही तिची निरनिराळी 'दर्शनें' होत. त्या दर्शनाच्या स्वरूपांत निरनिराळा फरक असणें अपरिहार्य आहे. व त्या फरकाचें कारण प्रत्येक प्रदेशाच्या भौगोलिक परिस्थितीत आहे.

उद्योगसंस्कृतीच्या कृषि–संस्कृतीवरच्या आक्रमणास यूरपमध्येंच सुरुवात झाल्याने प्रत्येक गोष्टीत कांही काल यूरप हा अग्रभागी राहणें अटळ होतें. या संस्कृतीचें आक्रमण हें शांततेनें होणें अशक्य होतें. कृषि–संस्कृतीपेक्षा अधिक आक्रमणशील अशी ही संस्कृति असल्याने व कांही विशिष्ट पार्थिव स्वरूप आलेल्या कृषि–संस्कृतीवर हें आक्रमण असल्याने सामाजिक स्वरूपाची उलथापालथ मोठ्या प्रमाणांत होत होती, तिलाच औद्योगिक क्रांति असें म्हणण्याचा प्रघात आहे. व ही प्रक्रिया यूरपमध्यें १६ व्या शतकापासून १८ व्या शतकापर्यंत होत होती, अर्थात् या आक्रमणामुळे प्रत्येक देशांतील समाजव्यवस्था पूर्णपणे ढवळून निघाली.

या संस्कृतीने मानवी समाजाचें स्वरूप विघटित केलें. कृषि–संस्कृ-

र्जीन – राबणारे व सत्ता गाजवणारे असे – दोनच वर्ग होते. त्यांच्यामध्ये मध्यम वर्ग निर्माण करणे हे सामाजिक रचनेचे दृष्टीने या संस्कृतीला आवश्यक होतें. अर्थात् याबरोबर व विज्ञान–शास्त्राच्या प्रगतीबरोबर समाजाचे स्वरूप फारच गुंतागुंतीचे होत होतें. उत्पादनाचे विभागणीत विषमता बरीच आल्याने प्रत्येक व्यक्तीस कोणत्या ना कोणत्या स्वरूपाचा उद्योग करणे आवश्यक झालें. व यांतूनच या संस्कृतीच्या मुख्य लक्षणाचा–व्यक्तिवादाचा–उगम झाला असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

**तुलनात्मक विवेचन –**

या ठिकाणी कृषि–संस्कृति व उद्योग–संस्कृति यांच्या प्रमुख लक्षणांचा तुलनात्मक दृष्टीनें उल्लेख करणे जरूर आहे. कृषि संस्कृति ही शांतताप्रधान संस्कृति आहे. शांततेचा विचार वा सहिष्णुता ही या संस्कृतीची प्रमुख लक्षणे आहेत असे म्हणावयास हरकत नाही. या संस्कृतीच्या कालमानांत ज्या युद्ध स्वरूपाच्या उलथापालथी झाल्या त्यांत या संस्कृतीपेक्षा अप्रगत अशा भ्रमण वा पारध या संस्कृतीत असलेल्या मानव–समाजांनी केलेल्या अत्याचारांचा व त्यांच्या प्रतिक्रियेचा भाग अधिक आहे. ज्यांच्या अंगी ही संस्कृति पूर्णपणे मुरली असे समाज शांतताप्रिय असणे अनिवार्य होते. व यासंबंधांत भारत व चीन यांची उदाहरणे देतां येतील. कारण शेतीच्या एकंदर प्रक्रियेत मनुष्याच्या अंगची सारी विधायक क्रियाशीलता उपयोगांत येते आणि तिचा वापर नेहमी होत असल्याने साहजिकपणे कृषिप्रधान समाज हे शांतताप्रिय असतात.

शेतीच्या अनुषंगाने त्या व्यवहारावर राहणाऱ्या व्यक्तींच्या मनोरचनेत आणखी एक वैगुण्य पण निर्माण होते. ठराविक कालांत पेरणी, खुरपणी, नांगरणी, कापणी इ. सारखी कामें विशिष्ट क्रमाने वर्षानुवर्ष करीत राहावें लागण्याने या समाजांत एक प्रकारची परंपरा–प्रियता निर्माण होते. कांही एका विशिष्ट अवस्थेपर्यंत शांतता–पालनासाठीं हा गुण उपयोगी पडतो. परंतु एकंदर संस्कृति उतारास लागली म्हणजे या 'गुणा'चें रूपांतर दोषांत होतें. शांतता–प्रियता हीहि पण परिपोषक ठरत नाही, व सर्व समा-

जच्या समाज अधःपतनाकडे आकर्षिला जातो. आपल्या इतिहासांत गेल्या हजार वर्षांत हाच प्रकार झालेला आहे. व आपल्या अवनतीचें हे कारण आहे. गतानुगतिकपणाचा आणखी एक परिणाम असा होतो की, व्यक्तीच्या ठिकाणच्या व्यक्तिगत कर्तृत्वास आवाहन पोचेनासें होतें व अशा रीतीने समाज रसातळास जाऊ लागतो.

आणि या व्यक्तिगत कर्तृत्वास हाक देण्याचे सामर्थ्य नेमकें उद्योग-संस्कृतीत आहे. विशेषतः कृषि-संस्कृतीच्या उतरत्या अवस्थेत माणसाला जें शैथिल्य आले होतें ते या नव्या गुणामुळे एकदम नष्ट झाल्याने ही संस्कृती प्रारंभीच्या अवस्थेंत खूपच प्रगति करूं शकली. परंतु गेल्या पन्नास शंभर वर्षांतून हिचें जे स्वरूप आहे, तें ती उतरणीला लागलेल्या अवस्थेचें आहे. त्याहि अवस्थेंत ती ज्या ज्या ठिकाणी अव्वल अशा कृषि संस्कृतीवर आक्रमण करते तिथे कांही काल कांही प्रगतिकारक कार्य करते. परंतु ही अवस्था अल्पस्व काल राहाते. कारण या संस्कृतीत एकंदर विधायक असें फारसें शिल्लक राहिलेलें नाहीं.

राष्ट्रवाद —

उद्योग-संस्कृतीने जो व्यक्तिवाद निर्माण केला त्याने प्रादेशिक स्वरूप धारण केलें व त्यालाच राष्ट्रवाद असें आपण म्हणतों. परंतु आगोदर रूढ अशा कृषि-संस्कृतीचा हिच्याशी संघर्ष होत असल्याने खूपच संमिश्र स्वरूपाच्या घडामोडी घडतात व समाज अधिक बहुरंग बहुविध असा बनतो. एक प्रकारची (उतरत्या अवस्थेत) शिथिलता येते; एक प्रकारची बजबजपुरीहि माजते, कृषि-संस्कृतीत धनसंचयाचें स्वरूप धान्य, जमीन, गुरं इ. वस्तूंनी दर्शित होतें. परंतु ह्या संस्कृतीत क्रय-विक्रयासाठी "पैसा" या संस्थेचा जन्म होऊन धनाचें प्रतीक ती होते, व त्या संस्थेचा मनुष्याच्या व्यक्तिगत कर्तृत्वाशी फार संमिश्र व विचित्र नि विविध स्वरूपाची प्रतिक्रिया होते. संस्कृति प्रगत असेल तर ही प्रतिक्रिया पोषक असते व उतरत्या दशेंत ही मारक ठरते.-समाजांत विरोध निरनिराळ्या तऱ्हांनी वाढीस लागतो. दैन्य दारिद्र्य यांचा बुजबुजाट होतो व एकंदर समाज हा ऱ्हासावस्थेप्रत जात असतो.

उद्योग–संस्कृतीत मनुष्याने केलेली वैज्ञानिक प्रगति हा त्या संस्कृतीच्या मोठेपणाचा भाग आहे. निरनिराळी भौतिक–म्हणजे सामाजिक व वैज्ञानिक–शास्त्रें स्वतंत्रतया वाढीस लागली. माणसांचे भौतिक सृष्टीवरचे प्रभुत्वहि बिलक्षण वाढले. आणि माणसाच्या अंगांत एक वेगळेच सामर्थ्य आहे असे प्रत्ययास आलें. निरनिराळी विज्ञान–शास्त्रे व त्यांनी केलेली विज्ञान-प्रगति यांचा मानवी जीवितावर किती खोल परिणाम झाला आहे हे विस्तारानें येथे सांगण्याची आवश्यकता नाही.

सामाजिक क्षेत्रांतहि समाज कसा ढवळून निघाला व समाजाचे धारणेत कसा बदल झाला याचें विवेचन यापूर्वी आलें आहे. वैचारिक क्षेत्रांतहि ही संस्कृति कृषि–संस्कृतीपेक्षा भव्य आहे. मानवी जीविताच्या आध्यात्मिक, पारलौकिक श्रेष्ठपणापेक्षा भौतिक व ऐहिक श्रेष्ठपणाकडे लक्ष जाऊन निरनिराळे विचार वाढीस लागले. त्यांचा कृषि–संस्कृतीतील विचारांशी संघर्ष आला व त्यांत हेच विचार विजयी झाले. या विचारांत प्रामुख्याने राष्ट्रवाद, व्यक्तिवाद, स्वातंत्र्यादि तत्त्वें यांचा उल्लेख करावा लागेल. उद्योग–संस्कृतीनें मानवजातीला दिलेलें हे वैचारिक धन आहे. धर्मसंस्थेशी व तिने पुरस्कारिलेल्या मूल्यांशी जोराचा झगडा या संस्कृतीच्या विजय कालांत झालेला आहे.

**संयोजन-संस्कृतीचा जन्म —**

कृषि–संस्कृति उतरत्या अवस्थेत असतां ज्याप्रमाणे यूरपमध्ये नव्या आक्रमक उद्योग–संस्कृतीचा उदय झाला, त्याप्रमाणेच उद्योगसंस्कृति आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस कंठीत असतां – पूर्व युरोपमध्यें-नव्या संयोजन संस्कृतीचा जन्म झाला. व अखिल जागतिक स्वरूपाची नवी संस्कृति आपल्या समोर वर्धमान पावत आहे. ह्या संस्कृतीचा जो प्रसार व्हावयाचा त्याची क्रिया अधिक घर्षणशील असणे अपरिहार्य आहे. कृषिसंस्कृतीपेक्षा या उद्योगसंस्कृतीचा पार्थिव पसारा फारच अवाढव्य असल्याने नव्या संस्कृतीचा जुन्या संस्कृतीशी अधिक तीव्र स्वरूपाचा झगडा होणे शक्य आहे. हे पण आकलन होण्यासारखे आहे. परंतु व्यक्तिवादाने समाज–जीवनाचा उद्योग–संस्कृतीत जो भुगा उडाला आहे, व पर्यायाने व्यक्ति-जीवन पण खलास

होण्याची वेळ आणली आहे त्यांतून मानवजातीला हीच संस्कृति तारूं शकेल असें दिसतें.

समाजवादी क्रांति हें या संस्कृतीचे प्रारंभिक स्वरूप आहे. ज्याप्रमाणे व्यक्तिवादाचा अपरिहार्य परिपाक लोकशाही आहे. त्याप्रमाणे समाजवादाचा अपरिहार्य परिपाक संयोजन–नुसतें आर्थिक नियोजन नव्हे–तर सबंध जीवनाचें–संयोजन हा आहे. व म्हणून हे नांव या संस्कृतीस येथे दिलें आहे. मोकाट सुटलेला व्यक्तिवाद व कमालीचें शिथिल असें कृषि–संस्कृतीचें जीवन यांचा योग्य तो समन्वय या संस्कृतीत साधलेला आहे. पण इतक्या आस्थेने पाहणाऱ्या सिडने वेब्सारख्या विचारवंतांसच ती 'नवी संस्कृति' वाटते. इतरांस ती एक विक्षिप्त अशी अर्थव्यवस्थाच फक्त वाटते.

आज जगाच्या बहुसंख्य विभागांत कृषि–संस्कृति व उद्योगसंस्कृति यांचा झगडा चालला आहे. त्यांत उद्योग–संस्कृति विजयी होते आहे; परंतु जागतिक स्वरुपांत तिचें विधायक कार्य संपल्यामुळे, अगदी अल्प काळांत त्या संस्कृतीचे दुष्परिणाम समाज–जीवनावर दिसून येत आहेत. तेव्हा नव्या राष्ट्रांना एकदम संयोजन–संस्कृतीचा स्वीकार करण्याविना कांहीं समृद्ध जीवनाची प्राप्ति होईल असें दिसत नाही. लोकांनी आपण होऊन जर या संस्कृतीचा स्वीकार केला नाही तर उद्योग संस्कृतीबरोबर हिचा झगडा होणें अपरिहार्य, दिसतें. व त्यांत हीच संस्कृति विजयी होणार यांत शंका घेण्याचें कारण नाही.

**ही नवी संस्कृति —**

नवी संस्कृति ह्या दृष्टीने पौर्वात्य कृषि–संस्कृतींतील समाजनिष्ठेची बीजे व पाश्चात्त्य उद्योग–संस्कृति दर्शनांतील व्यक्तिवाद या दोहोंचाही समन्वय केलेला आहे. व त्या दृष्टीने प्रादेशिक वा (पूर्व पश्चिम इ. सारखे) देशिक अभिमान जर आपण बाजूस ठेविले तर या संस्कृतीच्या भव्य स्वरूपाचें दर्शन होण्यास अडचण येऊ नये. प्रगतिपथावर असलेल्या या संस्कृतीचे एक दर्शन रशियांत झालें दुसरें दर्शन चीनमध्ये होत आहे, तसें आपल्या देशांत कां निर्माण होऊं नये, अशी शंका मानवीजीवनाकडे जिव्हाळ्यानें व

बुद्धिनिष्ठेने पाहाणाऱ्या प्रत्येकाच्या मनांत आल्याविना राहात नाही. पाश्चात्य उद्योग–संस्कृती–वादी राष्ट्रें या नव्या संकृतीस "पौर्वात्य" म्हणून "शिवी" देवून तिचा अव्हेर करतात तर आमच्याकडे "पाश्चिमात्य" म्हणूनच तिची हेटाळणी केली जाते. याचे कारण ती नवी संस्कृति आहे. मानवी जीवनाच्या देशकालमानअवस्थेप्रमाणें प्रगत असणारे असे ते दर्शन आहे. आपल्याकालची तिसरी विश्वसंस्कृती म्हणजे संयोजन सस्कृति. तिचे प्रभुत्व प्रस्थापित होणें अपरिहार्य आहे. व हाच खरा आजचा प्रश्न आहे.

**ब्रिटिश राजवटीचें कार्य** —

आपल्या देशाच्या इतिहासाचे अवलोकन केले तर असे दिसून येते की, उद्योग–संस्कृतीचे आपल्या देशांतर्गत कृषिसंस्कृतिदर्शनावर इंग्रजी राज्यकर्त्यांकरवी आक्रमण सुरू झाले. तें स्थित्यंतर येथल्या व्यापारी वर्गाने घडवून आणलें असते तरी सामाजिक–क्रांति होणें हे अटळ होतें, व तसें झाले असतें, तर ती प्रक्रिया पुष्कळच नैसर्गिक वा सह्य झाली असती. त्यामुळे कदाचित् या उद्योग–संस्कृतीकडे पाहाण्याचा आपला दृष्टीकोण बदलला असता.

या दोन विश्वसंस्कृतीच्या संघर्षकाली या देशांत परकीय राजवट आल्याने व विशेषतः उद्योग–संस्कतीचे प्रचारक व पुरस्कर्ते परकीय राज्यकर्ते असल्याने त्यांना विजय मिळणे शक्य झाले. तार्तर, मोगल, तुर्क इ. ब्रि. पूर्व आक्रमक हे हिंदुस्थानावर हल्ले करूं शकले, पण सांस्कृतिक वर्चस्व प्रस्थापित करू शकले नाहीत. याचें कारण ते कृषि–पूर्व भटक्या संस्कृतींतच होते. पण ब्रिटिशांनी राजकीय वर्चस्वाबरोबर सांस्कृतिक वर्चस्व स्थापन केले. कारण ते आक्रमण प्रगत संस्कृतीचे अप्रगत सस्कृतीवर होतें. तथापि, त्याच कारणामुळे संक्रमण–कालामध्ये या देशाच्या समाजव्यवस्थेची ओढाताण फार झाली. आणि राज्यकर्त्यांच्या स्वार्थी धोरणामुळे उद्योग–सस्कृतीचे आक्रमण अर्धवटच क्रूरपणें थोपविलें गेलें, व तशा अवस्थेत आपण आपल्या देशाचे राज्यकर्ते झालों आहोत.

वास्तविक पाहतां ब्रिटिशांचें या ठिकाणचें कार्य हे औद्योगिक संस्कृति

प्रस्थापित करण्याचें होत. परंतु जगाच्या इतिहासाची एकंदर गतिमानता औद्योगिक-संस्कृतीच्या आगमनापासून एकसारखी वाढतः आहे. त्या गति-मानतेशी सुसंगतता ठेवणें मानवस्थित गतानुगतिकतेमुळे विशेषतः राज्य-संस्थेला अशक्य झालें. या ठिकाणीं ब्रि. राज्यकर्ते सार्वभौम होतात तोच औद्योगिक संस्कृति उतरणीला लागली, आणि आज तिचें पार्थिव स्वरूप तेवढें अस्तित्वांत आहे. तिच्यांतला जिवंतपणा समाप्त झालेला आहे. कृषिसंस्कृती-पेक्षा औद्योगिक-संस्कृति विलक्षण प्रभावी असल्यानें तिचें पार्थिव स्वरूपांतले जीवन सुद्धां मानवतेच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने अत्यंत स्फोटक झालें आहे.

म्हणजे उद्योग-संस्कृति ही आतां प्रगतिशील संस्कृति राहिली नाही जगांतली मानवजात जर खरोखर जागृत झालेली असेल तर ती कदापि तिच्या अस्तित्वाचे दृष्टीनेच या संस्कृतीला टिकूं देणार नाही. आणि सोळाव्या शतकांत ज्याप्रमाणें युरोपांत नव्या संस्कृतीचा जन्म होत होता त्याचप्रमाणें गेल्या २।३ दशकांत पूर्व यूरोपमध्यें नव्या संस्कृतीचा जन्म होत आहे. आणि आपल्या युगांत तरी ती संस्कृति वर्धमान अवस्थेंत आहे असें म्हण-ण्यास हरकत नाही.

**कृषि संस्कृति कां उद्योग संस्कृति (?) —**

आज आपणांपुढे आपल्या भवितव्याचा विचार करतांना जे कांही प्रश्न उभे राहणें साहजिक आहे, त्यापैकी हा सर्वांत मोठा व महत्त्वाचा प्रश्न आहे असें म्हणण्यास हरकत नाही. ब्रिटिश राजवटीने आपणांस अर्ध-वट सोडून दिलें आहे याचें थोडें दिग्दर्शन वर केलें आहे. आज आपण कृषिसंस्कृतीतून पूर्णपणें पार पडलेलों आहों असें नाही. त्या संस्कृतीचे जागतिक विकासांत कोणतें स्थान आहे याचा उलगडा मागे झाला आहेच. उद्योगसंस्कृति आपल्या जीवनांत ब्रिटिशांनी समाविष्ट केली असल्याने व त्यांच्या राजवटी-तील इतर कटु गोष्टींमुळे आपणांपैकी कांही त्या संस्कृतीचे विरोधक बनलेले दिसतात. त्यांचे मतें अद्यापहि आपण कृषि-संस्कृतीचा अवलंब करावा. तसे कांहीं प्रयत्न वेगवेगळ्या स्वरूपांत वा नकळत म्हणा, होत आहेत. पण तसें होणें हें म्हणजे आज ज्या पायरीवर आहोंत त्यावरून खाली उतरण्यासारखें

होय. व तसें केलें वा झालें तर कोणतीही प्रगति न होतां वर्तुळांत फिरण्या-प्रमाणे आपली अवस्था होईल. शिवाय एकंदर इतिहासाचा कौल पाहतां आपणांस तसें खाली उतरतांच येणार नाही.

आपणांपुढे दुसरा पर्याय उद्योगसंस्कृति आत्मसात करण्याचा आहे. पाहिल्या पेक्षा ही अवस्था पुढची आहे. परंतु वर पाहिल्याप्रमाणे उद्योग-संस्कृति हीच आज उतारास लागली असल्याने त्या उतारावरून वेगाने आपण निराळयाच भोवऱ्यांत सांपडूं.

**कां संयोजन संस्कृति —**

तेव्हा जर आपणांस जर प्रगतिप्रत जावयाचें असेल तर आजच्या जगां-तली जी प्रगत संस्कृति–संयोजन संस्कृति–तिचाच अवलंब करावा लागेल हें स्पष्ट आहे. व तो केला तरचं आपण खरोखर जागृत झालो असं सिद्ध होणार आहे. संयोजन हा एक केवळ अर्थ व्यवस्थेचा प्रकार वा पद्धत आहे असें नाही, तर ती एक नवी संस्कृति व प्रगतिशील संस्कृति आहे, असे मान्य करावें लागेल. उद्योग–संस्कृतीने ज्याप्रमाणे मांडवलशाहीस हातीं धरलें वा राष्ट्रवादाची मदत घेतली. त्याप्रमाणे ही नवी संस्कृति आर्थिक नियोजन व्यवस्थेस हातीं धरील व साम्यवादाची मदत घेईल. पण त्यामुळे तिचे अस्सलपण कमी होतें असें मानण्याचें कारण नाही.

**संस्कृतीचें स्वरूप व थोरवी —**

संस्कृति ही पूर्णपणें मानवी–निर्मित गोष्ट आहे. तिच्यांत दैवी अंश बिलकुल नाही. कांही काल गेल्यानंतर मागच्या पिढ्यांना दैवी अंशाचा भास होत असतो. देशकालमानाप्रमाणे मानवी कर्तृत्व, प्रज्ञा व व्यक्तिगत गुण यांच्या वापरास वा वर्धनास जी संस्कृति वाव देते तीच संस्कृति श्रेष्ठ. इतर मानव निर्मित संस्थांप्रमाणे संस्कृतीला पण उत्पत्ति, स्थिति, लय, या अवस्था आहेत. असें जरी असलें तरी प्रत्येक संस्कृतीत मानवतेचा अंश म्हणून कांहीं असतो, व तीच साऱ्या मानवजातीच्या मालकीची मिळकत असते. आणि त्यामुळे नकळत वा बुद्धया तिचा वारसा पुढील संस्कृतींत टिकून राहतो. किंबहुना त्याचा बदलत्या परिस्थितीप्रमाणे नवा आविष्कार म्हणून

नवी संस्कृति निर्माण होते. जीवनाचें अग्रलक्षण गतिशीतलता हें आहे आणि या गतिशीतलतेला जी संस्कृति आवाहन करील व ती जोंपर्यंत आवाहन करील तोंपर्यंत ती संस्कृति जीवन्त राहते. सर्वसाधारण मनुष्याचें मन हें परागतिक आहे.—कदाचित कृषि–संस्कृति उतरत्या अवस्थेंत एक हजार वर्षें टिकली त्याचा परिणाम असेल हा, पण—असें आजपर्यंत तरी दिसतें. व त्यामुळे संस्कृतींतला जीवंतपणा नष्ट झाला तरी पार्थिव रूपाने ती दीर्घकाल टिकून राहूं शकते.

**नवी संस्कृति व विश्वविद्यालयें —**

प्रत्येक संस्कृतीत जीवन-प्रगति करणाऱ्या कांहीं विशिष्ट संस्था असतात. त्या संस्था संस्कृतीच्या अवनत अवस्थेंत टिकून राहिल्यासारख्या दिसल्या तरी त्यांचें खरें कार्य संस्कृतीच्या विकासावस्थेबरोबर समाप्त झालेलें असते. कृषि–पूर्व संस्कृतीत प्रभावी अशी कोणतीच सामाजिक संस्था निर्माण झाली नाहीं वा होणे शक्यहि नव्हते. झाली असलीच तर तिचें स्वरूप जादू (मॅजिक) वजा असेल, व तिनेच मानवी व्यवहार व लोकजीवन नियंत्रित केलें असेल. कृषि–संस्कृति ही त्यामानानें बरीच प्रगत व स्थैर्यशील, म्हणून तिच्यांत बौद्धिक, आध्यात्मिक, सामाजिक प्रगति होणें शक्य होतें. ती प्रगति होतांना अशा संस्था निर्माण झाल्या. त्या दृष्टीनें कृषिसंस्कृतीत समाजजीवन अधिक उन्नत व नियंत्रित करण्याचें काम धर्मसंस्थेने केलें आहे. त्या संस्कृतीच्या उतरत्या काली तिचें स्वरूप जरी मलिन झालें असलें तरी तिचें हें कार्य लक्षांत घ्यावयास हवें. उद्योग–संस्कृतीत हें कार्य राष्ट्र या संस्थेने केलें आहे असें आढळून येईल. यापुढे मानवांनी कालाप्रमाणे संस्कृति बदलण्याचें अनमान केलें तर राष्ट्र या संस्थेचा अधःपात होत आहे असें दिसून येईल. यापुढच्या संयोजन–संस्कृतीत अशी कोणती एक संस्था असेल, वा असावी याचा अंदाज करणें कठिण आहे. तथापि धर्म वा राष्ट्र या संस्थांना नवें स्वरूप देतां येईल व त्यांच्याकडून अधिक कार्य होईल, अशी आशा करणे चुकीचें आहे. शिवाय आज विज्ञानशास्त्रांची प्रगति झाली आहे तिचा विसर पडून चालावयाचें नाहीं. धर्म व विज्ञान शास्त्र यांचें आज जवळचे नातें सांपडणें कठिण आहे. व राष्ट्र ही संस्था विज्ञानशास्त्रांस विधायक कार्यासाठी राबवील

असा – उद्योगसंस्कृतींत तरी–पुरावा नाही. तेव्हा या दृष्टीने विचार करतां असे आढळून येईल की, नव्या सस्कृतीत असें मानव-व्यवहाराच्या विविध अंगाचें संयोजन व नियत्रण करणारी अशी संस्था " विद्यापीठ " हीच होऊं शकेल. अर्थात ही नवी संस्था आहे असें नाही, इतके दिवस कृषि वा उद्योग-संस्कृति कालांत ह्या संस्थेस धर्म व राष्ट्र या संस्थानी राबविलें असें आढळून येईल. तशा प्रकारं–संयोजनाचे दृष्टीने–विज्ञान व सामाजिक शास्त्रात अनुबंध राखून विधायक गोष्टीसाठी सर्व प्रकारचे संयोजन करण्यास योग्य अशी कोणती संस्था असेल तर ती नव्या जमान्यांत विश्वविद्यापीठ हीच ठरेल. त्या संस्थेला कांही उपसंस्थांची मदत घ्यावी लागेल. कृषि संस्कृतीत धर्म संस्थेने प्रवचनें उपदेश यांच्या साहाय्याने हे कार्य केलें. उद्योग-संस्कृतीत राष्ट्र संस्थेने शिक्षण या संस्थेला हाताशी धरलें. नव्या संस्कृतीत त्या दृष्टीनें कोणती संस्था मदतकार्य करूं शकेल असे पाहूं लागलें तर 'वृत्तपत्र' या संस्थेचें नांव पुढे येऊं लागतें.

**ब्रि. राजवटीचा वारसा, लोकवट—**

ब्रिटिश राजवट आतां इतिहासांत जमा झालेली आहे. ब्रिटिशांनी राज्यकर्ते म्हणून कितीहि अत्याचार केले असले तरी, त्यांच्याकडून सत्ता-संक्रमण शांततेने झालें असल्यामुळे आतां तो कडवटपणा विसरावयास हवा. उद्योगसंस्कृतीच्या अंगभूत असणाऱ्या दोन गोष्टीचा वारसा ब्रिटिश राजवटीने आपणांस दिलेला आहे. व त्या दोन्ही गोष्टी आपणांस आत्मसात करावयास हव्यात. त्यांपैकीं एक म्हणजे व्यक्तिवाद, व तिच्यावरच आधारलेली दुसरी म्हणजे लोकसत्ता. यापैकी लोकवटीला आपण मान्यता दिलेली आहे. व व्यक्तिवाद हे लोकसत्तेचे अविभाज्य उपांग आहे. आपलें ब्रि. पूर्व संस्कृति–दर्शन हे व्यक्तिवादी नव्हतें. कृषि–संस्कृतींत व्यक्तिवादास स्थान नाही, व म्हणूनच व्यक्तिवादाचें मूळ जरी ग्रीसच्या कृषिसंस्कृतिदर्शनांत दिसून येत असलें तरी, त्या संस्कृतीत तें सामावूं शकलें नाही. त्याला पुरेपूर वाव, वा त्याचा पुरेपूर अविष्कार हा उद्योग–संस्कृतीत झाला. किंबहुना त्यासाठीच ती संस्कृति होती. ब्रिटिश पूर्वकालीं आपल्या संस्कृतीत व्यक्तिवादाचा उदय झाला नाही, म्हणून तो त्याज्य, हे म्हणणें योग्य नाही.

**व्यक्तिवाद्यांचे आक्षेप—**

उद्योग–संस्कृतीचे कैवारी उलट आक्षेप घेतील की, व्यक्तिस्वातंत्र्या-वर नियंत्रण येईल अशी संस्कृति ती संस्कृति कसली ? ती एक विकृतीच की ? ती स्वीकारण्यांत काय फायदा ? याहि शंकेच्या निराकरणार्थ असें म्हणतां येईल की, व्यक्तिस्वातंत्र्याचे उद्योग–संस्कृतीच्या अनुषंगाने वा त्या पार्श्वभूमीवर जें स्वरूप दिसतें वा जीं लक्षणें दिसतात, ती तशीच न स्वीकारतां नव्या संयोजन–संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर त्यांचे स्वरूप पाहून मग आपली जीवितमूल्यें ठरवावयास हवीत. तीं ठरवितांना आपण अधिक बुद्धिनिष्ट व्हावयास हवे. आपल्या संस्कृतीच्या अभिमानाच्या वृथा आहारी जाण्याचें कांही कारण नाही. अशा प्रकारे एकदम संयोजन–सस्कृतीचा अवलंब करण्याचे ठरविले तरच जें कांही आज आपण महाउत्थापन करण्याची वा सर्वोदयाची भाषा बोलतों, त्या अवस्थे-पर्यंत पोहचूं शकूं. आणि त्यामुळेच कदाचित पुढचा इतिहास आपणांस भारतीयत्व टिकविल्याचे श्रेय देईल. तेव्हा आपल्या परंपरेच्या निष्ठा वा परा-वलंबनाच्या कक्षा या अधिक कांटेतोलपणे व डोळसपणें निश्चित करावयास हव्यात. कांहीतरी वृथाभिमानाने इतिहासाकडे पाहण्यापेक्षा, आज आपल्या अवस्थेचे, जागतिक परिस्थितीचें व तिच्या सांस्कृतिक दशेचे ज्ञान करून घेऊन आपलें जीवन व त्याची दशा ठरविणें उचित आहे. त्यासाठी आपण बुद्धिनिष्ठ होऊं या. व असें झाले तर आपोआप नवीं तत्त्वज्ञाने निर्माण होतील.

**संस्कृतीचा ठेवा सर्वांचा —**

संस्कृति ही सर्वांचीच असते. एका विशिष्ट गटाची नसते. तिच्यावर सर्व समाजाची मालकी असते. अव्वल मानवी कर्तृत्वाचा वारसा वा ठेवा हा संस्कृतीच्या द्वारे जोपासला जातो. असे असलें तरी संस्कृतीचें संवर्धन करणे, वा तिच्या गुणाधिक्यास हातभार लावणें, सर्व समाजास आजपर्यंत शक्य झालें नाही. आतां ते शक्य झालें पाहिजे. कृषि–संस्कृतीत महत्त्वाची भर ज्यांना त्या समाजपद्धतीनुसार सवड, सवलत, व कुवत होती त्यांचीच झालेली आहे. हा वर्ग पुढच्या उतरत्या कालांत मिरासदार म्हणून ओळ-

खला जाऊं लागला. उद्योग–संस्कृतींत सांस्कृतिक जीवन जगण्यास जें स्थैर्य जी समृद्धि, शांतता आवश्यक असते त्या गोष्टी, मध्यमवर्ग, वरिष्ठवर्ग यांना उपलब्ध होत्या, व त्यांनी महत्त्वाची भर घातली आहे. अशा प्रकारें ही भर विशिष्ट वर्गांनीं घातली म्हणून तिची थोरवी वा मोठेपण हें अमान्य करणें चुकीचे आहे. ब्रिटिशांनी अत्याचार करून मिळविलेल्या पैशावर दिल्लीची लोकसभेची इमारत बांधली. पण तिचा वारसा आज आपणांकडे आलेला आहे; तेव्हा त्या इमारतीकडे ज्या दृष्टीने पाहूं त्याच दृष्टीने संस्कृतीच्या ठेव्याकडे पाहावयास हवें.

कृषिसंस्कृतीत जें स्थैर्य, शांतता, समृद्धि, आचार्य-वर्गास होते, जें उद्योग-संस्कृतीत वरिष्ठवर्ग व मध्यम वर्गास उपलब्ध झालें, ते स्थैर्य, ती शांतता, समृद्धि, नव्या संस्कृतीत सर्वसाधारण व्यक्तिमात्रास उपलब्ध झाली पाहिजे. ती तशी होणे हे फक्त संयोजनानें शक्य आहे, असे अर्थशास्त्रज्ञ म्हणतील. सांस्कृतिक विकासास या गोष्टी आवश्यक आहेत. त्या नियोजनानें शक्य आहेत. व आपल्या कालच्या निर्वाहाचे साधन संयोजन हेंच होऊं शकेल.

'संयोजन–संस्कृती'च कां !—

या ठिकाणी संयोजनावर आधारलेल्या समाजव्यवस्थेस 'नवी संस्कृति' कां म्हटले आहे हे थोडक्यांत स्पष्ट करणें आवश्यक आहे. संस्कृतीची वा उच्च उन्नत विचारांची धारणा स्थैर्यशील जीवनांत होते. धर्मविचाराने कृषि–संस्कृतीस स्थिरता आणली, नि उच्च विचार वाढीला लावले. व्यक्तिवादाने उद्योग--संस्कृतीस एक नवा पाया दिला. त्या आधारें भौतिक विचार वाढीला लागले, विज्ञानाने त्यास मदत केली व खूप प्रगति होऊं शकली. आज ती स्थिरता नष्ट झाली आहे, तो पाया भंगला आहे. यापुढे मनाच्या ठायी उच्च विचारांची धारणा रुजावयाची असेल तर ती एकाच गोष्टीने शक्य आहे; व ती म्हणजे प्रत्येक व्यक्तीला स्वतःच्या जीवन-वेतनाची कायदेशीर हमी मिळाली पाहिजे. आणि ही गोष्ट उत्पादनाचीं साधनें सर्व समाजाच्या मालकीची होण्याने–म्हणजेच संयोजनानें–शक्य आहे. अशी हमी ज्या समाजांत आहे, त्या समाजाची जीवनाकडे पाहण्याची

दृष्टि, समाजजीवनाविषयींचा जिव्हाळा, निष्ठा या सर्वच बदलतात, त्या आमूलाग्र वेगळ्या बनतात; थोडक्यांत म्हणजे नव्याच पातळीवर तो समाज जातो. म्हणजे त्याची नवी संस्कृति निर्माण होते. सांस्कृतिक प्रगतीचे दृष्टीने तो एक मोठा टप्पा आहे. नि म्हणून त्यास 'संयोजन संस्कृति' असें नांव येथे दिलें आहे. ते समर्पक वाटावे अशी अपेक्षा आहे.

## ही कुशंका नको—

संयोजन, नियोजन म्हटलें म्हणजे नाकें मुरडण्याचें कांही कारण नाही. सर्वसाधारण समाजाच्या सुख समृद्धीचा व किमान गरजांचा जिव्हाळ्याने विचार केला, व्यक्ति स्वातंत्र्याच्या वा कर्तृत्वाच्या खुळ्या कल्पना सोडून दिल्या, व बुद्धिनिष्ठेने जीवनाकडे पाहूं लागलों तर असें आढळून येईल की, हे जीवन क्षुद्र, हीन, आहे, असें कदापीहि म्हणतां येणार नाही. निदान कंगालपणा, दैन्य, दास्य यांनी ज्यांचा एक दीड शतकांचा इतिहास बनला आहे, त्यांनी तरी असें का मानावें हे समजत नाही. संयोजन-संस्कृतींत मानवी कर्तृत्वाची वा स्वातंत्र्याची गळचेपी होईल, असें म्हणणें वस्तुस्थितीस धरून होणार नाही. मानवी कर्तृत्वाचा व प्रज्ञेचा तो अपमान आहे. मानवी प्रज्ञा व कर्तृत्व हीं खरोखर कां इतकीं दुबळी आहेत, की ती कृत्रिम तऱ्हेने बंदिस्त होतील ? शिवाय अशा प्रकारें नवे नवे मार्ग काढून, सुख, समृद्धि, व संस्कृति यांचें वाण घरोघर वा व्यक्तिव्यक्तिप्रत पोचवणें शक्य असेल तर त्या संस्कृतीला कोणत्या तोंडाने हीनदीन म्हणणें योग्य होईल ! इतिहास मानवी कर्तृत्वाने भरला असतां तो मानवी-कर्तृत्व चिरडण्याचे मार्ग काढील, हे पटत नाही. शिवाय ह्या संस्कृतीशी समरस झाल्याशिवाय तिच्यांतली उदात्तता, भव्यता पटणार नाही. आज आपण अशा अवस्थेप्रत आलो आहोंत की, जीवनाची उदात्तता, भव्यता, कर्तृत्व यांना खरी हांक देण्याचें कार्य वा सामर्थ्य संयोजनाचेच आहे हे ओळखलें पाहिजे, व ह्या दृष्टीने विचार करू लागलो, तर त्या नवसंस्कृतीचें जे भव्य दर्शन होतें, तें खरोखर इतिहासांत अपूर्व आहे.

**आज —**

मानव समाजाच्या संस्कृतीचा इतिहास पाहूं लागलें असतां मानवी संस्कृतीच्या विकासाच्या ज्या अवस्था आहेत, त्या विशेषतः शस्त्र व उत्पादनाची साधनें यांचे अनुषंगानें जी प्रगति झाली आहे, तीमुळेच त्या निर्माण झालेल्या आहेत. या दोहोंचा समावेश करणारें 'निर्वाहाची साधनें तशी संस्कृति' हे गमक विचारास घेऊन संस्कृतीच्या परिभाषेत आपल्या परिस्थितीचे हे राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे विवेचन केलें. ब्रिटिश राजवट गेल्यापासून आपल्या तथाकथिक संस्कृतीच्या वृथा अभिमानाकडे वळलों आहों असें दिसतें. व म्हणून हे विवेचन होणें आवश्यक वाटलें. स्वातंत्र्यांत एक दीड वर्ष काढल्यानंतर जर आपल्या अंतरंगाचा पडसाद घ्यावयास लागलों तर, एकंदर जीवनाकडे वा भविष्याकडे फार उत्कंठेनें वा आशेनें पाहावें, अशा मनःस्थितींत सध्यातरी आपण नाहीं. व याच वस्तुस्थितीचें कारण शोधण्याचा हा प्रयत्न केला आहे. आपल्या भारतीय संस्कृतीच्या पुनरुत्थानाची आपण भाषा बोलतो. परंतु सांस्कृतिक पुनरुत्थान होणें, व विशेषतः या नव्या जगांत तें किती कठिण आहे याचा उलगडा एका दृष्टीनें करण्यांचा हा प्रयत्न केला. उद्योगसंस्कृतीशीं आपण समरस झालेलो नसल्यानें, राष्ट्र ही भावना आपल्या मनाच्या अंतःकरण्यापर्यंत पोंचलेली नाहीं. व कृषिसंस्कृतीच्या परिणामाचा भाग म्हणून धर्माविषयीं मात्र अधिक जिव्हाळा आपल्या ठिकाणीं आहे असें दिसतें.—मग देशविच्छेदनानें आलेल्या रागाचा तो परिणाम असेल—तथापि त्याच जिव्हाळ्याला संस्कृतीचें आवरण चढविल्यासारखें दिसत आहे. आणि हीच परिस्थिति कांहीं काल टिकली तर स्वातंत्र्य मिळूनही आपलें नष्टचर्य संपलें नाहीं. असा अनुभव आजाहि येईल.

**नवी निष्ठा —**

सांस्कृतिक पुनरुत्थान व्हावयाचें तर त्यासाठीं नव्या कालास सुसंगत असें तत्त्वज्ञान, अशी अर्थपद्धति व समाज—पद्धति व या सर्वांवर अढळ अशी निष्ठा, या सर्व गोष्टी प्रत्येक सज्ञान व्यक्तीच्या ठायीं बिंबल

झाल्या पाहिजेत. मग त्याचें प्रत्यक्ष जीवन-क्षेत्र कोणतेंही असो. आपणां-जवळ यांपैकी कांही आहे, असें दिसून येत नाही. धर्म ही भावना या पुढच्या कालांत उपयोगी पडणें अशक्य आहे. कारण त्या संस्थेचें सामाजिक महत्त्व केव्हाच नष्ट झालेलें आहे. त्यानंतर महत्त्वाची अशी भावना म्हणजे राष्ट्र.

### राष्ट्रवादाच्या मर्यादा —

ही भावना प्रथम कांही दिवस प्रभावीपणानें लोकमनाचें आकर्षण करून घेऊं शकेलही. कारण उद्योगसंस्कृति आत्मसात करण्याचा—होण्याचा—तो एकमेव मार्ग आहे. परंतु भव्यस्वरूपाचें सांस्कृतिक उत्थापन होण्यासाठी ही राष्ट्र भावना पुरी पडेल असें वाटत नाही. नव्हे तशी पुरी पडूं शकत नाही, असा इतिहासाचा कौल आहे. परंतु उद्योगसंस्कृतीच्या उतरत्या अवस्थेंत या भावनेचा पगडा पडावा म्हणून वेगळें तत्त्वज्ञान निर्माण केलें जातें. नीत्शेच्या अतिमानववादी तत्त्व-ज्ञानाचा हिटलरनें अवलंब केला, हें इतिहासांतील उत्कृष्ट ( ? ) उदाहरण आहे. आपल्या भारतीय परिस्थितीत हें होणें कांही अगदी अशक्य आहे अशांतला भाग नाही. व तीच भीति टाळावयाची आहे. 'भारताची जगा-वेगळी व सर्वांत उच्च अशी संस्कृति आहे, व तिच्या भव्यपणाचा अनुभव भारतास या युगांत जगास द्यावयाचा आहे. व हेंच आपल्या नवराष्ट्राचें ऐतिहासिक कार्य' अशा प्रकारचे विचार व त्याचे अनुषंगानें तत्त्वज्ञान निर्माण होण्याचा संभव आहे. कांही काल कदाचित हें तत्त्वज्ञान वा विचार नेत्रदीपक यश मिळवील, पण असें फारसें शक्य नाही. कारण अद्याप आपण उद्योग-संस्कृतींत मागासलेलो आहोंत. तथापि या तत्त्वज्ञानाचा जन्म अस्थिर अशा आर्थिक जीवनांत होतो, हें विचारांत घ्यावयास हवें.

### व्यक्तिगत कर्तृत्वास आवाहन पोंचावयास हवें —

तेव्हा भारताला विशिष्ट ऐतिहासिक कार्य करावयाचें आहे. व हाच आपल्या महाउत्थापनाचा भाग आहे, अशा संकेतवजा विचारसरणीवर

आधारलेला राष्ट्रवाद आपणांस फारसा अवलंबितां येणार नाही. कारण जागतिक सांस्कृतिक अवस्थेशी तो विसंगत आहे. या सर्व विवेचनावरून हे स्पष्ट होईल की, धर्म, राष्ट्र यांच्या पलिकडे असलेलें, ऐकांतिक व्यक्तिवाद व कृषिसंस्कृतीतला समाज–परंपरावाद, यांचा अवश्य तेवढा समन्वय घालणारें असे व आपल्या युगाला समर्पक असे लोकवादी, व साम्यवादी तत्त्वज्ञान, आपणांस नव्या उत्थापनासाठी आधारास घ्यावें लागेल. संस्कृति ही भाकरी-पेंक्षा भव्य आहे हें जरी खरे असले तरी भाकरीविना संस्कृति निर्माण होऊ शकत नाही, ही पण वस्तुस्थिति विचारांत घ्यावयास हवी. व त्यादृष्टीनें आपली अर्थव्यवस्था रचावयास हवी. तरच जें महाउत्थापन आपण म्हणतों शक्य कोटीत येईल.

हा जो विचार आहे तो भारतीय संस्कृतीत बसतो कीं नाही ? अशी आशका कित्येकांच्या ठायी निर्माण होणें शक्य आहे. भारतीय संस्कृतीच्या स्वरूपाबद्दल इतर मतभेद असले तरी ती सर्वसंग्राहक संस्कृति आहे हें सर्व विदित आहे. यज्ञ-संस्थेस विरोध करणारे, व वेदांविरुद्ध बंड करणारे बुद्ध, महावीर इत्यादींना आम्ही आत्मसात करून एकाच परंपरेत गोवले वा गोवतों. एवढेंच नव्हे तर जगांत उत्पात घडवून आणणाऱ्या महंमदाला पण सामावून घेण्याचा आमचा प्रयत्न होता. व इंग्रजांचा आगम न होतां इतिहासाची क्रिया निसर्गतया झाली असती, तर, तेंही केलें असतें, हे गांधीजींच्या चारित्रावरून सिद्ध व्हावयास हरकत नाही. त्याचप्रमाणे व्यक्तिवादावर आधारलेली लोकशाही आम्ही आत्मसात केलीच की नाही? या उदाहरणांवरून केवळ अभारतीय म्हणून नवी विचारसरणी आपण टाकूं शकत नाही. इतिहासाला आपल्या युगांत गति प्राप्त झाली आहे. त्यामुळे आपली संस्कृतिसुद्धा गतिमान ठेवावी लागेल. आपल्यापुढे सांस्कृतिक स्वीकाराचा जो प्रश्न आहे त्याचें आपण कोणते उत्तर देणार आहोंत ते काल ठरविणार आहे.

**महाराष्ट्र व भारतीय राष्ट्रकें—**

स्वातंत्र्य प्राप्त झाल्यावर येथे राष्ट्रीय प्रगतीच्या दृष्टीने थोडी गुंता-

गुंतीची परिस्थिति राहणें क्रमप्राप्त आहे. वैचारिक प्रगतीच्या बाबतीत भारतीय संघराज्यांतील सर्वच राज्यें वा (राष्ट्रकें) प्रांत सारखे सुधारलेले नसल्यानें पुढारलेली राज्ये वा राष्ट्रकें पुढें जाणें क्रमप्राप्त आहे. वैचारिक प्रगतीच्या दृष्टीनें महाराष्ट्र हा पुढारलेला प्रांत आहे, असें म्हणावयास हरकत नाही. व्यापक स्वरूपाच्या हिंदी राष्ट्रवादाचे जनक न्या. मू. रानडे आहेत. आधुनिक भारतांतले पहिले बुद्धिवादी विचारवंत आगरकर आहेत. व आज जी उत्थापनाची भूमिका आपल्या भारतीय राष्ट्रवादानें घेतली आहे तिचें जनकत्व महाराष्ट्राकडे–निबंधमालाकार चिपळूणकरां-कडे–जातें, असें दिसून येईल. हीच परंपरा पुढें चालवावयाची असेल, आणि रानडे, लोकहितवादी, फुले, आगरकर, टिळक यांना सामावून घेतलें असें दाखवावयाचें असेल, व गेल्या दोन तीन दशकांत गांधी-वाद व साम्यवाद यांत जी झटापट झाली, तिच्यापासून योग्य तो बोध घेऊन पुढें मार्गक्रमणा करावयाची असेल, तर आपल्यापुढे जो मोठा सांस्कृतिक प्रश्न उभा राहातो, त्याचें हें विवेचन केलें. आपल्या इतिहासाचा कौल हा संयोजन-संस्कृतीच्याच बाजूनें दिसतो. परंतु बुद्धिनिष्ठेच्या आपल्या कक्षा किंचित बोथट झालेल्या दिसतात व म्हणूनच हें एवढें विवेचन केलें.

नव्या महाराष्ट्रापुढे वा भारतापुढे इतिहासानें ठेवलेला एकच प्रश्न की, कृषि, उद्योग, वा संयोजन, यापैकी कोणती संस्कृति भारत स्वीकारणार व त्याचें आपण उत्तर कोणतें द्यावें हें सुचविण्याचा एका दृष्टीनें हा प्रयत्न केला आहे.

समाजाच्या सांस्कृतिक जीवनाच्या वेगवेगळ्या अंगांचा विचार केला असताहि ह्या तीन निरनिराळ्या संस्कृति कशा आहेत, किंवा एकंदर मानवी जीवनाचा ऐतिहासिक दृष्टीनें आढावा घेतला असतां त्या तीन संस्कृति-अवस्था कशा आहेत, हें स्पष्ट होतें. साहित्य हें संस्कृतीचें अत्यंत महत्त्वाचें अंग व गमक गणलें जातें, म्हणून साहित्याशीं अविभा-ज्यतया निगडित असणारीं अशी जी अंगें उपांगें आहेत त्यांचें या दृष्टि-कोणांतून परिशीलन या पुस्तकांतून येणार आहे.

# साहित्याचें मूल्यधन



साहित्य हें स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र —

मागील विभागांत विवेचल्याप्रमाणे मानवी संस्कृतीची आतां पावेतों जी वाढ झाली आहे, तिच्या अनुषंगाने असा एक महत्त्वाचा सामाजिक फरक घडून आला आहे की, कर्तृत्वक्षेत्रें भिन्न भिन्न होत आहेत. नवी नवी शास्त्रें—ज्ञानशाखा—कर्तृत्वशाखा—निर्माण होत आहेत. अशा कर्तृत्वाच्या विविध शाखा होणें हें सामाजिक प्रगतीचे दृष्टीने अपरिहार्य असले तरी, त्याचा थोडा अनिष्ट असा परिणाम होतो की, नवनवीन शाखांचा व ज्या जीवनांतून त्या निर्माण झाल्या त्या जीवनाशी असलेला त्यांचा संबंध दुरावतो. त्यांचे स्वतःचे असें एक शास्त्र बनतें, त्याचे स्वतंत्र कांहीं नियम होत असतात. त्या नियमांनाच अनन्यसाधारण प्रामाण्य देण्याची तत्क्षेत्रीय तज्ज्ञांची प्रवृत्ति वाढत जाते. व शास्त्र जीवनापासून दूर दूर जाऊं लागते. अशी क्रिया फार काल चालत राहिली तर मोठमोठ्या वैचारिक सामाजिक अडचणी निर्माण होतात.

अशा स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्रांत आज काल सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत साहित्याची पण गणना होत आहे. साहित्याचे स्वतंत्र शास्त्र होत आहे. त्याचे

स्वतःचे असे नियम तयार झाले आहेत. मानवी संस्कृतींत एक प्रकारच्या देवाण घेवाणीस महत्त्व असतें. साहित्य-विषयक विचारांचीसुद्धां अशी देवाण घेवाण झालेली आहे, होत आहे. आणि तिचे अनुषंगाने स्वतंत्र असे साहित्यक्षेत्रीय विचार वाढीस लागले आहेत. वास्तविक रीतीने हे 'स्वतंत्र' साहित्य-विचार म्हणजे साहित्य-बाह्य क्षेत्रांतील विचार-संघर्षाचा परिपाक होत. तरी त्यांना साहित्यांत अनन्य-साधारण महत्त्व असावें, व साहित्यांत तीच 'मूल्य' म्हणून मान्य व्हावीत असा आग्रह वाढीस लागणें शक्य आहे.

अशीं जीं साहित्य-मूल्यें आता पावेतों निर्माण झालेली आहेत ती ज्या सामाजिक परिस्थितीच्या विचारांचा परिपाक होत, त्या त्या विचारांच्या आधाराने साहित्य-मूल्यांचा परिशोध करणें शक्य झालें आहे. अशा साहित्य-मूल्यांची एक उपपत्ति येथे देण्याचे उपयोजिले आहे.

### साहित्य-मूल्यांची आवश्यकता—

साहित्याचें क्षेत्र हे फार संमिश्र व अनेकावयवी असें आहे. त्यांत जीवनांतील व इतर क्षेत्रांतील मतभेद, अभिनिवेश, आग्रह इत्यादींना भरपूर वाव असूनहि एक प्रकारच्या एकतेची जाणीव होते. पुरुषसूक्तांतील 'पुरुषा'प्रमाणे तें सर्व जग व्यापून दहा अंगुलें शिल्लक उरतेच. एका बाजूने विज्ञानशास्त्रे व समाजशास्त्रें त्यास जवळची आहेत, व त्यांच्या ज्ञानावर व त्यांच्या जीवनांतील परिणामावरहि त्याचा हक्क पोचतो. दुसरीकडून कलांच्या प्रांतासहि साहित्याचे क्षेत्र भिडलेलें दिसतें. आणि इतर कला व साहित्य यांतलें साम्य कोठे संपते ते समजून येत नाही. साहित्य-सेवक हे कलावंत म्हणून गणले जातात. तिसऱ्या बाजूने सामाजिक सेवेची जाणीव तितकीच तीव्र असते, व समाजाच्या सांस्कृतिक जीवनांत साहित्यास अग्र-स्थान असतें. या संमिश्रतेमुळे साहित्याचें अव्वल रूप कळणें कित्येकदां कठिण होतें. साहित्य हा प्रामुख्याने एक कलात्मक आविष्कार आहे असें सर्वसाधारण मत रूढ आहे. तथापि अधिक बारकाईने पाहूं गेलें तर ही कलात्मकता व तिच्यामागें असलेलें कलावंताचें व्यक्तित्व हे गूढच राहतें. कारण कलावंताला

आपण समाजासाठी साहित्यसेवा करतो का स्वतःच्या व्यक्तित्वाच्या अभिव्यक्तीसाठी करतों हे समजेनासें होते. अशा प्रकारची विविधता असूनहि साहित्यक्षेत्र हें स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र मानण्याची प्रवृत्ति प्रत्येक सुसंस्कृत समाजांत दिसते. व हीहि जाणीव बरीच जुनी आहे.

**मुद्रित-साहित्याचें युग—**

आज आपली साहित्याविषयींची जी कल्पना आहे ती अर्थातच आपल्या युगाची अशी द्योतक आहे. व तिचें स्वरूप प्रामुख्याने मुद्रण-शोधाने व मुद्रण शोधानतर बनलेलें आहे. मुद्रण-शोध हा उद्योग-संस्कृतीत सांस्कृतिक जीवनावर खोल परिणाम करणारे असे जे शोध लागले, त्यांत अत्यंत महत्त्वाचा आहे. व साहित्य-विवेचनांत, विशेषतः ऐतिहासिक दृष्टीतून केलेल्या विवेचनांत--त्याला एक युगप्रवर्तक शोध असे अपरिमित महत्त्व द्यावे लागते. त्या दृष्टीने उद्योग संस्कृतीतले साहित्य म्हणजे मुद्रित-साहित्य असे समीकरण बसवितां येईल. आपलें जवळ जवळ सर्व साहित्य हे मुद्रित असते. व मुद्रित साहित्यांत आपण वेगळे प्रकार मानतो. वाङ्मय हा शब्द साहित्य ह्याचअर्थी आज रूढ आहे. त्याच्या मधील "वाक्"मधील संकेत आज लोपला आहे. ही अर्थातच पुढली व खूप प्रगत अवस्था आहे. आपल्या मुद्रण--प्रधान जगांतले हे साहित्यरूप मुद्रणापूर्वी वा लेखनापूर्वी असणें अशक्य आहे. व त्यायोगे साहित्याच्या लेखनपूर्व वा मुद्रणपूर्व साहित्य--मूल्यांत व आजच्या साहित्य -मूल्यांत कांही फरक असणें शक्य व नैसर्गिक आहे.

**मुद्रणपूर्व—**

लेखनपूर्व संस्कृतीत साहित्य हे जीवनाच्या इतर विभागाशीं पूर्णपणे संलग्न असल्यामुळे, किंबहुना सर्व जीवनच एकावयवी असल्याने, तसेच एकंदर मानवी कर्तृत्वाचें व प्रज्ञेचे क्षेत्र मर्यादित असल्याने प्रज्ञेस श्रेष्ठतर जीवितमूल्यांचा परिशोध करण्यास सवड सापडूं नये हे शक्य आहे. अर्थातच लेखनपूर्व संस्कृतीत साहित्यमूल्ये विभक्तपणें सांपडत नाहीत.

## साहित्य-प्रवृत्तींचें मूळ—

साहित्य–प्रवृत्तीचे मूळ–प्राचीन संस्कृतींत भिन्न भिन्न रूपांत पाहावयास मिळतें. मनुष्याच्या मनाला झालेली व सामाजिक स्वरूपाची जाणीव देणारी पहिली संवेदना म्हणजे क्रीडेची व तीपासून झालेल्या आनंदाची. या आनंदाचा अगदी नैसर्गिक अविष्कार म्हणजे नृत्य होय. आपल्यांतहि आज 'आनंदानें नाचावयास लागला' हा शब्दप्रयोग व लहान मुलांचें तत्सम नाचणे, या दोनही गोष्टी ह्या दृष्टीने बोधपूर्ण आहेत. नृत्यांत स्वतःच्या विशिष्ट आनंदाची अभिव्यक्ति व दुसऱ्यांस तो कळविण्याची व त्यालाहि आनंदित करण्याची तीव्र इच्छा, या दोहोंचे फार संमिश्र अस्तित्व आहे. नृत्याचे अनुषंगानें गाणे, ओरडणें, विशिष्ट हावभाव करणे, विशिष्ट वस्तू वाजविणे इ. इ. गोष्टी येतात. तेव्हा साहित्य प्रवृत्तीचें मूळ नृत्यांत आहे असें स्थूलमानानें म्हणतां येईल. कारण नृत्य हा रंजन प्रकार वन्यावस्थेंतसुद्धां सुचणें व स्वीकार्य वाटणें शक्य आहे.

जशी सामाजिक प्रगति होत गेली, तसें राज्य आलें. राजा आला. त्याला करमणुकीची आवश्यकता वाटूं लागली. व आपण त्याची करमणूक करावी अशी इच्छा पण त्याच्या आश्रितांस झाली. क्रीडा संमिश्र झाली, नृत्याचें क्षेत्र अधिक व्यापक होत गेलें. पुढे त्यांत 'वाद्य' आलें. संमिश्रता अधिक आली. थोडक्यांत साहित्य भावनेचे केंद्र नृत्यापासून नाट्याकडे झुकलें. व नाट्याच्या अनुषंगानें काव्य आलें ( स्तुति पाठकांनी आणलें तें ) वादन आलें व संगीतहि आलें.

## 'नाट्य' हा पहिला साहित्याविष्कार—

मुद्रणपूर्व व कदाचित् लेखनपूर्व ( लेखन व साहित्य ह्यांचे अविभक्त साहचर्य प्रस्थापित झाले नव्हते अशा काळांत ) राजसंस्थेच्या–विशेषतः राजा ह्या व्यक्तीच्या–औदार्यानें व आश्रयानें जर कोणती साहित्य-स्वरुपाची कला वाढीला लागली असेल तर ती नाट्य होय. कारण विजयोत्सव, पुत्र-जन्मोत्सव, राज्यारोहण, जन्मदिन, विवाहोत्सव ऋतूत्सव, इ. उत्सव-प्रसंगी याच कलेची आठवण व उपयोग होणें साहजिक होतें. तसे उल्लेख

संस्कृत नाटकांतून व काव्यांतून आढळतात. इतर व्यक्तिगत स्वरूपाचें काव्य, नाट्य इ. ना सामाजिक अधिष्ठान असणें कठिण होतें; असलेंच तर ते धर्माच्या स्वरूपाशीं जुळतें असें होतें. कारण ज्याला आज आपण व्यक्तित्व म्हणूं ते अद्याप उदित व्हावयाचें होतें. अर्थातच काव्याच्या स्वतंत्र कलात्मक अस्तित्वाची जाणीवहि नंतरची आहे. प्रथम नाट्यकलेचीच महति पटणें साहजिक आहे.

त्यामुळे काव्य-विचाराच्या पूर्वी नाट्यविचार सुरू झाला. कारण सामाजिक स्वरूप असलेली व म्हणून चर्चा करण्यास योग्य असलेली कोणती कला असेल तर ती त्या अवस्थेंत नाट्य ही होय. म्हणूनच साहित्य-मूल्यांचा शोध प्रथम नाट्यशास्त्राचे आधारें झाला. अशा प्रकारच्या संशोधनासाठीं जे स्वास्थ्य व शांतता मुबत्ता असणें आवश्यक होतें, ती ह्यावेळी लाभली असावी. साहित्यमूल्यांचा आपल्याकडे शोध भरतमुनींच्या नाट्यशास्त्रापासून होऊं लागला असें दिसते. त्यांना नाट्याच्या परिपोषणासाठी 'रसा'ची आवश्यकता वाटली व त्याच मूल्याचे पुढे काव्यशास्त्राने अवलंबन केले. साहित्य-प्रवृत्तीचें मूळ अशाप्रकारें नाट्यांत असल्याने पहिलें साहित्यमूल्य पण नाट्याधारें उपलब्ध व्हावें हें समजण्यासारखें आहे.

**यूरपमध्ये तोच प्रकार—**

यूरपच्या प्राचीन संस्कृतीत पण तोच प्रकार झाला आहे. युरोपच्या आजच्या संस्कृतीच्या मूल्यांचे संशोधनास सुरवात त्यांच्या ग्रीक-संस्कृति दर्शनापासून करतात. काव्य, तत्त्वज्ञान, नाट्य, वक्तृत्व इ. कलांच्या व शास्त्रांच्या स्वतंत्र आस्तित्वाची कल्पना तत्कालीन समीक्षकांस आली. पण त्यांचा शोध वेगळ्या रीतीने होऊन वाढहि पण तशीच झाली आहे, बौद्धिक प्रगतीचे बाबतींत प्राचीन संस्कृतीत ग्रीक-संस्कृति बरीच आघाडीवर होती. त्या संस्कृतीत मानवी प्रज्ञा प्रामुख्याने ह्याच कामी लागली. ग्रीक तत्वज्ञ व साहित्यशास्त्रकार ॲरिस्टॉटल् याच्या काव्य व नाट्य शास्त्रांच्या संबंधाच्या विवेचनांतून आपणांस कांहीं साहित्यिक मूल्य-संशोधनाचा मागोवा लागतो. त्यापैकी काव्यसौंदर्याची चर्चा आरिस्टॉटलने कथानक-रचना-सौंदर्यास प्राधान्य देऊन केली. व रस चर्चेस उपयोगी पडणारी चर्चा त्याच्या नाट्यविषयक विवेचनांत आढळते.

या प्राचीन साहित्य-समीक्षकांस नाट्य हा मनोव्यापार त्याच्या संमिश्रतेमुळे महत्त्वाचा वाटावा यांत नवल नाही. व म्हणून तद्विषयक चर्चेंत मनासंबंधी त्यांनीं त्यांच्या कालमानाप्रमाणे उपलब्ध असलेल्या ज्ञानाचा उपयोग करून घेतला. आपल्या मनासंबंधीच्या वाढत्या ज्ञानावर आधारलेल्या विवेचनाशी तुलना करतां त्यांना कांही गोष्टींची स्पष्ट कल्पना नसावी, वा विशिष्ट व्यापाराची जाणीव झालेली नसावी यांत आश्चर्य नाही.

**मुद्रणपूर्व साहित्य, मूल्य-रस—**

मुद्रणपूर्व संस्कृतींत साहित्याचें मूल्य शोधन चालू होतें. त्यांत तत्कालीन समीक्षकांना सवात महत्त्वाचें असें जर कोणतें साहित्यमूल्य आढळलें असेल तर तें 'रस' हे होय. हे मूल्य कसकसें उलगडत गेलें व साहित्यविषयक विचारांचा रोख हा 'रसात्मकं वाक्यं काव्यं' ह्या विचारापावेंतो कसा आला, व तो विचार तेथे कसा स्थिर झाला, हे याठिकाणीं विस्तारानें विवेचावयाची आवश्यकता नाही. येथे येवढेंच पुरे आहे की, ही मूल्य संशोधनाची क्रिया बाह्यसौंदर्य-मूल्यांपासून आंतर सौंदर्य-मूल्याकडे आली व तेथे स्थिरता पावली.

**गेयता —**

रसाइतकें महत्त्वाचे व कित्येकांना संभ्रमांत टाकणारें साहित्य-मूल्य म्हणजे गेयता हे होय. काव्यासंबंधीच्या निरनिराळ्या व्याख्या जरी पाहूं गेले तरी गद्य व पद्य यांमधील व्यवच्छेदक गमक म्हणून गेयतेकडे किंवा तालबद्धतेकडे पुष्कळ विवेचकांनी बोट दाखविलें आहे असें आढळून येईल. परंतु गेयतेला महत्त्व देण्याचा प्रयत्न मुद्रणानंतर झाला आहे. तसें होणें साहाजिक आहे. कारण मुद्रणानंतर खरें गद्य जन्मास आलें व त्याचा आणि तत्पूर्व साहित्य जें काव्य ह्याचा संघर्ष सुरू झाला. तेव्हा त्यावेळी गेयतेचें महत्त्व लक्षांत येणें क्रमप्राप्त होतें. तत्पूर्वी गद्याला साहित्यांत महत्त्वाचें स्थान नव्हतेंच.—निदान उत्कृष्ट असे गद्य साहित्य विचारांत घेऊन साहित्याचें सर्वव्यापक तत्त्व शोधण्याचा यत्न केला तर काव्याचें (म्हणजे आजच्या संकेतानुसार साहित्याचें) महत्त्वाचें मूल्य म्हणून गेयता मानावें हा विचार

आज फारसा टिकण्यासारखा नाही. कारण गेयता वा ताल, वा छंदबद्धता हें गद्य व पद्य यांमधील व्यवच्छेदक लक्षण होत असलें तरी उच्च साहित्य-मूल्य निश्चितपणें होऊं शकत नाही. मुद्रणाने काव्याचें (पद्याचें नव्हे) क्षेत्र बरेंच विस्तृत केलें आहे. तत्पूर्व साहित्यांत आपल्याकडे व सर्वच देशांत पद्याला महत्त्व असणें अपरिहार्य आहे. त्याच योगानें साहित्य म्हणजे काव्य व नाट्य येवढे दोनच विभाग त्यांच्यापुढे होते. आपल्या कालाइतकें व्यापक स्वरूप साहित्याला मुद्रणापूर्वी मिळणे कठिण होतें. तें तसें मिळालें नव्हतें हें विसरून चालतां येत नाही.

बाह्य सौंदर्याचीं गमकें म्हणून रीति (शैली) वृति, गुण व कांही प्रमाणांत अलंकार यांना महत्त्व असलें व काव्यचें श्रेष्ठ मूल्य म्हणून कांही साहित्यकारांनी एकेकांस महत्त्व देण्याचा प्रयत्न केला असला तरी आज आपण त्यांना बाह्यागुणांपेक्षा अधिक व्यापक स्वरूपाचें–अंतिम–महत्त्व देऊं शकत नाही. मुद्रणोत्तर साहित्यांत तर हे गुण नुसते गुण राहिले नसून साहित्यरूपाशी अविभाज्य असणारे विशेष म्हणून त्यांना स्थान आले आहे.

'ध्वनि'चे आधुनिकत्व—

ह्या मुद्रणपूर्व कालांत रसाइतकेंच एका दृष्टीने महत्त्वाचें असें मूल्य संशोधिलें गेलें व ते म्हणजे "ध्वनि" हें होय. पूर्व साहित्य–शास्त्रकारांनी ध्वनि ह्या मूल्यांस–रसाच्या खालोखाल दुय्यम–स्थान दिलें आहे. काव्यांत ध्वन्यर्थ असला, तो महत्त्वाचा असला, तरी ध्वनि हे काव्याचें मूलभूत तत्त्व वा आत्मा होऊं शकत नाही, असा प्राचीनांचा पण अभिप्राय आहे. आपणांस मात्र या 'ध्वनि'कडे आज वेगळ्या दृष्टीने पाहावयास हवें तत्का-लित साहित्य–समीक्षकांना ध्वनि हें दुय्यम स्वरूपाचें मत वाटलें याचें कारण 'ध्वनि'ला रसा इतकें स्पष्ट महत्त्व त्यांच्या पूर्वीच्या साहित्यकारांनी दिलें नाही एक हें, दुसरें म्हणजे ह्या मूल्याचें स्वरूप रसाइतकें स्पष्ट नाही. व त्याच्या मागे सामाजिक संकेत हे अधिक अस्थिर स्वरूपाचे आहेत. रसापेक्षां त्याचें स्वरूप अधिक तरल व व्यक्तिनिष्ट आहे. एका दृष्टीने आपल्या कालाच्या व्यक्तित्वाला जवळ असणारें असें ध्वनि हें मूल्य आहे.

रस नाही. व म्हणून ध्वनीकडे आज आपण ः रा वेगळ्या आदरशील दृष्टीने पाहावयास हवें आजच्या आपल्या 'सूचकते'चे मूळ ध्वनींत आहे रसांत नाही. याचाच अर्थ असा की ध्वनि हे गतिमान साहित्यमूल्य आहे रस हें स्थायी आहे.

'रस' ह्या साहित्यमूल्याला एक विशेष असे सामाजिक अंग आहे. रस हे मानवी मनांतील भावनांच्या उत्कटतेवर आधारलेले आहेत. ज्या मानवी भावना काव्यविवेचनांत आधारास घेतल्या आहेत, त्या 'स्थायी' आहेत, असा रस-विचार पुरस्कार करणाऱ्यांचा आग्रह आहे. व रस-व्यवस्थेला अधिक ठाकठिक व सामाजिक स्वरूप देण्याच्या दृष्टीने साहित्यकारांनी रससंख्या ठरवून दिली आहे. तीत मतभेद असले तरी जे 'रस' म्हणून पुरस्कारलेले आहेत ते सामाजिक स्वरूपाच्या व व्यक्तिगत असणाऱ्या अशा कांही भावनांवर आधारलेले आहेत.

**पूर्व संस्कृतीचें ज्ञान, प्रतीकात्मक—**

पूर्व साहित्यकारांना आपल्याइतकें मानवी मनाचें ज्ञान सुलभ वा स्पष्ट नव्हतें. असें म्हणण्यांत त्यांच्या विषयी अनादर व्यक्त करावयाचा आहे असें मुळीच नाही. वा सर्वज्ञतेचें श्रेय आपणांकडे घ्यावयाचें अशांतलाहि पण भाग नाही. ज्ञानाच्या व सामाजिक जीवनाच्या त्यांच्या अवस्थेंत त्यांना जें कांही ज्ञान झालें ती एक 'संवेदना' होती असें म्हणणें अधिक युक्त आहे. आपल्यासारखें त्यांचें ज्ञान प्रयोगसिद्ध नव्हतें. अशा अवस्थेत जें जें ज्ञान म्हणून मानवी मनास 'स्फुरलें' तें तें त्यांनी कांही प्रतीकांच्या द्वारां ग्रथित करण्याचा प्रयत्न केला. आपणांपर्यंत अशी प्रतीकें आली आहेत. आपल्या आजच्या शास्त्रीय युगांत खरींहि ती प्रतीकें वाटतात. व त्यामुळे त्यांच्याबद्दलचा आपला आदर द्विगुणितहि होतो. एक दोन उदाहरणें घेऊं या. सूर्याच्या प्रकाशांत सात रंग असतात हें आज सिद्ध ज्ञान आहे. त्यांत संशयाचा भाग अल्प. परंतु हें ज्ञान पूर्वर्षींना झालेलें असणें शक्य आहे. त्याचें ग्रथन त्यांनी प्रतीकाद्वारें केलें. व त्याप्रमाणे सूर्याच्या रथाला सात घोडे आहेत, ही प्रतीकरूप कल्पना आपणांपर्यंत

आली आहे. यावरून सूर्यप्रकाशाचे ज्ञान त्यांना झालें पण तें संवेद्य (इंटयूटिव्ह) वा चिंतनस्फूर्त होतें, प्रयोगशील ( एक्स्पेरिमेंटल् ) नव्हतें. दुसरे उदाहरण माणसाची उत्पत्ति वा उत्क्रांति ही माशापासून झाली असावी ही शंका पूर्व-शास्त्रकारांना आली असणें शक्य आहे. तशी शंका आपल्या अवतार कल्पने-मागे असावी असें दिसते. परंतु आजचें जीवशास्त्राचें ज्ञान हातीं घेऊन त्या कल्पनेचे स्पष्टीकरण व पुरस्करण करणें हे अशास्त्रीय आहे, अतएव अयोग्य आहे. संशोधनांत आपण प्रयोगशीलता प्रमाण मानतों, पूर्वी ती नसे.

**रसचर्चा व तिच्या मर्यादा—**

रसचर्चेबाबत आपणांकडे हा प्रकार झाला आहे. व म्हणून हीं उदा-हरणें दिलीं. रस-विवेचन करतांना आधुनिक संशोधनाने सिद्ध झालेलें मानवी मनाचें स्वरूप आधारास घेऊन रसाच्या साहित्यक्षेत्रांतील सार्व-भौमतेची द्वाही आजपावेतों झालेली आहे. रस हें मुद्रणपूर्व अवस्थेंत मह-त्त्वाचें मूल्य वाटलें तरी आज त्याचें अवास्तव महत्त्व गणणें योग्य नाही. या प्रयोगसिद्ध अशा मानसशास्त्राची बैठक संवेद्य अशा पूर्वसाहित्यकारांच्या प्रणालीला देण्याचा प्रयत्न केल्याने खूपच अडचणी निर्माण झाल्या आहेत. त्यांची कशीबशी सांधेजोड करण्याचा प्रयत्न झाला आहे. तेव्हा रस हे मुद्रित-साहित्ययुगापूर्वीचें साहित्यमूल्य होय. आपल्या कालाचीं मूल्यें वेगळी. असें सरळ सरळ गृहीत धरणे योग्य आहे. व तेंच व्हावयास हवें.

आणि तसें केलें तर पुष्कळ अडचणींचा परिहार होतो. उदाहरणार्थ, स्थायीभाव हे इंस्टिंक्टस् का सेंटिमेंटस्? करुणरसाचा स्थायीभाव कोणता? रस सख्या किती? भक्ति, शांत, बीभत्स या रसांना 'रस' स्थान द्यावें काय इ. इ. प्रश्नांच्या विवेचनाने चर्चेचा गुरुत्वमध्य साहित्याच्या प्रांतांतून निघून झुकत झुकत मानसशास्त्राच्या प्रांतांत जातो. व त्यांतही अशी अनैसर्गिक सांधेजोड करावी लागते. त्यापेक्षा येथली भूमिका मान्य केली तर या विवेचनांतहि सुटसुटीतपणा येणें शक्य आहे. यांत आतापर्यंत ज्यांनी रसचर्चेला एवढें विदग्ध साहित्याच्या दृष्टीने पोषक असें महत्त्व दिलें त्यांच्याबद्दल अनादर दर्शवावयाचा नाही, वा ती चर्चा अनाठायी

आहे असें बिलकुल म्हणावयाचें नाही. ऐतिहासिक दृष्टि स्वीकारली असतां काय निर्णय निघतात तेवढेच मांडावयाचे आहेत.

रस या मूल्याची संस्कृत शास्त्रांत जी चर्चा आहे तिचें स्वरूप हे परिस्थिति सापेक्ष आहे. शेतीच्या व्यवसायाच्या आधाराने व राज्यसंस्थेच्या, धर्माच्या आधारें मानवी समाजाची व मनाची जी स्थिरस्थावर होत होती, तीत स्वतःच्या कालास अनुसरून जसजशी व्यवस्था लावतां आली तसतशी त्या त्या कालांतील साहित्यकारांनी लावलेली आहे. रससंख्येच्या बाबत जुन्या संस्कृत–साहित्यकारांतच जो मतभेद आहे, तो मानवी मनाबद्दलच्या ज्ञानाच्या उत्क्रांतीचा निदर्शक आहे. स्थितिशील संस्कृतींत मनाला पण स्थितिशील करण्याचा वा तें स्थितिशील आहे, असे समजून त्याला विशिष्ट वळण देण्याचा तो एक प्रयत्न आहे. यायोगें आज रसविवेचन हें अत्यंत अनिर्णायक असें झालें आहे.

रस हे व्यक्तिगत भावनेवर व त्यांच्या 'स्थायी' स्वरूपावर आधारलेले आहेत असे म्हटलें जातें. या 'स्थायी' भावना कोणत्या व मानसशास्त्र ज्या 'स्थायी' सांगतें त्या सर्व साहित्याचे वा समाजाचे दृष्टीने स्थायी आहेत काय हा प्रश्न आहे. कदाचित् आज आपणांस नवनवी भर घालावी लागेल. ती नवी भर घालून घेण्यास जुन्याचे अभिमानी तयार होणार नाहीत, म्हणून दोहोंत विभक्ततादर्शक रेषा घालून घ्यावयास हवी.

**आजच्या साहित्यास रस हें मूल्य अपूर्ण वाटतें—**

आज आपणांस साहित्याचें तर राहू द्या पण काव्याचें सुद्धा एकमेव 'मूल्य' रस आहे असें मानणें कठीण जाईल. केशवसुतांच्या "स्फूर्ति" व "आम्ही कोण" यांत कोणता रस मानावा ? व कुसुमाग्रजांच्या "स्वप्नाची समाप्ती"त कोणता रस ? का ही काव्यें नीरस ? कवि अनिल "प्रक्षोभ" हा नवा रस मानावा असें सुचवतात. तर आचार्य जावडेकर 'क्रांतिरसा'-चा आग्रह धरतात. ह्या सूचना कोणी मान्य करावयाच्या ? व अशा किती सुधारणा करावयाच्या ? रससंख्येच्यां बाबतींत तशीच अनिश्चिति. कोणते

रस मानावे याबाबत मतभेद, नवे रस कोणते मानावें हे पण विवाद्य— यावरून असें स्पष्ट होत नाही काय की 'रस' ह्या सम्राटाचें 'सार्वभौमत्व' साहित्य-प्रांतांतून समाप्त झालें आहे !

**जुन्या मराठीला पण—**

जोपर्यंत संस्कृत भाषेंतच प्रामुख्याने साहित्य वा काव्य निर्माण होत होतें तोपर्यंत या रसविष्काराला थोडें महत्त्व होतें. कारण कलावंत हे ह्या शास्त्रांचा अभ्यास केलेले असल्याने त्यांचा त्या शास्त्राच्या अंतिमतेवर विश्वास असे. त्यांचे वाचकहि तसेच असत. त्यामुळे एकदर संस्कृति व साहित्य उतारास लागलेलें असूनहि काव्यांत रसाचा बडेजाव शिल्लक होता.

ज्यावेळी आधुनिक भारतीय भाषांनी आपले साहित्य-संसार मांडले त्याचवेळी खरे सांगायचें तर साहित्य-प्रांतांतली संस्कृतची सार्वभौमता नष्ट झाली. परंतु मराठी-आदि भाषांतील हे नवे साहित्यकलावंत जरी मराठींत लिहिते झाले तरी त्यांच्या बुद्धीचें भरणपोषण संस्कृतप्रणित साहित्यशास्त्राने झालेलें होतें. म्हणून त्या पकडींतून ते सुटूं नयेत यांत कांहीच नवल नाही. तथापि सामाजिक परिस्थिति जी बदलत होती तिला त्यांचा निरुपाय होता. त्यामुळे साहित्यशास्त्रीय संस्कृतप्रणित साहित्यमूल्यें परिपालूनहि, त्यांच्यावर विश्वास असूनहि, त्याच्या साहित्याचे स्वरूप साहित्य-दृष्ट्याहि वेगळं झालें आहे. त्या दृष्टीने डॉ. केतकर यांचा तत्सम दावा, व डॉ. देशमुख ह्याच्या 'मराठीचे साहित्यशास्त्र वेगळे आहे' या म्हणण्याचा विचार जरा सहानुभूतीने करावा लागतो.

कारण रसाविष्कारांत मराठीने आपला स्वतःचा असा जो भक्तिरस आणून सोडला त्यायोगे त्यास प्रमुखरसांत स्थान द्यावं की नाही त्याचा भाव कोणता मानायचा इ. बद्दल वेगळें विवेचन करणें प्राप्त होते. कांही आधुनिकांनी तर देशभक्तिरस मानावा असें सुचविले. त्याचप्रमाणे बीभत्स रसाची अवस्था.

एवंच रसव्यवस्था ही मराठीच्या सुरवातीपासूनच मराठी भाषेच्या साहित्याला अपूरी पडत आलेली आहे. तिच्या कवीनी तिच्यावर कितीहि

अढळ विश्वास दर्शविला असला तरी ती व्यवस्था निश्चितपणें इतिहासकालीन साहित्य–मापानाचें एक मूल्य ह्या दृष्टीने आज तपासावयास हवी. आजच्या काव्याचें वा कलाकृतीचें मोठेपण ह्या मूल्यांच्या आधारें पाहून कळणार नाही. त्यासाठी आधुनिक मूल्यांचेंच साहाय्य घ्यावें लागेल व लागत आहे. जुन्या वाङ्मयांत पंडित-कवींनी 'रस व अलंकार' हीं मूल्यें मानली तर 'संत' कवींनी 'भक्ती' हे मूल्य प्रमाण मानून त्याचे पुढे कोणत्याहि साहित्य-मूल्याची पत्रास टिकवू दिली नाही. शाहीर कवि बोलून चालून अल्पसंस्कारित, त्यांच्या काव्यांत 'रस' आला असला तरी अनुषंगानेच.

**उतरणीस लागलेल्या संस्कृतीचें साहित्यमूल्य, अलंकार—**

रसाच्या मूल्याचे बरोबरीने प्राचीन मराठी व संस्कृत कलाकारांना आदरणीय मानलेलें मूल्य म्हणजे 'अलंकार' हे होय. अलंकारांना अतिरिक्त महत्त्व आले ते कृषि-संस्कृतीच्या उतारावस्थेत. ज्या वेळी कवीच्या ठायीची सृजनशीलता कमी कमी झाली होती, भव्यतेचा साक्षात्कार ज्यावेळीं कवींना प्रभावाने होत नव्हता, जीवनांत कृत्रिमता आली होती, अशा कालांत कवींना पण तशाच तकलुपी साहित्य-मूल्यांचे आकर्षण वाटावे यांत नवल नाही. सुदैवाने आपलें मराठीतलें साहित्य या अलंकारांच्या ओझ्यापासून बरेंच अलिप्त आहे. कारण या उतारास लागलेल्या (भारतीय) संस्कृतीच्या अवस्थेंत जीवंतपणा, प्रवाहीपणा, गतिशीलता...इ. जें कांही शिल्लक होतें, जीवनांत ह्या गोष्टींचें जें कांही अस्तित्व होतें, त्यांचा अविष्कार मराठी साहित्यांतून झाला आहे. व त्याच कारणाने मराठी साहित्याचा तोंडवळा संस्कृत साहित्यापासून पूर्णतया वेगळा आहे. जुन्या व आधुनिक मराठीकडे पाहूनहि अलंकार हे मूल्य आज स्वीकारणीय वाटेल असें वाटत नाही. आज आपल्या कालांतील कवींच्या व साहित्यिकांच्या सृजनशीलतेस व व्यक्तित्वास ते वाव तर देत नाहीच, पण अडगळ मात्र करीत आहे. नव्या साहित्य–शास्त्राने पुरस्कारलेले असे कांही नवे अलंकार बनवावेत असा कांहींचा यत्न दिसतो. जीवनाच्या सांगाती राहण्याची साहित्याची जी सारखी धडपड आहे तीकडे लक्ष दिलें तर असें आढळून येईल की, हें

नवे अलंकार जरी नव्या साहित्यांत असले तरी, त्यांच्या योगाने साहित्याला सौंदर्य प्राप्त झालें असलें तरी, साहित्य–चर्चेत आतां कोणी त्यांना मूल्य मानील असें वाटत नाही.

**मुद्रणोत्तर साहित्यास नवीं मूल्यें हवींत—**

मुद्रणपूर्व कालांत जो साहित्याच्या मूल्य-संशोधनाचा यत्न झाला, त्याचें स्वरूप हे अशा तऱ्हेचें आहे. त्यावरून असें म्हणतां येतें की, मुद्रणाचें आगमन जरी झालें नसते वा उशीरां झाले असतें तरी साहित्याचे मूल्यमापनाचे तंत्र वेगळे झालें असतें असें समजण्यास जागा आहे. संस्कृत साहित्याने पुरस्कारिलेलीं हीं मूल्ये त्याला निश्चितपणें स्वीकारार्ह वाटली नसतीं.

**गद्यास अपूर्व महत्त्व व नवें साहित्य—**

मुद्रणाने गद्याला जें महत्त्व आणले त्याचा परिणाम साहित्यावर विलक्षणच झाला. त्या वेळेपर्यंत साहित्य म्हणजे काव्य असे जें समीकरण होतें तें भंग पावलें. निरनिराळे गद्यप्रधान साहित्य-प्रकार प्रचारांत आले, व त्यामुळे साहित्याचे स्वरूप अंतर्बाह्य बदललें. वाचकवर्ग बदलला, लेखकवर्गहि अधिक व्यापक झाला, त्याच्या बुद्धीचे संवर्धन इंग्रजी संस्कृतीने केलें होते. अशा परिस्थितीत जुनी मूल्यें अपुरीं पडावीत हें क्रमप्राप्त होते. नवविचार परदेशांतून एकदम येऊं लागल्याने जुनी जी विचार वा संस्कृति परंपरा होती–तीहि एकसंध होती असें नव्हे,–एकदम खंडित झाली. व कांही काल संमूढावस्था प्राप्त झाली. कारण जुन्या संस्कृतीत सृजनशीलता राहिलेली नव्हती. नवी–नव्या संस्कृतीची प्रातिनिधिक–पिढी अद्याप व्हावयाची होती. अशा परिस्थितीत एकोणीसाव्या शतकाच्या चवथ्या चरणापर्यंत साहित्य–कर्तृत्व गद्यावर यावें हे अपरिहार्य होते. त्यानंतर मराठी गद्याने जो इंग्रजी ‘अवतार’ घेतला त्याचें आंतरबाह्य भरण-पोषण इंग्रजी विद्येने केलेलें असल्याने साहित्यस्वरूपाचे दृष्टीने त्याचें या देशांतील जुन्या साहित्यपरंपरेशीं दूरचें नातें पोचावें यांत नवल नाही.

**मुद्रणोत्तर साहित्याचें महत्त्वाचें मूल्य—स्वभावलेखन—**

मुद्रणपूर्व संस्कृतीत एकंदर जीवनांतच व्यक्तित्व दर्शनास फार कमी अवसर होता. जास्तींत जास्त जर कोणाचे व्यक्तित्व समाजाचे दृष्टीने

उपयोगात आणले जात असेल तर ते राजा या व त्यासारख्या प्रमुख व्यक्तीचें. त्यामुळे साहित्यांत राजा, पुराणांतील वा ऐतिहासिक व्यक्ति इ. पुरुष व स्त्री श्रेष्ठींना महत्त्व असे. सर्वसाधारण व्यक्तीच्या ठायींचें कर्तृत्व अत्यंत सुप्तावस्थेंत होते. परंतु मुद्रणोत्तर जी संस्कृति आली ( आपल्याकडे ती परकीय सरकारनें आणली हा भाग वेगळा ) तिचे अधिष्ठान व्यक्तिगत कर्तृत्व हें होतें. त्याचा परिणाम साहित्यांत खोल झाला. साहित्यांत पुराण-पुरुष राजपुरुष वा तत्सम व्यक्तीचें महत्त्व कमी होऊन तें साध्या व्यक्तीस आले. त्याच्या भावना, विचार, कामना, वासना, आशा इ. ची कदर निर्माण झाली. अशा या व्यक्ति–कर्तृत्वशील संस्कृतीच्या साहित्याने आपलें आपल्या स्वरूपानुसार मूल्य निर्माण करावें यांत अनैसर्गिक असे कांहीच नाही. साहित्यांत फार मोठें मूल्य या फरकाच्या आधारे निर्माण झाले व तें म्हणजे **स्वभावलेखन** हे होय.

मुद्रणपूर्व संस्कृतीत स्वभावलेखन वा व्यक्ति-दर्शन नाही असे नव्हे. पण त्या साहित्याला त्याची इतकी किंमत वाटली नाही हे खरं. रसविवेच-कांना मनुष्याचें मन भावनांनी युक्त आहे अशी जाणीव झाली होती. तथापि ह्यांच्यापलीकडे 'व्यक्तित्व' आहे, ही जाणीव स्पष्टपणे झाली होती असे दिसत नाही. कांही टीकाकारांना ती झालीहि असेल, पण एकंदर त्या संस्कृतीत पूर्वविचारांना फार महत्त्व असल्याने, व प्राचीन श्रेष्ठीच्या विरुद्ध मतप्रदर्शित करणें अशिष्टपणाचें गमक मानलें जात असल्याने हा विचार मूळ धरू शकला नाही, हे मात्र सत्य आहे.

**रस व स्वभावलेखन—**

'रस' व्यवस्थेंत अभिप्रेत असणाऱ्या भावना व स्वभाव–चित्रांतून व्यक्त होणाऱ्या व्यक्तीच्या भावना, विकार, यांत मूलभूत फरक आहे असें लक्षांत येईल. 'रस'कारांचा या भावना 'स्थायी' आहेत असा आग्रह आहे. त्यांच्या पलीकडे कांही भव्यतर मानवी व्यक्तित्व आहे ही जाणीव त्यांना ,आहेच असें नाही. तशी कांही पुसट जाणीव असती तर कदाचित् नाट्य,

काव्य इ. कलाकृतींकडे 'कलाकृति' म्हणून पहाण्याचा प्रयत्न झाला असता. पण तो विचार जुन्या साहित्य-शास्त्राला अभिप्रेत नाही हे स्पष्ट आहे. या उलट नव्या साहित्य शास्त्रांत विशिष्ट स्वभाव-चित्रणांत ज्या व्यक्तीच्या भावना असतात, त्याही मूलभूत अशा असल्या तरी त्यांच्यामागे मानवी मन वा व्यक्तित्व म्हणून कांही आहे या गोष्टीचा विसर पडत नाही. भावना या जरी सारख्या भासत असल्या तरी त्यांचेकडे पाहण्याच्या ह्या दोन भिन्न भूमिका आहेत, हें विसरून चालत नाही.

आता ह्या 'भावना' स्थायी आहेत कां नाही ? माणूस प्रेम हे राजा-ऐवजी, देशावर, राष्ट्रावर, वा मानवतेवर करूं लागला, तरी 'प्रेम'ही 'स्थायी' भावना आहे की नाही ? असा एक युक्तिवाद करणें शक्य आहे. याला उत्तर असें देतां येईल की, या भावना स्थायी असल्या तरी मानवी मनाचा अविष्कार म्हणून त्यांना महत्त्व आहे. आणि मानवी मन हे गतिशील असल्याने त्या भावनांना आपोआपच गतिशीलत्व प्राप्त होतें. नवे साहित्य त्याला अधिक महत्त्व देतें. जुन्या साहित्य-चर्चेत विचार हा रसावर केंद्रित होतो, तर नव्या चर्चेत तो स्वभाव-लेखनावर केंद्रित होतो. त्यांत व्यक्तित्वाचें एक अविष्करण वा अंग म्हणून भावनांना महत्त्व असतें, मानवी भावनांकडे पाहण्याच्या ह्या दोन जुन्या-नव्या दृष्टि आहेत. त्यांतला फरक लक्षांत घेणें आवश्यक आहे. रसांचा आधार ज्या भावनांवर आहे त्या स्थायी आहेत, मर्यादित आहेत, उलट आधुनिक 'स्वभावलेखन' हे 'सेंटिमेंट'वर आधारलेलें आहे. व हे 'सेंटिमेंट्स' मर्यादित नाहीत.

**पूर्व साहित्यांतील स्वभावदर्शन प्रतीकात्मकच—**

पूर्व संस्कृतींतील ज्ञानकणांकडे ज्याप्रमाणे प्रतिकात्मक दृष्टीने पाहण्याची आवश्यकता आहे, त्याचप्रमाणे त्यांच्या स्वभावलेखनाकडेसुद्धा प्रतिकात्मकतेने पाहणें जरूर आहे. त्यांच्या जीवनकल्पनेप्रमाणे मन हे सत् असत्-सात्विकता, क्रोध इ. प्रवृत्तींनी भरलें आहे. व त्यांचें व्यक्तीकरण विशिष्ट स्वभाव चित्रांतून प्रतीकद्वारां दर्शविलें गेलें. नायक, नायिका, नायक-

मित्र, नायकशत्रु, विदूषक, राणी, इ. पात्रांच्या स्वभावदर्शनाविषयी जे संस्कृत टीकाकारांनी मार्गदर्शन केलें आहे तें या दृष्टीने विचारांत घेण्यासारखें आहे. एकंदरींत जुन्या वाङ्मयांत व्यक्तिवैशिष्ट्याचा भाग अल्प आहे. कारण व्यक्ति व त्यांच्या मनोविकारांपेक्षां तिच्या भावना व त्यांवर आधारलेलें मूल्य 'रस' हें साहित्यदृष्टीने अधिक मोलाचें वाटत असल्याने रसाचे पुढे स्वभाववैशिष्ट्याचा संकोच व्हावा हें उलगडण्यासारखें आहे. उदाहरणार्थ, कालिदासाच्या 'शाकुंतलां'तील दुष्यंत, शकुंतला, कण्व ... इ. पात्रे तत्कालीन प्रातिनिधिक वा ध्येयदर्शी घेण्यापेक्षा विशिष्ट प्रवृत्तींची अशी प्रतीकात्मक घेतली तर त्यांचे सौंदर्य जरा अधिक प्रमाणांत प्रतीत होईल.

**शेक्स्पीअरने हें केलें, —**

स्वभावलेखनाला जर उच्च अशा साहित्य-मूल्याचें स्वरूप कोणी आणून दिलें असेल तर तें शेक्स्पीअरने. शेक्स्पीअरची कांही स्वभाव-चित्रे प्रतीकात्मक आहेत, तर कांही मनाच्या वास्तव ज्ञानांतून निर्माण झालेली आहेत. त्यांचें सारें वातावरण मुद्रणपूर्व—अर्थात मध्ययुगीन—आहे. फक्त व्यक्तीचे मन त्याच्या स्वतःच्या कालाचें. व्यक्तीचे मनोव्यापार ह्या कवीने इतक्या बारकाईनें व कौशल्याने दाखविले आहेत की, नाटक वाचल्यानतर वा पाहिल्यानंतर कशाचा ठसा स्पष्टपणें मनावर उमटत असेल तर व्यक्तीच्या स्वभाववैशिष्ट्याचा. मुद्रणोत्तर संस्कृतीने निर्माण केलेलें हें महत्त्वाचें साहित्यमूल्य आपणांपर्यंतहि आलें आहे, आजहि आपणांस तें प्रमाण मानावे लागतें. तथापि स्वभाव लेखनाचे इतर परिणाम पाहतां ते वाटतें इतकें अंतिम महत्त्वाचे नाही असें आढळून येईल, पण तें पुढे पाहूं.

**साध्या व्यक्ती साहित्यांत आल्या—**

आधुनिक साहित्याचें मोठेंपण स्वभावरेखनाच्या आधारें जितकें समजेल तितकें रसविष्काराचे आधारें समजणार नाही. उलट जुन्या कृतीचें मोठेंपण रसदृष्टीने जितकें समजेल तितकें स्वभावलेखनाच्या निकषावर घासून समजणार नाही. ह्यावरूनच आपल्या कालाचें साहित्य-मूल्य कसें वेगळे आहे ह्याचा उलगडा होईल.

मुद्रणपूर्व कालांत राजे प्रधान इ. व पौराणिक व्यक्ति–यांना साहित्यांत स्थान असण्याचें कारण त्यांच्या व्यक्तित्वविकासाची समाजांत तरतूद होती. सर्वसाधारण व्यक्तींच्या भावना, विकारांस महत्त्व नव्हतें, इ. विवेचन वर आले आहे. पूर्णपणें काल्पनिक व्यक्ति निर्माण करण्यासाठीं समाजाचें व विशेषतः मनासंबंधींचें बरेच ज्ञान असावें लागतें. लेखकाच्या ठायीं तें असलें तरी जो प्रेक्षकवर्ग किंवा वाचकवर्ग लाभे, त्याला तें तसें नसल्यानें दोघांच्या जाणीवेंतील व्यक्ती वापरणें योग्य होतें. पौराणिक प्रसिद्ध व्यक्ती इ. च्या स्वभावासंबंधी विशिष्ट पार्श्वभूमि व संकेत असल्याने दोघांचेंही काम सुकर होणें शक्य होतें.

**'रस' विवेचन स्वभावदर्शनापासून वेगळें—**

आपल्याकडे रसविवेचन ज्या दिशेने गेलें त्याचा परिणाम असा झाला कीं, रसविचारांतच स्वभावलेखन समाविष्ट झाल्यासारखें झाले. कारण रस व व्यक्तिरेखा ह्यांना साधारण असें मानवी मन हें दोहीकडे महत्त्व पावत असल्याने, रसचर्चा ही पर्यायाने मानसशास्त्रीय चर्चा झाल्याने, नीच स्वभावदर्शनाचा मानसशास्त्रीय चौथरा झाल्यासारखें झालें. साहित्यविषयक विवेचनांत तरी स्वभावदर्शनास दुय्यमत्व व रसव्यवस्थेस महत्त्व असा प्रकार झाला. प्रत्यक्ष ललित–कृतींच्या अभ्यासांत मात्र आधुनिक मूल्येंच विचारांत घेतली जातात, हे जातां जातां लक्षांत घेण्यासारखें आहे.

**असें असलें तरी—**

शेक्स्पीअरनंतर ललित वाङ्मयाला अनेक शाखा फुटल्या. अठराव्या शतकांत कादंबरी व कथा निर्माण होऊन ती इतकी लोकप्रियहि झाली कीं, साहित्य म्हणजे प्रामुख्याने कथात्मक साहित्य असा संकेत सर्वत्र रूढ होत गेला. ह्या कथा वाङ्मयाचें परिशीलन होऊं लागले. व त्यांत प्रामुख्याने मनोव्यापारावर–पुढे पुढे स्वभावविश्लेषणावर–भर दिला गेला. व्यक्तित्वाला जें अपूर्व महत्त्व प्राप्त होत होतें त्याचा हा एक परिपाक होता असें म्हणतां येईल.

आपल्याकडील आधुनिक साहित्याची वाढ ही इंग्रजी साहित्याच्या अनुकरणाने वा मार्गदर्शनाने झालेली आहे. त्यामुळे आपण 'स्वभावदर्शन'

हे साहित्याचें एक अत्यंत महत्त्वाचें गमक मानतों. त्याला आपल्याहि आधुनिक टीकाशास्त्रांत अतीव महत्त्व आहे हें अमान्य करतां येत नाही. मुद्रणपूर्व संस्कृतीने 'रस' हे साहित्यमूल्य मानलें; तर मुद्रणोत्तर संस्कृतीतील साहित्य मूल्य-विचार हा स्वभावलेखनाभोवती घोटाळतो आहे, असें म्हणतां येईल. आजहि मानवी मनाचें सूक्ष्मांत सूक्ष्म व्यापार जो लेखक चित्रित करील तो श्रेष्ठ लेखक आहे असे आपण मानतों. हे स्वभावलेखनास आलेल्या अतिरिक्त महत्त्वाचे दर्शक नाही काय ?

**वा स्त व ता—**

व्यक्तिदर्शनाचे परिणाम आधुनिक साहित्यावर फार खोल झाले आहेत. त्यांचे आधाराने आणखी कांही नवी मूल्ये निर्माण झाली. त्यांचा एकेकांचा उल्लेख करणें आवश्यक आहे. विज्ञानशास्त्राच्या आधारें जी प्रयोगसिद्ध सत्यासाठी साधना सुरू झाली तिचें आकर्षण जबरदस्त होते. त्याच-प्रमाणे व्यक्तीच्या भावना अधिकाधिक पिंजून दाखविणे गद्याच्या अंगगत सहजतेमुळे शक्य झालें. त्याशिवाय मुद्रणपूर्व साहित्यांत कल्पनाशक्तीवर जो विलक्षण भर दिला जात असे त्याची प्रतिक्रियाहि होणें शक्य होतें. अशा दोन तीन कारणांचा साहित्यांत परिणाम झाला व एक नवें मूल्य उदयास आले तें मूल्य म्हणजे वास्तवता हे होय.

स्वभाव-दर्शनाइतके किंवा स्वभावदर्शनापेक्षाहि अधिक महत्त्वाच असे वास्तवता हे मूल्य आहे. आज वास्तवतेच्या निकषावर कोणतेंहि काव्य वा कलाकृति घासून पाहून तिचें वैगुण्य दर्शवितां येतें. किंबहुना विशिष्ट स्वभावचित्रांत, वर्णनांत वास्तवतेचा भाग किती हें पाहावें लागतें. वास्तवतेला हे अतिरिक्त महत्त्व आलें त्याचें कारण म्हणजे गद्याला आलेलें अपरिहार्यत्व हे होय. गद्याचे योगाने मानवी जीवितांतील क्षुल्लक प्रसंगही वर्णन करतां येऊ लागले. फोटोग्राफीच्या शोधाने साध्या साध्या दृश्यांतही सौंदर्य आहे असें वाटूं लागले, आणि चित्रकलेंत किती काल तरी अशा प्रकारच्या वास्तवतेचा बडेजाव माजला. कारण अगदी क्षुद्र प्रसंग क्षुल्लक गोष्टी, क्षुल्लक दृश्यें कलात्मक असतात, या जाणिवेने एक नवा साक्षात्कार

तत्क्षेत्रीय कलावंतांस झाला. साहित्याचे क्षेत्रांत गद्याचे आगमनाने तोच प्रकार झाला आहे असें आढळून येईल.

**वास्तवतेची बिजे—**

वास्तववाद अशा रीतीने आज शुद्रसाहित्यक्षेत्रीय मूल्य झालें तोच त्याचा उगम हा जीवनांत नवीन सुधारणा झाल्याने ज्या गोष्टी आल्या त्यांत आहे. याद्दृष्टीने फोटोग्राफीचा उल्लेख अवश्य तपावयास हवा. 'कला ही कलात्मकता कोठे आहे हे लपवून ठेवण्यांत आहे' (आर्ट् लाइज इन् कन्सीलिंग आर्ट्) अशा प्रकारचे एक नवेंच सौंदर्य गमक मनुष्याला मिळाले. शास्त्राचा अभ्यास होऊं लागला होता, त्यांतून सत्याचे, ज्ञानाचें महत्त्व पटत होतें, व वास्तव दृष्टीने पाहण्याची ही वृत्ति वाढत होती, ती साहित्य क्षेत्रांत वास्तवतेच्या रूपाने अवतरली असें म्हणत येत.

शास्त्राच्या आगमनाने मानसिकहि परिणाम बराच झाला. अद्भुतांत व परीकथांच्या गोष्टींत रमणारें मानवी मन जमीनीवर आलें, त्यास साधी माणसें, त्यांचे हावभाव, हालचाली, शहाणपणा, मूर्खपणा यांबद्दल सहानुभुति, आपलेपणा निर्माण झाला. या सर्व गोष्टीचा एकत्रित व संमिश्र संनिकर्ष म्हणजे वास्तववाद होय.

जरा आश्चर्य वाटण्यासारखी परिस्थिति अशी की, ज्यावेळी वास्तववादाचा उदोउदो व्हावयास लागला त्याच वेळी जणुं त्याला प्रतिक्रिया म्हणूनच की काय ध्येयवादाचा पण तितक्याच कंठरवाने पुरस्कार होऊं लागला. वस्तुस्थिति अशी होती की, वास्तववादाचें महत्त्व व मोठेपण अमान्य करणे अशक्य होते. शास्त्राने युग येवढे काबीज केलें आहे – होतें–की, त्या युगाचे साहित्य हें वास्तववादी व्हावें हेहि पण अपरिहार्य होतें. वास्तववादी साहित्य लोकप्रिय होण्यास एक आणखीहि कारण होते. विज्ञान शास्त्राचा प्रसार होऊं लागला, नवी नवी भौतिक शास्त्रें व समाजशास्त्रे जीव धरून वाढीला लागूं लागलीं होती. ह्या शास्त्रांनी जीवनांत

क्रांति घडून आली, तशी बौद्धिक क्षेत्रांतहि घडून आली. व ती म्हणजे धर्मग्रंथांवरला माणसांचा विश्वास हळूहळू नष्ट होऊं लागला. धर्मग्रंथांतलीं तत्त्वें वा माणसें ह्यांच्याभोंवतीं आजपावेतों जें अद्‌भुताचें वलय होतें तें नष्ट झालें. त्यांनाहि सर्वसाधारण माणसाप्रमाणे भावना होत्या, ही जाणीव झाली, व त्यांचीं स्वभाव-चित्रे त्या दृष्टीने रेखाटलीं जाऊं लागली. त्यांतून 'स्वभावलेखन' निर्माण झालें. शुद्ध साहित्याच्या दृष्टीने या घडूं लागलेल्या स्थित्यंतराचा असा फरक झाला की, माणसाचे मन अद्‌भुतावरून उठले. तें वास्तवावर खिळूं लागलें. या कालांतच उत्तम वास्तववादी साहित्य लिहिलें गेलें. व तें लोकप्रियहि झालें. इंग्रजीतील डिकन्सचें तसेंच आपल्या-कडील हरिभाऊंचें वाङ्मय ह्या दृष्टीने आधारास घेतां येईल.

परतु शास्त्र जसजसे वाढीला लागलें तसतसें नवें नवें ज्ञान, नव नवे नियम, उपलब्ध होऊं लागलें. त्यामुळे शास्त्रीय सत्यालाहि अपरिहार्यपणे मर्यादा पडल्या. आणि मग साहजिकपणेच वास्तवाच्या स्वरूपाबद्दलची अधिक चिकित्सा सुरू झाली. वास्तवाचे नवे नवे पर्याय पुढें येऊं लागले.

**लघुत्व–प्रधान प्रकारांची सुरवात –**

रसानंतर व स्वभावलेखनानंतर कांही काल साहित्यांत अत्यत महता पावलेलें असें (वास्तवता) हें मूल्य आहे. दीर्घताप्रधान साहित्य प्रकारांत हे अधिक भडकने दर्शविणे शक्य होतें. परंतु लघुतापूर्ण प्रकार सुरू होत होते. त्यांच्यासाठी स्वभावलेखन, वास्तवता ही दोन्ही मूल्यें अपूरी आहेत अशी जाणीव झाली. कारण घाईचें जीवन, मुद्रण सुलभता, सामान्य व्यक्ति-भावनांना महत्त्व व यांत्रिक प्रगति, या सर्वांचा साहित्यांत असा परिणाम झाला की, भावगीत, लघुकथा, लघुनिबंध, नाट्यछटा......इ. लघुताप्रधान वाङ्मय–प्रकार रूढ झाले. दीर्घ कथा वा कादंबऱ्या ह्या होत असल्या तरी लोकप्रियतेचा कल लघुत्वप्रधान प्रकारांकडेच वळला. साहजिकपणें ह्या वाङ्मय-प्रकारांना परवडणारी मूल्यें शोधण्याचे काम सुरू झालें. कारण मोठ्या कृतीत व्यक्तीचा स्वभाव पूर्णांशाने दर्शविणे शक्य होतें. पण छोट्या कथेत तो कसा दाखविणार ? त्याचप्रमाणे सवच ठिकाणी रूढ अर्थाने वास्तवता पाळणे शक्य

आहे, असें वाटेना व म्हणून या प्रकारांना सोयीस्कर असे स्वरूप या मूल्याना कसें देतां येईल इकडे लक्ष वळलें.

लघुत्वप्रधान असे जे साहित्यप्रकार होते त्यांत सहजपणाच्या वा वास्तवतेच्या योगाने नवें तत्त्व शिरलें व तें म्हणजे **परिमाणाच्या एकतेचें**. लघुकलाकृतीने कोणत्यातरी प्रकारचा एक परिणाम मनावर घडवून आणावा. मग तो कशानेहि साधलेला असो. भावना, विचार, कल्पना, अनुभव, संकेत, प्रतीक...इ. पैकी कोणतेंहि असलें तरी एकच असावयास हवे. त्यांत दुसऱ्या कशाची मध्यस्थी नको, असा आग्रह सुरू झाला. परिणामैक्याचें हे मूल्य आज आपणांस स्वीकार्य वाटणाऱ्या मूल्यांपैकी एक आहे. अर्थात त्याचें महत्त्व मर्यादित आहे हें मान्य झालें की पुरे. किंचित् बारकाईने पाहिलें तर या परिणामैक्यांतहि जर एखादा दुसरा निराळाच सूर असेल, व त्याने कलाटणी दिली असेल तर ती अधिक मनोज्ञ वाटते. नाट्यासारख्या प्रकारांत ऐक्यत्रयी ( थ्री यूनिटीज )चें तत्त्व परत शिरलें. व स्थळ, काल, कृति, यांत एकमेळ वा सहजता असावी असा आग्रह सुरू झाला. आज आपणांसहि हे विशेष अमान्य आहे असें म्हणतां येत नाही. परतु हे सर्व विशेष वास्तवतेच्या मूल्याचे उपपरिणाम आहेत हें विसरून चालणार नाही.

वास्तवता म्हणजे काय हे कलावंताचे व टीकाकारांचें मतें शोधणे मौजेचें असलें तरी येथे आवश्यक नाही. वास्तवतेमागे लोकप्रियता होती. तिच्याविषयी जबरदस्त आकर्षण होतें व त्यामुळेच तिचें स्वरूप कलावंताच्या प्रवृत्ती, अभिरुची. प्रयोजन यांचेप्रमाणे भिन्न भिन्न होऊं लागलें. एका बाजूने अद्‌भुताचे केवळ पंख काढलेलें साहित्य वास्तवतेत येऊं लागलें. दुसऱ्या बाजूने वर उल्लेखिल्याप्रमाणे शास्त्रीय सत्यशोधक प्रवृत्तीचा अवलंब होऊं लागला. त्याच्या या सर्वकर्ष स्वरूपामुळेच–असे म्हणता येईल–की, वास्तववाद हें महत्त्वाचें वाङ्‌मयमूल्य असूनहि ते नसेनासें झाले.

**वास्तवतेबाबत मतभेद—**

जेव्हा कलावंतांचा वास्तवता म्हणजे काय ह्याचा शोध सुरू झाला तेव्हा त्यांत मतभिन्नतेप्रमाणे निरनिराळे पर्याय सुरू झाले. वाचकांवर

वास्तवचित्रणाची जी जबरदस्त मोहिनी होती तिची व कलावंताच्या वास्तवतेबाबतच्या कल्पनेची वजावाट होऊन निरनिराळे प्रयोग सुरू झाले. त्यांत कित्येकांना शास्त्राची संशोधनाची पद्धति स्वीकारावीशी वाटली व शास्त्रीय सत्यसंशोधनांत ज्याप्रमाणे सत्याच्या दृष्टीने सर्वच बारीक सारीक गोष्टींना महत्त्व असतें तसें वाङ्मयाच्या बाबतींत आहे, असा कित्येक कलावंताचा समज झाला.व समाजांतल्या पुष्कळच किरकोळ बारीक सारीक गोष्टींना साहित्यांत स्थान मिळालें. त्या गोष्टी तशाच दाखविणें ही वास्तवता असा प्रचार सुरू झाला. याचा परिणाम असा झाला की, प्रमाण, परिणाम, प्रकार, यांचें वास्तवतेंत असणारें अवधान सुटले; ते मूल्य उपकारक न ठरतां मारक आहे असें पण वाटूं लागले.

**ध्येयवाद हें साहित्य मूल्य—**

वास्तवतेचा आणखी एक परिणाम असा झाला की आहे असें रंगविणे हे सत्य नव्हे. कारण खरी सत्याची उपासना ती होऊं शकत नाही. तर आदर्श असें जीवन रंगविणें आवश्यक आहे, की जे वास्तव वा सत्य असू शकेल. कारण आहे या वास्तव चित्रणांत कलात्मकता अशी कमी व त्या योगे जीविताविषयी आस्था वाटत नाही. ती जर वाढावयाची असेल तर अशा आदर्शवास्तवतेचें चित्र साहित्यांत असावें. या विचारसरणीच्या पोटी ध्येयवाद जन्मास आला. साहित्याचे मूल्य ध्येयवाद असावें असे मत रूढ होऊं लागलें. त्याचें पण आकर्षण कलावंत व वाचक यांना वाटूं लागलें.

साहित्यक्षेत्रांत वास्तववादापेक्षा ध्येयवाद हे मूल्य वास्तवप्रेमाचा भर ओसरल्याबरोबर उदयास आलें. शास्त्राचें अंतिम ध्येय काय असावे हा जसा शास्त्रीय संशोधनांत महत्त्वाचा प्रश्न निर्माण झाला तसेंच साहित्य-क्षेत्रांतहि झाले, .व त्यांतून वाङ्मयीन ध्येयवाद वा ध्येयवादी वाङ्मय निर्माण झालें.

ध्येयवाद· हें वास्तववादापेक्षा अधिक उच्चतर मूल्य आहे असं कल्पितां येतें. परंतु ध्येयवाद म्हणजे काय हा पुन्हा प्रश्न निर्माण होतो.

ध्येयवादाचा जीवितमूल्यांशी निकटचा संबंध असल्याने, समाजाच्या जीवितमूल्यांची ज्या कलावंतांस अधिक सुस्पष्ट कल्पना होती त्यांनाच ध्येयवादी साहित्य निर्माण करणें शक्य होतें. सर्वसाधारण कलावंताच्या मागे एवढी भव्य भूमिका असेलच असे नाही. त्यामुळे साहित्याच्या सरस-निरसतेचें ध्येयवाद हे मूल्य होणें जरा कठिणच आहे. ध्येयवादाची जीवन-मूल्याशी जसा निकटचा संबंध आहे, तसा साहित्याचा पण आहे. सर्व-साधारण कलावंताला जीवितमूल्यें कोणतीं इ. संबंधी विशेष सुस्पष्ट कल्पना नसली, तरी समाजांत जी जीवितमूल्यें रूढ असतात वा सर्वमान्य झालेली असतात तिकडे जाण्याचा सर्व साहित्याचा रोख असतो. साहित्यांत ध्येय-वादाला आदर्शवादाचें स्वरूप येतें. व ध्येयवादाचें हें आदर्शवादी स्वरूप मात्र चिरंतन महत्त्वाचे असे वाटणें शक्य नाही. शिवाय शास्त्राभ्यासाने चिकित्सक वृत्ति एवढी वाढली आहे, इतक्या प्रचंड स्वरूपांत घडामोडी होत आहेत की, हृदयाशी बाळगिलेल्या निष्ठांच्या अढळत्वाबद्दल शंका येऊं लागली आहे. आणि अशा परिस्थितीत काल्पनिक आदर्शावर आधारलेले ध्येयवाद हे मूल्य बिलकूल उपयोगी पडणार नाही, असे वाटूं लागतें.

तसेंच या ध्येयवादासंबंधी वा आदर्शासंबंधी बरेच मतभेद होणें शक्य होतें एकाच्या ध्येयभूत चित्राविषयी सर्वमान्य असे मत प्रस्थापित होणें कठीण. अशा परिस्थितींत हें पण मूल्य तसेंच अर्धमान्य राहिलें असें म्हणावें लागतें.

## साहित्याचें मूल्य कलात्मकता—

वास्तववाद, ध्येयवाद, यांचें मूळ जीवनाच्या इतर क्षेत्रांत घडून येत असलेल्या घडामोडीत आहे. इतर शास्त्रे जशीं स्वतंत्र झालीं, वाढीस लागलीं तसें साहित्य हे एक स्वतंत्र क्षेत्र आहे. आणि या क्षेत्रांत जर अधिसत्ता कोणाची असेल तर त्या क्षेत्रांत निर्माण झालेल्या व त्या क्षेत्राला अनन्य-साधारण असणाऱ्या एखाद्या साहित्य-मूल्याची. त्याची प्रतिष्ठा

झाले पाहिजे असा आग्रह सुरू झाला. साहित्याचें मानवी मनाला जें विलक्षण आकर्षण आहे त्याचें स्वरूप आतांपावेतों तरी गूढ आहे. साहित्यांत जी कलात्मकता आहे तिच्या मोहिनीचा हा परिणाम आहे, असें कांहींचें मत आहे. आणि साहित्याच्या क्षेत्रांत जर अधिसत्ता कोणाची असेल तर ती कलेची--कलात्मकतेचीच--असावी, असें म्हणणाऱ्या कलावादी लोकांचा संप्रदाय निर्माण झाला होता तो वाढीस लागला. व कला हें साहित्यमूल्य झालें.

कलात्मकतेची ही जी विशिष्ट जाणीव आहे तीहि मानवी संस्कृतींच्या एका अवस्थेंत निर्माण झाली आहे, हें विसरून चालत नाही. यंत्राने जीवनाची समृद्धि वाढविली, उत्पादन वाढलें. तसें दारिद्र्य वाढलें व कंगालपणा वाढला. ज्यांच्या वाट्याला दारिद्र्य आलें, त्याच्यापैकी ज्यांच्याजवळ कांही कुवत शिल्लक होती, ते साहजिकपणें जीविताकडे वेगळ्याच दृष्टीने पाहूं लागले. त्यांना साहित्याच्या ठायींच्या कलात्मकतेपेक्षा इतरच जाणिवा झाल्या. उलटपक्षी ज्यांच्या वाट्याला समृद्धि, सुख, समाधान, आलें त्यांना साहजिकपणेंच कलात्मकतेचें दर्शन झाले, जीवितांतली कलात्मकता त्यांना प्रतीत झाली. आपण वर म्हटल्याप्रमाणे जें व्यवसाय-भिन्नत्व आस्तित्वांत आलें त्यांत साहित्य क्षेत्रांसाठी कला हें मूल्य असावें असें वाटूं लागलें.

कलावाद्यांचे मतें वास्तवता, स्वभावदर्शन मनोविश्लेषण ... इ. मूल्यांनी साहित्यांत महत्त्वाची भर घातली असली तरी साहित्याचें 'साहित्यत्व' त्यांचे अतिरिक्त पुरस्कर्ते नष्ट करीत आहेत. साहित्याचे श्रेष्ठत्व कलात्मकतेंत आहे. व त्या दृष्टीने साहित्याचें मूल्य 'कला' हें असावें. कलावादी दृष्टिकोणाचें सविस्तर परीक्षण या पुस्तकांतून इतरत्र येणार आहे. येथे फक्त तें एक महत्त्वाचें साहित्यमूल्य गणले गेलें, हें गृहित धरलें की पुरे.

ही एक प्रतिक्रिया आहे हें लक्षांत घेतलें पाहिजे. कारण साहित्यांत कलात्मकता हवी हें कोणीहि मान्य करील. परंतु कलात्मकता म्हणजे काय हें प्रत्यक्ष कलावादीहि सांगूं शकणार नाही. तो फारतर त्याच्या

दृष्टीने श्रेष्ठ अशा कृती उदाहरणें म्हणून दाखवूं वा लिहूंहि शकेल. परंतु त्याच्या मताशीं सर्वथैव सहमत होणें हें कठीण आहे. या असंदिग्ध-पणामुळे 'कला' हें मूल्य कितीहि आकर्षक आहे असें वरवर वाटलें, तरी तें तितकेंसें स्वीकारणीय वाटत नाही. कारण त्यांत कलात्मकतेच्या नांवा-खाली तंत्रशुद्धतेवरच भर दिलेला दिसून येतो. किंबहुना वर उल्लेखिल्या-प्रमाणे एकप्रकारच्या विस्मृतिवादांतून कलावादाचा जन्म झाला असल्याने साहित्याचा जीवनाशी संबंध तुटतो. तें साहित्य अधिक स्वप्नाळू वा दुबळे व एकप्रकारें स्थितिशील होत जातें. साहित्याकडे अधिक आस्थेने पाह-णारांना अर्थातच हें सहन होत नाही; व पुन्हा याहि विचारसरणीवर आणखी प्रतिक्रिया सुरू होते. विरोधी मताभिमान्यांकडून साहित्याचें मूल्य 'जीवन' हें असावें असें पुरस्कारण्यांत येतें.

तत्पूर्वी आणखी एका मूल्याचा उल्लेख करणें प्राप्त आहे ते म्हणजे मनोविश्लेषण हें होय.

**मनोविश्लेषण—**

वास्तवतेचा स्वभावदर्शनाच्याः व व्यक्तित्वाच्या अनुषंगाने फार मोठा दीर्घगामी परिणाम झाला. यांच्या प्रतिक्रियेतून हें नवें आकर्षक मूल्य जन्मास आले. मानसशास्त्र हें जें नवें शास्त्र निर्माण होऊं घातलें होतें त्याच्या आधारें मानवी मनाचें सत्यस्वरूपसंशोधन सुरू झालें, व त्यांतून मनोविश्लेषणाचा उदय झाला. तें कलावंतांस आकर्षक वाटणें शक्य होतें, विशेषतः व्यक्तिदर्शन व वास्तवता यांचा योग्य प्रमाणांत आविष्कार करण्यास वाव देणारें मूल्य म्हणून या मनोविश्लेषणाचा साहित्यांत पुरस्कार होणें शक्य होतें.

मनोविश्लेषणाने साहित्यस्वरूपांत पुन्हा क्रांति केली. जुनी मूल्यें अपुरी वाटूं लागली, व मनांत येणारे सर्व विचार विकार त्यांचें योग्य—अयोग्य स्वरूप, प्रयोजन, प्रमाण इ० न पाहतां साहित्यांत ते येऊं लागलें. व त्यामुळे त्याविषयी प्रथम जें आकर्षण वाटले तितकें पुढे वाटेनासें झालें. मनोविश्ले-षणाने मनाचें एका दृष्टीने जरी सत्यस्वरूप दर्शविलें जात होतें, तरी त्यायोगें

साहित्यांत दोन उणीवा राहूं लागल्या. एक व्यक्तिमत्त्व हें स्वयंपूर्ण व समाज-निरपेक्ष आहे अशी कल्पना रूढ झाली. आणि जीवन व हें असें साहित्य ह्यांत अंतर पडूं होऊं लागलें. दुसरी उणीव अशी की, या प्रयोगाच्या आहारी गेल्याने साहित्याचें कलात्मकतेशी दूरचें नातें पोचूं लागलें. म्हणून त्यावर प्रतिक्रिया झाली, त्यापैकी सर्वांत महत्त्वाची प्रतिक्रिया कलावाद्यांची. तिचा उहापोह वर आलाच आहे.

**जीवन-साहित्य--**

कलावादी संप्रदायाला विरोध करणारी प्रमुख विचारसरणी म्हणजे जीवन हेंच साहित्याचें मूल्य असावें ही होय, असा उल्लेख वर आला आहेच. हीहि विचारसरणी कलावाद्यांच्या विचारसरणीसारखीच संदिग्ध आहे. तीत साहित्याचें मूल्य जीवन असावें असें पुरस्कारिलें असलें तरी साहित्य जीवनोपयोगी असावयाचें म्हणजे काय, हा प्रश्न अनिर्णितच राहतो. एका बाजूने साहित्यांत जीवनाचें प्रतिबिंब असावें ह्याचा अर्थ इतिहासांत जशा प्रचलित सर्व चळवळींचा उल्लेख आवश्यक असतो तसेंच साहित्याचे बाबती-तहि व्हावें. म्हणजे केवळ साहित्यावरून समाजाचा राजकीय सामाजिक इतिहास समजावा, असा आग्रह सुरू झाला. तर जीवनाचें ध्येयदर्शी चित्र आलें तरी पुरे असाहि त्याचा दुसरा अर्थ मान्य करण्यांत आला. वरवर ही विचारसरणी जरी स्वीकारणीय वाटली तरी निश्चित साहित्य-विषयक वा कलाविषयक दृष्टिकोण स्पष्ट होत नसल्याने, वा दोहोंचा कसातरी सम-वाय करण्याचा हा प्रयत्न असल्याने साहित्याचें मूल्य जीवन, हें मत त्यांतील अनिश्चिततेयोगें स्वीकारणीय वाटत नाही. एका दृष्टीने कलावाद्यांच्यापेक्षा हे जीवितवादी अधिक संभ्रमांत आहेत असें म्हणावें लागतें.

**पुरोगामित्व—**

परंतु जीवनवादित्वाला एक विशिष्ट वळण मिळण्यास एका मोठ्या विचारसरणीचें साहाय्य झालें. ती विचारसरणी म्हणजे साम्यवादी विचार-सरणी होय. साम्यवादाचा उगम उद्योग-संस्कृतीच्या विशिष्ट अवस्थेंत झाला. उद्योग--संस्कृतीने मानव संस्कृतीची किती प्रगति केली, व अधोगति

कुठे केली हे दाखविण्यासाठी नेमके बोट ठेवण्याचा प्रयत्न या विचारसरणीने केला आहे. एकोणीसाव्या व विसाव्या शतकांत अत्यंत प्रभावी अशा विचार-सरणींत तिला अग्रस्थान द्यावे लागेल. इतिहास, मानवीजीवन, कर्तृत्व, संस्कृति, शास्त्रें ... इ. सर्व जीवनांगांची मानवी जीवनाचे दृष्टीने पाहणी करणें हे या विचारधारेचें प्रमुख कार्य होय. मानवीजीविताचा मनुष्याने बुद्धीच्या जोरावर जो विकास केला आहे, त्याच्या अनुरोधाने विश्वाचें केंद्र मनुष्य हेच धरावे लागते. आणि या दृष्टीने मानवीजीवन हे अत्यंत उन्नत होत आहे, प्रगतीकडे जात आहे, असा आग्रहाचा निष्कर्ष या विचारसरणीने काढला. तो मान्य करावयास प्रत्यवाय दिसत नाही. मनुष्याचे जीवन व संस्कृति निरनिराळ्या अंतर्विरोधाने भरलेली असली तरी, मानवीजीवन संकटमय असले तरी, ते सर्वसाधारणपणे प्रगतीकडे जात आहे असें दिसते. साम्यवादाच्या अनेक अंगांपैकी साहित्यक्षेत्रावर ह्या वैशिष्ट्याचा फार परिणाम झालेला आहे साहित्याच्या पुरोगामित्वाचा उगम या दृष्टिकोणांतून झाला आहे.

पुरोगामित्व हे गेली कांही वर्षे अत्यंत महत्त्वाचे असें साहित्यमूल्य होऊन बसलें आहे. वास्तवतेप्रमाणे त्याचे पण निरनिराळें स्पष्टीकरण होऊं लागलें, त्याचे निरनिराळे पर्याय पुढे येऊं लागले. परस्पर विरोधी मतेंहि पण या नांवाखाली पुढे येऊं लागली. गेल्या कांही वर्षाचा साहित्यविचार ह्या पुरोगामित्वाच्या विचाराभोंवती फिरत आहे.

**पुरोगामित्वा संबंधी मतभेद—**

परंतु "पुरोगामित्व" म्हणजे काय यासंबंधी टीकाकारांत वा कलाकारांत एकमत असणे असंभवनीय दिसते. केवळ पुरोगामित्व हा शब्द आकर्षक वाटतो हे खरें. तथापि कित्येकांना तर 'पुरोगामी' ही कल्पना साहित्याला वा कलेला लावणें अयोग्य वाटूं लागतें. उलट कांहीच्या मतें सारें साहित्य व कला ही निश्चितपणें पुरोगामीच असते. तिच्यांत प्रतिगामित्व संभवतच नाही. अर्थातच पुरोगामित्व हें पुन्हा एकवार त्याच्या मागच्या अशा संदिग्धतेमुळे सर्व साहित्याला उपयोगी पडेल असें निर्णायक मूल्य होऊं शकत नाही. कारण त्यामागले संकेत हे अद्याप सर्वमान्य नाहीत.

### साहित्याचा विषय व्यक्ति—

वास्तववाद, पुरोगामित्व ... इ. विचारसरणी जशा विशिष्ट परिस्थितीचा परिपाक म्हणून निर्माण झाल्या तशीच 'साहित्याचा विषय व्यक्ति' ही विचारसरणी होय. विज्ञानशास्त्राने सामाजिक, राजकीय, असें जें स्थित्यंतर घडवून आणलें त्याचें एक अंग म्हणजे राजसंस्थेचें व्यक्तित्वावर आक्रमण हे होय. व्यक्तित्वाचें क्षेत्र व कक्षा अकुंचित होऊं लागल्या, ही जाणीव विचारवंतांत फार जोराने वाढीला लागली. आणि समाजाच्या इतर सर्व क्षेत्रांत व्यक्तित्वाचा जो भुगा होत आहे, त्याला अनन्य–साधारण असें महत्त्व साहित्याच्या क्षेत्रांत असावें. समाजाचा लहानांत लहान घटक हा ज्या अर्थी व्यक्ति आहे, त्या अर्थी व्यक्तित्वावर जो घाला येत आहे तो परतविण्यासाठी व्यक्तीच्या हक्कांच्या पालनाची हमी घेतली गेली पाहिजे. यासाठी साहित्याचें अंतिममूल्य व्यक्ति हें असावें. कारण साहित्यांत व्यक्तित्वालाच महत्त्व आहे. असा एकंदर या विचारसरणीचा रोख दिसतो.

व्यक्तीच्या हक्कसंरक्षणासाठी जशी तरतूद व्हावयास हवी, तशी वास्तविक तिच्या कर्तृत्वाची पण तितक्या साक्षेपाने घोषणा व्हावयास हवी. परंतु व्यक्तित्ववादी संस्कृतीतून हें मूल्य निर्माण झालें हें विसरून चालत नाही. शिवाय व्यक्तिकर्तव्यावर भर देण्यापूर्वी व्यक्तीच्या सामाजिक सुरक्षिततेची हमी द्यावयास पाहिजे. पण तसें करणें व्यक्तिस्वातंत्र्याच्या विशिष्ट कल्पनेंस विरोधी दिसत असावें. तशी हमी देण्यास असमर्थ असणें हेंच उद्योगसंस्कृतीचें वैगुण्य. परंतु ती संस्कृति आता संपत आहे, साहित्याच्या दृष्टीने तर तें मूल्य मुळीच स्वीकारणीय वाटत नाही. व्यक्तित्वाच्या संकुचित कोशांतून बाहेर पडण्याची आज आवश्यकता निर्माण झाली आहे. जे कलावंत या कोशांतून बाहेर पडूं शकत नाहीत, त्यालाच जे अंतिम मानतात, त्यांना व्यक्तीच्या हक्कांचें पायमल्लीकरण तेवढें दिसतें. पण त्या व्यक्तीच्या ठायी कर्तव्याची, जीवनमूल्यांची आंच असावयास हवी, हा साधा विचार या व्यक्तिवादी कलावंतांना सुचत नाही, पटत नाही, व यामुळे त्यांचे काव्य वा साहित्यहि एकंदरीने निराशवादाकडे वळतें. जीवनांतल्या दिव्यत्वाचा त्यांना

साक्षात्कार होत नाही आणि म्हणून व्यक्तित्वाचें मूल्य बाह्यात्कारी कितीहि महत्त्वाचे वाटत असले तरी अंतिम मूल्य म्हणून त्याला मान देतां येत नाही. शिवाय साहित्यांत व्यक्तित्वाचे अविष्करण कसे तपासावयाचे हें अवघड व अगम्य राहणार आहे.

**मधमाशी व कोळी--**

मुद्रणोत्तर जगांत तरी साहित्याचें मूल्य व्यक्ति होऊं शकत नाही. कारण छापण्यासाठी लिहावयाची प्रत्येक ओळ लिहितांना लेखकाला या लेखनाचा वाचक-वर्गावर काय परिणाम होईल हें जाणावे लागते, व त्या दृष्टीने स्वतःच्या व्यक्तित्वाला मुरड घालावी लागते, वा नकळत पडतेहि. कारण शेवटीं व्यक्तीच्या भावना, विचार ... इ. मुद्रा सामाजिक परिस्थितीचा परिपाक असतात, व त्यावर खऱ्या अर्थानें व्यक्तीचा अग्रहक्क पोचतो असे म्हणतां येणार नाही. तेव्हा व्यक्तिवादाच्या एकांगीपणापासून परावृत्त होत असणाऱ्या आपल्या काळाचे व त्याच्या साहित्याचे मूल्य व्यक्ति हे असूं शकेल असें म्हणवत नाही. व्यक्तीला स्वयंपूर्ण वा समाज-निरपेक्ष असें जीवन नसतेंच. मुद्रणपूर्व संस्कृतीत कलावंत हा मधमाशी-प्रमाणे असतो. मधमाशी फुलांतील रस एकत्र आणून तसाच जतन करते, त्यावर तिचें स्वतःचे संस्करण अल्प असतें, मुद्रणोत्तर संस्कृतींत कलावंत हा कोळ्याप्रमाणे असतो. कोळी जाळें विणतो तो धागा स्वतःच्या शरीरांतून काढतो. पण तो धागा कशासाठी ? तर तो आणखी कृमी मिळवि-ण्यासाठी, व भरपूर कृमी खावयास मिळाले की याचा धागा पण भरपूर व चिवट. पण कोणी विचारले हा धागा कोठून आणला ? तर हा माझ्या शरीरांतून काढला इतर कोणाचाहि त्याच्यावर हक्क नाही, भाग नाही. असें तो म्हणू शकेल. व्यक्तिशील संस्कृतीतल्या कलावंताची भूमिका ही अशी आहे. तर मग खऱ्या कलावंताने व्यक्तित्वाचें अविष्करण कसें करावें ? उपमाच द्यावयाची तर रेशमी किड्याची देतां येईल. रेशमी किडा स्वतः भोंवती तंतू गुंडाळतो. कलावंताची क्रिया तशीच आहे. परंतु रेशमी किडा माणसाच्या दृष्टीने निर्बुद्ध आहे. त्याला स्वतःच्या कृतीचे मोठेपण कळत

नसल्याने आपण स्वतः बाहेर येऊन अखंड धागा तोडून टाकतो. कला-वंताचें व्यक्तित्व अधिक उज्वल. त्याने आंत विलीन व्हावयास हवें व असें झालें तरच तें त्याच्या श्रेष्ठतेचें गमक होऊं शकेल.

**दोन प्रतिक्रिया—**

व्यक्तित्वाच्या ह्या मूल्यावर जो अतिरिक्त भर दिला गेला त्याची प्रतिक्रिया झालेली आहे व होतहि राहील. सामाजिक क्षेत्रांत व्यक्तित्वाच्या मर्यादा लक्षांत आल्यानंतर त्यावर दोन प्रतिक्रिया झाल्या. व्यक्तित्व हें कांहींनी अंतिम ध्येय मानिलें, त्यांच्या बाबत प्रतिक्रिया संभवतच नाही. तथापि व्यक्तित्वाची वैगुण्यें ज्यांच्या ध्यानांत आलीं त्यांनी ती वैगुण्यें नष्ट करण्याचा प्रयत्न केला. एक असा प्रयत्न म्हणजे समाजवादी विचारांचा स्वीकार हा होय. साहित्यक्षेत्रांत या विचारांच्या अनुरोधाने पुरोगामी विचारधारा वाढीला कशी लागली याचें विवेचन यापूर्वी आलेलें आहे. ज्यांना व्यक्तित्वाचे अंतिम श्रेष्ठत्व मान्य होऊं शकले नाही व समाजवादी विचारहि स्वीकार्य वाटला नाही अशांची एक निराळी प्रतिक्रिया झाली व ती प्रतिक्रिया म्हणजे 'समाज' हे साहित्याचे अंतिम मूल्य मानणे ही होय.

**समाजपुरुषाचे अवयव म्हणजे व्यक्ती ( ? )—**

या विचारसरणीच्या अन्वये व्यक्तीला ज्याप्रमाणे विचार, भावना, परंपरा, इ. गुण आहेत त्याप्रमाणे समाजासहि आहेत. व व्यक्ति ज्याप्रमाणे विचार करू शकते, वागू शकते, तसा समाजहि विचार करूं शकतो, वागू शकतो. समाजाची धारणा ही अशा प्रकारे सजीव वस्तूप्रमाणे ( लिव्हिंग ऑर्ग्यानिझम ) आहे, असें या विचारवंतांचें मत आहे. त्यामुळे व्यक्तींनी आपले व्यक्तित्व हे या समाज पुरुषाचे पायाशी समर्पण करावे, त्याला अंतिम श्रेष्ठतर मानावें असा ह्या लोकांचा अभिप्राय आहे.

व्यक्तित्वाविरुद्ध ही एक प्रतिक्रिया आहे हे विसरून चालत नाही. समाजाच्या भावना, विचार, आचार, प्रणाली या कोणातरी व्यक्तींच्याच मनोकोशांतून निर्माण झालेल्या असतात, ह्या वस्तुस्थितीकडे या लोकांचें दुर्लक्ष झालेलें दिसतें. ज्यांना तें दिसतें, ते काही तत्सम विशिष्ट व्यक्तींना

श्रेष्ठ मानण्याचा यत्न करतात व विभूतिपूजा वाढीला लागते. शिवाय समाज हा अमूर्त असल्याने, व समाज म्हणजे सर्व मानवी समाज येथपर्यंत या विचारसरणीची मजल जात नसल्याने, शेवटी 'समाजा'चा हा विचार आपल्या राष्ट्राशी थांबतो; व तो तेथेच रेंगाळतो.

साहित्यांत जो पुनरुत्थानाचे कल्पनेवर आधारलेला राष्ट्रावाद निर्माण झाला आहे तो ह्या विचारसरणीचें एक प्रतिबिंब आहे. राष्ट्राच्या आकांक्षांची, वाच्छांची, ध्येयांची साहित्याने पूजा करावी असें मत रूढ होऊन वाढीला लागतें. समाज पारतंत्र्याने बद्ध असेल तर या विचारसरणीत एक प्रकारचा जीवंतपणा प्रतीत होतो. परंतु साहित्य-मूल्य या अवस्थेप्रत हा विचार जाऊं शकत नाही, कारण साहित्याची प्रतिज्ञा राष्ट्रीय म्हणण्यापेक्षा मानवी आहे. तिचें राष्ट्रीयत्व हें दुय्यम अंग आहे. म्हणून 'राष्ट्रीयत्व' हे अंतिम मूल्य होऊं शकेल असें वाटत नाही. शिवाय राष्ट्रीयत्वाच्या कल्पना ह्या बदलत आहेत. परस्पर विरोधी विचार राष्ट्रवादाच्या नांवाने पुढे येत आहेत, आले आहेत. साहित्यांत तर राष्ट्रीयत्वास अंतिम मूल्य मानणे योग्य होणार नाही. साहित्याची धारणाच मानवी आहे व आवाहनाहि मानवी आहे. राष्ट्रीयत्वांत मानवी भावनेस आवाहन असतेच असे नाही.

साहित्याचें मूल्यधन शोधून काढण्याचा हा जो यत्न केला त्यांत असें आढळून यावें की, साहित्येतर जीवनांत ज्या चळवळी होतात, ज्या सामाजिक वैचारिक घडामोडी होतात त्यांचे पडसाद--परिणाम हे केवळ साहित्याच्या स्वरूपांतच होतात असें नाही तर साहित्याच्या मूल्यांवर सुद्धा होतात. व साहित्यविषयक मूल्यें ही सुद्धां सनातन-त्रिकालाबाधित नसून, तीहिपण परिस्थितीचा परिपाक प्रतिक्रिया आहेत, हें पटावयास हवे. प्रत्येक मूल्यांतली अपूर्णता दर्शविली असली तरी तें सर्वस्वी त्याज्य आहे असे नव्हे, त्यांची ऐतिहासिक पार्श्वभूमि व महत्त्व कळावे एवढाच हेतु आहे.

**नव्या मूल्याचा शोध—**

तर मग आपल्या काळच्या साहित्याचें अंतिम मूल्य असें कोणते? खरें सांगायचें तर तसें कोणतेंहि मूल्य नाही. आज आपण मानवी

संस्कृतीच्या अशा कांही अवस्थेंत आहोंत की, कोणत्याहि क्षेत्रांत कोणाहि एकाचें सार्वभौमत्व मानण्यास आपण तयार नाही. जीवनाच्या कक्षा इतक्या विस्तृत झाल्या आहेत की कोठेहि एकपणा नाही. रस. स्वभावदर्शन, विश्लेषण, वास्तवता, यांनी एकेका काळी सार्वभौमत्व भोगलें. आज कोणीहि एक तो हक्क सांगूं शकत नाही. कारण प्रत्येक आपापल्या परीने उपयुक्त मूल्य असले तरी प्रत्येकांतच अपूर्णता आहे. तरीहि पण आपल्या काळच्या साहित्यासाठी असें एक मूल्य उपस्थित होत आहे.

**जें जीवितमूल्य तेंच साहित्यमूल्य,–'मानवता'—**

साहित्य हें स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र आपण मानावयास लागलो आहोत. ती गोष्ट चांगली असली तरी,असें स्वतंत्र कर्तृत्व-क्षेत्र होण्यांत अगदी प्रारंभी म्हट-ल्याप्रमाणे एक धोका असतो. व तो म्हणजे जीविताशी त्या क्षेत्राचा संबंध तुटण्याचा. या धोक्यापासून साहित्यास अलिप्त ठेवावयासच हवें. कारण त या नियमास अपवाद होऊं शकत नाही. असा या विवेचनावरून एकंदर निष्कर्ष निघतो. तेव्हा साहित्याचे जर एखादें मूल्यच सांगायचें तर असें सांगतां येईल की, जीविताशी साहित्याचा संबंध न तुटण्यासाठी, आपण जे जीवित-मूल्य मानू तेंच आज साहित्याचें पण मूल्य मानावयास हवें.आज आपण कोणाचें सार्वभौमत्व मानीत नसलो, तरी एका गोष्टीचें सार्वभौमत्व मानतो. व ती म्हणजे मनुष्य व मानवी जीवित ही होय. या दोहोंचा समन्वय करणारें जीविताचें मूल्य **मानवता** हें आहे. अर्थात् आज साहित्याचें पण मूल्य **मानवता** हेंच मानावें लागेल. मानवतेत व्यक्तीचा वेगळेपणाने व स्वय-भूपणाने समावेश होऊं शकत नाही. मानवी जीविताचें एक अंग म्हणजे व्यक्ति व तिच्या आशा, आकांक्षा, कर्तव्यें, गुण, दोष, इत्यादींकडे समाज–सापेक्षतेने व इतिहास–सापेक्षतेने पाहणे म्हणजे मानवता.

तेव्हा आजच्या काळच्या जीविताचें व साहित्याचें एकच मूल्य जर कोणते होऊं शकेल तर तें मानवता हें होय. ते आतापर्यंत पाहिलेल्या सर्व मूल्यांचें समावेशक असे मूल्य आहे, व साहित्याने त्याच मूल्याचें पूजन केलें पाहिजे, नव्हे, साहित्य तेंच करीत आलें आहे असें आढळून येईल.

# संस्कृति आणि साहित्य

## : १ :

**साहित्य हें संस्कृतीपासून अविभाज्य—**

साहित्य हा एक मानवी मन-बुद्धीचा व पर्यायानें संस्कृतीचा आविष्कार आहे. साहित्याचें स्वरूप सांगावयाचें तर असें सांगतां येईल की, जशी संस्कृति तसें साहित्य. म्हणजेच संस्कृतीच्या श्रेष्ठ कनिष्ठतेचा दंडक साहित्य होऊं शकेल. साहित्य आणि संस्कृतीचे हे जे गुंतागुंतीचे संबंध आहेत, त्यांचें स्वरूप समजून घेण्यासाठी, व आज आपल्या काळच्या साहित्यास आजचें स्वरूप कसें प्राप्त झाले आहे, त्याचें आपल्या संस्कृतीत कोणतें कार्य आहे, यापूर्वीच्या संस्कृतीत कोणतें होतें, हे पाहणें आवश्यक आहे. त्यासाठी मानवी संस्कृतीबरोबर साहित्याचें अंतर्बाह्य स्वरूप व कार्य कसें बदलत आलें आहे ह्याचा आढावा पहिल्या विभागांत मांडलेल्या विशिष्ट दृष्टिकोणांतून येथे घेण्याचें ठरविलें आहे.

**संस्कृतीची कालवाचक कल्पना—**

जगांत आज निरनिराळ्या भाषा अस्तित्वांत आहेत व प्रत्येक प्रमुख भाषेला विशिष्ट लिपियुक्त स्वरुप आहे. त्या भाषेचें साहित्य त्या त्या लिपीत

प्रथित वा निबद्ध झालेलें आहे. एका दृष्टीने हें लिपी व भाषांमुळे पडलेले कप्पे साहित्याचें अव्वल स्वरूप प्राप्त करून घेण्यास अडचण उत्पन्न करतात असें वाटतें. व तें थोडें खरेंहि आहे. परंतु प्रमुख भाषांचें साहित्य आज इंग्रजी द्वारे आपल्यासमोर उपलब्ध आहे. त्याअन्वयें, असें म्हणतां येतें की, विशिष्ट संस्कृतींतलें साहित्य-स्वरुप हें सर्व जगभर जवळजवळ सारखेंच आहे. संस्कृति हा शब्द या ठिकाणी देश वा स्थल यांचा वाचक न घेतां प्रामुख्याने कालवाचक घेतला आहे. व तसें घेणें अधिक योग्य आहे. आपल्या कालांत आज असें आढळून येतें की जगभर जवळजवळ विचारांचा रोख वा मानवी जीवितध्येयें वा मूल्यें हीं एकच आहेत. व हीच परिस्थिति कमजास्त प्रमाणांत सर्वच काळीं होती. व म्हणून संस्कृतीची योजना ह्या ठिकाणीं कालवाचकतेने–विशिष्ट कालखंडांतील विशिष्ट परिस्थितीतील जीवन–अशी घेणें योग्य वाटलें.

### कालविभागाचीं विषयनिष्ठ गमकें —

आज जगभर मानवी ध्येयें वा मूल्ये एकच आहेत. याचा अर्थ असा नव्हे की, ही आजचींच ध्येयें वा मूल्यें मानवजात आतापावेतो प्रमाण मानीत आलेली आहे. कालाबरोबर ही ध्येयें वा मूल्ये बदलत वा परिवर्तित होत आली आहेत. कालदृष्ट्या विभाग पाडून असे म्हणतां येत की, ही ध्येये वा मूल्ये विशिष्ट कालांत सर्व जगांत सारखी रहात आलेलीं आहेत. आजची नसली तरी विशिष्ट कालाला विशिष्ट ध्येये प्रमाण वाटली आहेत. व त्या कालखंडांत वा त्या संस्कृतीच्या अवस्थेंत जगभर तीच ध्येयें विचारवंतांना स्वीकरणीय वाटत आलीं आहेत. तेव्हा सोयीसाठीं कालदृष्ट्या दोनतीन विभाग पाडावे लागतात. विवेचनाचे सोयीसाठी ज्या विषयाचें विवेचन असेल त्या विषयाचे दृष्टीने निरनिराळे कालविभाग करतां येणें शक्य आहे. कालविभागाची विषयनिष्ठ अशी निरनिराळी गमकें स्वीकारावीं लागतात. पण गंमत अशी आहे की, विषयाचे दृष्टीने निरनिराळीं गमकें जरी वापरावी लागली तरी कालखंड मात्र तेच आहेत, व म्हणून त्या कालखंडांना विशिष्ट संस्कृति अशी संज्ञा देणें युक्त होईल. प्रस्तुत पुस्तकांतील इतर निबंधांतील विवेचनाच्या आधारें ही वस्तुस्थिति अधिक स्पष्ट होईल.

**तीन काल विभाग—**

हे जे संस्कृतिदर्शक कालखंड विवेचनाचे सोयीसाठी पाडावयाचे ते पण या ठिकाणीं साहित्य–स्वरूपांतील क्रांति-उत्क्रांतिदर्शक फरकांवर आधारलेले असणें योग्य आहे. आपल्या कालाचें साहित्य हें मुद्रित स्वरूपांत असतें. असें मुद्रित स्वरूप देतां येणें जेव्हापासून शक्य झालें तेव्हा पासूनचा अलीकडचा टप्पा, त्याला मुद्रित साहित्याचा कालखंड, असें अन्वर्थक नांव देऊं या हवें तर. त्यापलीकडचा म्हणजे मुद्रण-कलेच्या पूर्वीचा परंतु लेखन-कलेनंतरचा काल, ह्याला ‘ लिखित साहित्याचा कालखंड ’ असें संबोधूं लेखन-कलेपूर्वीहि साहित्य निर्माण होत होतें हें निर्विवाद आहे. व आपल्या काळपर्यंत रूढ असलेला साहित्यवाचक शब्द “वाङ्मय” हेंच दर्शवितो. तेव्हा या पहिल्या कालास आपण ‘ वाङ्मय ( वाक्‌मय ) साहित्याचा काल ’ असें म्हणूं या. हे कालखंड साहित्याच्या पार्थिव स्वरूपांत महत्त्वाचा क्रांति-कारक फरक घडवून आणणारे आहेत. कारण लेखन आणि मुद्रण या ‘कलां’नी वा शोधांनी खूपच जीवनक्रांति केली आहे. या काल-विभाजन-तत्त्वाचा आणखी असा फायदा झालेला आहे की वर उल्लेखिल्या-प्रमाणे संस्कृति-विकासाचे दर्शक असे हेच टप्पे गणतां येतात. त्या दृष्टीने प्रत्येक कालखंड हा सांस्कृतिक एकतेच्या दृष्टीने स्वयंपूर्ण वाटतो, आणि शिवाय क्रमशः तीनहि कालखंड मानवी जीवनाची प्रगति व साहित्याची उत्क्रांति पण दर्शवितात.

**संस्कृतीचा वारसा सर्वांचा—**

प्रत्येक संस्कृतीत साहित्य किंवा कला यांतून त्या संस्कृतीने जोपास-लेल्या किंवा पुरस्कारलेल्यां जीवितमूल्यांचा आविष्कार होत असतो, अथवा झालेला असतो. ही जीवितमूल्यें उच्च व आकर्षक असतात. परंतु त्यांची पार्श्वभूमि समजून घेतली असतां त्यांसंबंधीची दुसरी पण बाजू समजते. मग त्या मूल्यांच्या संबंधीची–मानवी स्वभावांतर्गत–अपूर्णता दिसून येते. तरीहि त्याचें अव्वल मोठेपण प्रतीत होतेंच. निरनिराळ्या राष्ट्रांत समाज-रचना व तिच्या पर्यायाने राज्यव्यवस्था पण कांही असते. या दोन

व्यवस्थांच्या वजावाटीतून सांस्कृतिक प्रगति करण्याचा हक्क किंवा वाव कांही विशिष्ट समाजवर्गांनाच मिळालेला असतो, असा आजपर्यंतचा तरी अनुभव आहे. परंतु अशा प्रकार समाजाची रचना जरी विषमतापूर्ण असली तरी तिच्यांतून जें कांही संपन्न जीवन निर्माण होतें, त्यांतून उन्नत जीवन-मूल्यें निर्माण होतात, ती मात्र एकंदर मानवी-प्रगतीला निश्चितपणें मार्ग-दर्शक ठरतात. त्यांच्यावर सर्व समाजाचा हक्क असतो.

**ग्रीसचें उदाहरण—**

उदाहरणार्थ, आतापर्यंतच्या होऊन गेलेल्या संस्कृतींत बऱ्याच अव्वल दर्जाची संस्कृति म्हणजे ग्रीक संस्कृति गणली जाते. विशेषतः नाट्यकला, तत्त्वज्ञान, शिल्पकला, बांधकला, बुद्धिशीलता इ. च्या दृष्टीने ग्रीसने मोठमोठे लोक जगास दिलेले आहेत. ॲरिस्टॉटल, प्लेटो, सॉक्रेटस, इसाप यांची नांवे माहीत नाहीत असा सुशिक्षित मनुष्य सांपडणें कठिण. परतु ग्रीसची समाजरचना ही पूर्णपणे गुलामगिरीवर आधारलेली होती, एवढेच नव्हे तर सरकारी उत्पन्नाचा बराचसा भाग हा गुलामगिरीच्या व्यापाऱ्यां-वर बसविलेल्या करांतून वसूल करून घेतला जात असे. ग्रीसमध्ये लोक-सत्ताक राज्यं होती, तेथले विचारवंत लोकसत्तेचे पुरस्कर्ते होते, परंतु गुलामांना कोणतेहि राजकीय व सामाजिक अधिकार नव्हते. तशा प्रका-रचे अधिकार देण्याचा तत्कालीन मुत्सद्यांनी व विचारशीलांनीहि साफ नकार दिलेला आहे. इतकेच नव्हे तर आपल्या आदर्श समाजरचनेंत प्लेटोने गुलामांना साधे माणूसकीचे अधिकार नाकारलेले आहेत. असें असलें तरी, साक्रेटिसाचा केवळ सत्यपालनार्थ विषप्राशन करून झालेला मृत्यु आठवला की, आजहि आपल्या अंतःकरणांत आदरभावयुक्त पडसाद निघ-तात. ग्रीसची गुलामगिरी ग्रीसबरोबर प्राचीन झाली, पण ग्रीसने पुरस्कार-लेलें सत्याचें, विचारस्वातंत्र्याचे मूल्य आपणांसहि आज अभिनव वा-तें, व विचार येतो, ग्रीसमध्ये गुलामगिरी असेल—पण प्राचीन काली ती नव्हती कोठें ? तथापि उच्च अशा जीवितमूल्यांची ग्रीक संस्कृतीने जी जोपासना केली ती निश्चितपणे अधिक भरीव आहे. तिचा वारसा आपणापावेतो आला

आहे. अशा प्रकारच्या मूल्यांची मानवजात आजपर्यंत जोपासना करीत आली आहे, साहित्याचे ते एक महत्कार्य आहे. व मोठ्या साहित्यिकांनी कलावंतांनी व साहित्य या बुद्धिसंस्थेने तें केलें आहे. उन्नत जीवितमूल्यांची उपासना साहित्याने कशी केली, व एकंदर मानवसमाजाची जीवनमूल्यें कशीं विकसित होत आलीं आहेत, ह्याचा साहित्याच्या स्वरूपाच्या साहाय्याने येथे विचार करावयाचा आहे.

सांस्कृतिक विकासाचे दृष्टीने वर निर्दिष्टिलेले तीन कालखंड हे स्वीकार्य वाटण्यास हरकत नाही. प्रथमच्या कालखंडाकडे वळूं.

### लेखनशोध—

लेखनकलेने मानवी जीवितांत इतकी प्रचंड क्रांति घडवून आणल आहे की, साधारणपणें मनुष्याच्या ज्ञात इतिहासाची सुरवात लेखनकलेच्या शोधापासून धरतात. व नंतरच्या सांस्कृतिक इतिहासास अधिकृत इतिहास ( रेकॉर्डेड् हिस्ट्री ) असें म्हटले जातें. कारण तेथून प्रगतीचा आढावा हा अधिक निश्चित स्वरूपांत घेतां येतो. लेखनकलेपूर्वीच्या घटना व त्यांची नोंद विश्वसनीय सांपडत नाही. नंतर लेखननिविष्ट झालेल्या साहित्यांतूनच काय उल्लेख आढळेल त्यावर सारें विवेचन आधारावें लागतें.

लेखनकलेचा शोध मनुष्याने जेव्हां लावला तेव्हा त्याला तिची आवश्यकता निर्माण झाली असली पाहिजे, व यावेळी मानसिक बौद्धिक व एकंदर भौतिक प्रगतिहि बरीच झाली असली पाहिजे. कारण त्याला आपले व्यवहार अडले असें आढळून आल्याशिवाय किंचित् अवघड वा अनैसर्गिक वाटणारीं लेखनचिन्हें मनुष्य निर्माण करणें अशक्य आहे. लेखनाचें, लिपीचें, स्वरूपसुद्धा बनत बनत आलें आहे. भाषेचें मूळ स्वरूप कसें असावें हें निश्चितपणें कळण्यास मार्ग नाही. ते विवेचन तर्कावर आधारावें लागते तीच स्थिति लेखनकलेच्या बाबतीत आहे.

### लेखनाचीं पाळेंमुळें—

लेखनकलेची आवश्यकता मनुष्याला दोन गोष्टींसाठी भासली असावी. त्यापैकी पहिली म्हणजे स्वतःच्या कर्तृत्वाची, शौर्याची, विजयाची, नोंद

करणें. एखादी लढाई जिकली तर तिच्या विजयानिमित्त विजयस्तंभ बांधण्याची कल्पना फार जुनी आहे. कांही जमातीत असें विजयस्मारक म्हणून केवळ विशिष्ट ठिकाणी दगडांचा ढिगारा करून ठेवण्याची पद्धत आढळते. पुढे दोन दगडांना चिकटून धरणाऱ्या चुन्यासारख्या द्रव्याचा शोध माणसाने लावला. त्यामुळे दगडांचे ढिगारे होते, त्यांचे स्तभ वा तत्सम इमारती झाल्या. परंतु त्या कोणी, केव्हा, कशासाठी बांधल्या याची कल्पना पुढच्या पिढीस देणें हे लिपीशिवाय शक्य नव्हते. यासाठी कांही लोकांनी प्रयत्न केला असावा. जेव्हा अधिक सुसंस्कृतता आली तेव्हा पुढच्या पिढीपर्यंत हा पराक्रम गेला पाहिजे असा विचार आल्यानतर मग शिलालेखाची व त्यासाठी लिपीची जरूरी भासली असावी.

**"ट्रेडमार्क" मधून---**

परंतु ही फार पुढची पायरी आहे. लेखनकलेचे नमुने आपल्या कालापर्यंत जरी अशा शिलालेखाच्या स्वरूपांत आढळतात तरी लेखनशोध हा त्यांच्या पूर्वीचा असला पाहिजे. व्यवहाराच्या सोयीसाठी, मनुष्याला लेखनकलेची जरूरी भासली असावी. शेतकीव्यवसाय सर्रास सुरू झाल्यानंतर देवघेवीचे व्यवहार सुरू झाले, व त्यांची नोद असणें आवश्यक वाटले असेल. या गरजेतून व्यापारी वृत्तीच्या व कारकूनपेशाच्या लोकांनी प्रथम खुणा केल्या असाव्या आणि तेथून लेखनकलेचा उदय झाला असावा. व्यापाऱ्यांना देवघेवीसाठी जमाखर्चाची जरूरी ही सनातन आवश्यकता आहे. त्यांतून, तसेंच विशिष्ट वस्तू बनविल्यानंतर, तिच्यावर 'आपला' म्हणून, वा विशिष्ट प्रत लावून पत निर्माण व्हावी म्हणून त्या वस्तूवर शिक्का असावा असे वाटू लागले असावे. अशा 'टेडमार्क' मधून मनुष्यास लेखनकलेची प्रतीति झाली असावी. कांही वन्य टोळ्यांतून जवळ जवळ आपल्या इतके गुंतागुंतीचे लेखन आढळते.

**चित्रांतून---**

तिसरी शक्यता म्हणजे भांड्यावरच्या चित्रांतून. मनुष्य मातीची भांडी करूं लागल्यावर कांही लोकांना ती भांडी आकर्षक दिसावीं म्हणून

त्यांवर चित्रं पण काढण्याची लहर आली असेल व ह्या चित्रांतून पुढे लिपियोजनेची कल्पना मनुष्यास झाली असावी.

**चार टप्पे—**

सुरुवात कशीहि असली तरी लेखनप्रक्रिया तीन चार अवस्थांतून गेली आहे. पहिली अवस्था म्हणजे नुसती चित्रें. आपले विचार माणसे चित्रांच्या साहाय्याने व्यक्त करावयास शिकले. दुसरी अवस्था म्हणजे विशिष्ट कल्पना विशिष्ट आकृतीने – त्यांत एकाद दुसरें चित्र घालून – दाखविणें. अशा कल्पनादर्शक चित्रांना कल्पनालेख (आयडियोग्राफ्) म्हणतात. प्राचीन इजिप्त संस्कृतींतील लिपि याच अवस्थेंतील आहे. या अवस्थेंत चित्रांचा उपयोग निरनिराळ्या गोष्टी व्यक्त करण्यास करून घेतला असावा असें दिसते. म्हणजे गाईचें चित्र हे गाय, तिचा विशिष्ट रंग व तत्कालिक विचारसरणी वा संकेतानुसार गायीशी संबंधी असा एखादा गुण, याचा निदर्शक होऊं शकेल. यानंतरची तिसरी अवस्था म्हणजे विशिष्ट आकृतीचा विशिष्ट ध्वनीशी संबंध दर्शवावा अशी कल्पना येऊन त्या दृष्टीने प्रयत्न, व सर्वांत शेवटी विशिष्ट स्वर-व्यंजनयुक्त अशी विशिष्ट वर्णमाला.

प्राचीन संस्कृतीपैकी, इजिप्तची लिपि तिसऱ्या आवस्थेप्रतपण पोचली नाही. बॅबिलोनियन लिपीत चित्रांचे ऐवजी अक्षरें आढळतात, व त्यावरून ती लिपि बरीच प्रगत असावी. खरी प्रगत लिपि फिनिशियन लोकांनी निर्माण केली व ती पुढे झालेल्या ग्रीक, रोमन व नंतर आधुनिक युरोपियन राष्ट्रांनी स्वीकारली, असें मत रूढ आहे. हिंदुस्थानांत आज प्रामुख्याने प्रचलित असलेली देवनागरी लिपि ज्या लिपीपासून निघाली ती ब्राह्मी लिपीहि फिनिशयन लिपीपासून निघाली असावी असे कांही विद्वानांचें मत आहे. पण डॉ. केतकर प्रभृतींचे मताप्रमाणे ब्राह्मी लिपि हिंदुस्थानांत स्वतन्त्रतऱ्हेने विकसित झाली असावी. याठिकाणी लिपीबाबतच्या संशोधनांत शिरण्याचें कारण नाही.

लिपीला वाणीपेक्षा जडवस्तूंचें साहाय्य अधिक लागतें. परंतु वाचेला चिरस्थायित्व हे लिपियोगेंच लाभत असल्याने लिपीचा उपयोग भाषेला

विशिष्ट प्रकारची एकता ( युनिफॉर्मिटी ) येण्यांत झाला आहे. लेखनकला जडवस्तूंच्या आधीन असल्याने तिचा विकास सांस्कृतिक विकासावर अवलंबून आहे. उदाहरणार्थ, लेखनासाठी उपयोगांत आणलें जात असणारें साहित्य हें सुद्धां संस्कृतिनिदर्शक होऊं शकेल. ज्या वेळेला कागद नसेल त्यावेळी, कागदाऐवजी झाडाची पानें, साली, इत्यादि उपयोगांत आणलेल्या आहेत. तोच प्रकार लेखणीचा व शाईचा. लेखनव्यवहार भरपूर प्रमाणांत वाढण्यास कागद, शाई व लेखणी यांबाबत बरीच प्रगति होऊन विपुल प्रमाणांत त्या गोष्टी मिळावयास लागणें आवश्यक होतें. मुद्रणानंतरहि जी प्रगति झालेली आहे तिचा ओघ स्पष्ट होण्यासाठी ह्या घटकांचा विचार करावा लागतो. आज आपण कागदावर शाईने किंवा फौन्टनने वा पेन्सिलीने लिहितों. त्यासाठी लागणारी कागद, शाई, टाक इ. लेखनसाधनें आपल्या संस्कृतीचीं प्रतिकें आहेत. या शिवाय मुद्रणयंत्र व टंक-यंत्र यांनी आणलेला सुकरपणा व सोय वेगळीच.

**'पेपर' चें मूळ—**

लेखनकलेच्या साहित्याच्या दृष्टीने संशोधन केलें तर तें बरेंच मनोरंजक होईल, परंतु येथे तें आवश्यक नाही. कागदाचा उपयोग इजिप्तला ठाऊक होता व पपायरस' नांवाच्या झाडाच्या लगद्यापासून वा सालीपासून ते लोक कागदासारखें कांहीं करीत व त्यांवर लिहीत. ह्या 'पपायरस' वरून कागद-वाचक इंग्रजी प्रतिशब्द 'पेपर' आला आहे. ह्या कागदावर वा कापडावर लिहिलेले गुंडाळे (सुरळ्या) करून ठेवलेले पुष्कळ लेख इजिप्तमधील थडग्यांच्या उत्खननांत सांपडले आहेत. परंतु एकंदरींत कागदाचा प्रसार हा मर्यादित असावा. कागदाप्रमाणे, कापड, विटा, धातूंचे पत्रे, लाकडाचे ढलपे, कातडें, – इ. वस्तूंवर पण लेखन त्या त्या वस्तूला अनुरूप अशा 'लेखंनीवजा' उपकरणांनी होत असावें असें दिसतें.

बॅबिलोनियांत लेखनकलेची बरीच वाढ झाली. परंतु त्या लोकांना कागदाचा उपयोग माहीत नसावा असें दिसतें. मातीच्या विटांवर त्या ओल्या असतांना, विशिष्ट मजकूर लिहून, त्या भाजीत, व सलग विशिष्ट

मजकुराच्या विटा, एका भांड्यांत एकत्र ठेवीत. हे असे १०,००० 'ग्रंथ' असलेली एक ग्रंथशाला बॅबिलोनियांतील "निनेव" शहरीं होती. तत्कालीन कायदा-ग्रंथ राजा हमुराबीने केला होता. व त्याची प्रत या ग्रंथालयांत या स्वरूपांत मिळाली.

आपल्याकडे, झाडांच्या साली, पानें ... इ. चा उपयोग होत असे. हे 'भूर्जपत्र' 'ताडपत्र' या शब्दांवरून दिसते. विशिष्ट मजकूर लिहून ती 'पत्रें' एका दोऱ्यांत एकत्र बाधीत, व त्यावरून 'सूत्र' झालें.* रामायण भारताचीं 'कांडे' वा 'पर्वे' असण्याचें कारण झाडांचा लेखनसाहित्यांत उपयोग हेच असावें असे डॉ. केतकरांचे मत आहे.

### ह्या अवस्थेंतील साहित्य—

या प्रकारच्या साधनांनी जो मजकूर टिकविण्याचा यत्न होत असे त्याच्या स्वरूपाचे आजच्या साहित्य-स्वरूपाशी कोणतेहि साम्य नसणार हे स्पष्ट आहे. लेखनाचा उपयोग प्रामुख्याने राजांच्या पराक्रमाची माहिती, कायदे, फर्मानें, जाहीरनामे, दानधर्म, मृत्युलेख ... इ. गोष्टीसाठी होत असे. करारमदारां-

---

* पुस्तकाचा वाचक जो संस्कृत शब्द 'ग्रंथ' त्याची व्युत्पत्ति पण या संबंधांत लक्षात घेण्यासारखी आहे. कांही सलग मजकूर जेव्हा एकत्र करून एका दोरीत बांधला जात असेल त्या वेळी त्या दोरीला मारल्या जाणाऱ्या गांठीवरून ग्रंथ शब्द आला असावा. आज आपण ग्रंथ म्हणजे पुस्तक असे समजतो; पण जुन्या साहित्यांतील उदाहरणांवरून असे दिसते की, ग्रंथसंख्या म्हणजे, त्यांच्या कल्पनेप्रमाणे श्लोकसंख्या, ओवीसंख्या, अभंगसंख्या होय. पुढे गुळगुळीत कागद जेव्हा तयार होऊ लागला तेव्हा असले कागद एकत्र करून 'पुस्तक' झालें. पुस्तक या शब्दांत पृष्ठ-वाचकतेचा बोध होतो व गांठीची कल्पना लुप्त झालेली दिसते. कारण गुळगुळीत कागद दोरींत एकत्र बांधण्यापेक्षा पोथीप्रमाणे कापडांत गुंडाळणें सोपें वाटूं लागलें असेल... ग्रंथवाचक शब्दांतून सांस्कृतिक प्रगतीचा ओघ कसा दृगोचर होतो, हे पाहणें उद्बोधक आहे.

साठी व्यापारीहि लेखनकलेचा उपयोग करीत असावेत. साहित्याचा लेखन-कलेशी कोणताहि संबंध नसावा. यामुळेच वेदकाली लेखनकला अस्तित्वांत असूनहि वेद मात्र मुखाने टिकविले गेले. मुखोद्गत करण्याच्या पद्धतीने साहित्यांत पद्यबद्धतेची जरूरी वाटली असावी. काव्यासारख्या साहित्याची आवश्यकता भासली तरी तें लेखनबद्ध असावें असे तत्कालीन लोकांस वाटणे कठीण होते. त्यापेक्षा व्यवहारी गोष्टीसाठीच लेखनाचें साहाय्य घेण्याचे त्यांनी पत्करले, कारण लेखनसाधनांची निपज मर्यादित प्रमाणांत होत असावी असे दिसते.

लेखनकलेचा आणखी एका वर्गाकडून उपयोग केला जाऊं लागला व तो वर्ग म्हणजे धर्मोपासकांचा. ह्या लोकांना तिची आवश्यकता अधिक भासणें शक्य आहे. त्यांच्या क्षेत्रांत त्यांनी निरनिराळे गूढ अर्थ बसवले, व अशा तऱ्हेने आपल्या उपयोगासाठी त्यांनी लेखनकला वापरली, तरी ती तेथेच लुप्त झाली. धार्मिक दृष्टीने विशिष्ट ‘ मंत्र ’ लिहिणे, विशिष्ट ‘संस्कार’ कसे करावे याची माहितीवजा नोंद करणे, यासाठी उपाध्याय वर्गाने लेखनाचा आश्रय करणे साहजिक होतें. पण त्या वर्गाचे हाती ज्या इतर अनेक गोष्टी होत्या, अधिकार होते, त्यांचे आधारे जे वर्चस्व निर्माण झाले होते, त्याच्या जोरावर लेखनकृति ही पण दैवी गोष्ट आहे, असे ‘दैवी’ वलय निर्माण करून सर्वसाधारण समाजापासून ती दूर ठेवणें शक्य होते. हा प्रकार जवळ जवळ सर्वच प्राचीन संस्कृतीत झाला आहे. इजिप्तमधील हिरोग्लिफिक लिपि निर्माण झाल्याबरोबर उपाध्याय वर्गाने घेतली. आपल्या देशांत पण तोच प्रकार झाला. रोमन, ग्रीक, चीन इ. संस्कृतींची तीच गत.

**लिखित–साहित्याची सुरवात—**

या विवेचनाचें प्रयोजन लेखनपूर्व साहित्याचें स्वरूप दाखविणें हें आहे. लेखनपूर्व याचा अर्थ, साहित्य व लेखन यांचें साहचर्य अभिन्न होण्याच्या पूर्वीचा काल, असा घेणें प्राप्त आहे. कारण, वाणीइतकी नसली तरी विशिष्ट सामर्थ्य असलेल्या भाषेइतकी लेखनकला प्राचीन आहे. परंतु साहित्य आणि लेखनकला ह्यांचे अभेद्य साहचर्य कितीतरी काल प्रस्थापित

झाले नव्हतें. तें कृषि-संस्कृतीच्या उत्तर कालांत झाले व तेंहि प्रामुख्याने धार्मिक उद्देशानेच. साधारणपणे साहित्याचें व लेखनाचे साहचर्य हे ख्रि-पूर्व चवथ्या पांचव्या शतकापासून सुरू झालें असावें. कारण तोंपर्यंत मानवी समाजास बरीच स्वस्थता लाभून लेखन साहित्याची पैदास विपुल-पणे होणें शक्य झालें नसावें. ती पैदास विपुल झाल्यानंतर साहित्या-सारख्या बौद्धिक जरूरीसाठी लेखन साहित्याचा उपयोग होऊं लागला असावा. जवळ जवळ याच सुमारास धर्मसंस्थेची उत्क्रांति होत होत तिला 'विश्वधर्म'त्वाचें स्वरूप येऊं लागलें. जगांतला पहिला 'विश्वधर्म' म्हणजे बुद्धधर्म होय. व तेव्हापासूनच एकदर सांस्कृतिक प्रगतीचा ओघ वेगळ्या स्वरूपांत वाहूं लागला. तेव्हा प्रथम तत्पूर्व संस्कृतींतील साहित्याचे स्वरूप पाहणे आवश्यक वाटतें.

**सामाजिक पार्श्वभूमि—**

संस्कृती-विवेचनास सुरवात पाश्चात्त्य लोक इजिप्त संस्कृती-पासून करतात, आपण वेदकाळापासून करतों. इजिप्त व वेदकाल ह्यांच्या प्राचीनत्वाविषयी जरी मतभेद असला तरी, त्यांच्यांत सांस्कृ-तिक समानता आहे, असें मान्य करावयास हरकत नाही. वेदकालीन धर्माचे स्वरूप व इजिप्तच्या राजघराण्याला ज्या 'धर्मा' ची आवश्यकता वाटली त्याचे स्वरूप हे पुष्कळ साम्यतापूर्ण आहे. निसर्गशक्तींना देव सम-जणे, सूर्याची, अग्नीची उपासना करणें, उपाध्याय वर्गाला प्राधान्य असणे :.. इ. साम्य-विशेष लक्षांत घेण्यासारखे आहेत. फरक आहे तो भौगोलिक परिस्थितीच्या योगे पडला आहे. नाइल नदीच्या पुरांचा अभ्यास करण्या-साठी इजिप्तला पिरॅमिड बांधावे लागले, तर वेदकालांत सामाजिक, व भौगोलिक परिस्थिति वेगळी होती. वेदांतील सूक्त व इजिप्तमधील तशा प्रकारची स्तोत्रे यांतहि साम्य आहे. धार्मिक व्यवहारांत धर्माधिकारी लोकांना महत्त्व असणे हीहिपण साम्यतादर्शक बाब आहे.

बॅबिलोनियांत सुद्धां हीच परिस्थिति. इजिप्तच्या लोकांना नाइलच्या पुरांसाठी पिरॅमिड बांधावेसे वाटले, तर बॅबिलोनिअन लोकांनी पाटबंधारे

बांधण्याचे प्रयोग केले. बॅबिलोनियांतील सूर्यमंदिराचे अवशेष आज पाहावयास सांपडतात. समाजरचनेतल्या व परिस्थितीतल्या ( एन्-व्हॅयरॉन्‌मेंट ) सारखेपणाचे योगाने मानवी प्रतिक्रियेतहि सारखेपणा असणें अपरिहार्य आहे.

समाजरचनेंतला सारखेपणा दृष्टीत भरण्याइतका स्पष्ट आहे. गुलामासारखे राबण्यास तयार असलेले बहुसंख्य लोक, ज्ञानाच्या, संस्कृतीच्या इ० प्रत्येक बाबतीत पुढे असणारे, व त्या ज्ञानाचा उपयोग स्वतःच्या फायद्यासाठी करून घेऊन सर्वसामान्य समाजास न करूं देणारे लोक, ते ज्ञान परमेश्वराकडून प्राप्त झालें असा बहाणा करणारे, व प्रत्येक वेळी आपलें प्रभुत्व उमटविणाऱ्या धर्म व राज्य या संस्था, ही साम्यस्थळें बहुतेक सर्व प्राचीन संस्कृतीत दिसून येतात.

**ह्या संस्कृतींतलें साहित्य—**

अशा समाजव्यवस्थेत साहित्य हे अत्यंत कमी व निम्नम दर्जाचें असणे साहजिक आहे. तें पुष्कळसे अज्ञानप्रधान वाटावे यांत नवल कसले ? प्रार्थनेपर रचली गेलेली सूक्त सोडली तर इतर साहित्य निर्माण होणेच कठिण. कारण सर्वसाधारण समाज हा मागासलेल्या अवस्थेत असल्याने त्याला कांहीच जमणे शक्य नव्हते.

इजिप्शियन संस्कृतीचे प्रातिनिधिक साहित्यपुस्तक 'मृतात्म्याचें पुस्तक' ( बुक् ऑफ् द् डेड् ) म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या प्रती कोरींव स्वरूपांत थडग्यांजवळच्या दगडांवर सांपडल्या. त्यांत मृत्यूत्तर प्रवासांत आत्म्याने कोणकोणत्या गोष्टीची 'खबरदारी' घ्यावी, ह्याचे वर्णन केले आहे, व त्यासाठी करावे लागणारे असे 'विधी' ( राइटस् ) पण दिलेले आहेत. बॉबीलिओनियाची दोन 'महाकाव्यें' उपलब्ध आहेत. त्यापैकी एकाचा विषय जगाच्या उत्पत्तीचा आहे. त्यांत एका कल्पनारम्य कथेच्या आधारें जगाची उत्पत्ति कशी झाली हे वर्णिलें आहे. आपल्याकडील वेदांचे स्वरूप काय आहे ते आपण जाणतोंच. पण येथे मात्र अधिक जाणतेपणा दिसतो. केवळ कल्पनारम्यतेंतून हे लोक बाहेर पडलेले दिसतात.

**साहित्य कां नाही ?—**

या संस्कृती शुद्ध साहित्याच्या वाढीस पोषक होत्या असे दिसत नाही. त्याचे कारण म्हणजे धर्माधिकारी वर्गाचे प्राबल्य. त्याहीपेक्षा, वेगळें असें कारण असणे शक्य आहे, व ते असे की, ज्ञानाचें क्षेत्र बरेंच लहान असल्याने, मानवी प्रज्ञा ही प्रामुख्याने बाह्य सृष्टीचे कोडें उलगडण्यांत व भौतिक, सामाजिक जीवन, अधिक सह्य व सुकर करण्याच्या कामी लागली. आज आपणांस तत्कालीन इमारती व त्यास्वरूपाची कामे पाहून त्या लोकांच्या ज्ञानाविषयी आदर वाटूं लागतो, व ज्या अर्थी एवढी प्रचंड कामे झाली त्याअर्थी ते लोक सांस्कृतिक बाबतीत बरेंच पुढे असावेत, असें वाटूं लागते. परंतु साहित्याच्या दंडकावरून तसे वाटत नाही. व तोच अंदाज अधिक बरोबर आहे. या प्राचीन कालांत ही जी स्थापत्यकृत्ये झाली त्या कामी इतक्या प्रचंड प्रमणांत मानवी हत्या व पिळवणूक झाली की, त्यानंतर आलेल्या संकटांना तोंड देण्याचे सामर्थ्य लोकांना राहिले नाही. इजिप्तचे पिरॅमिड, चीनची भिंत, बॅबिलोनियांतील मंदिर आपल्याकडील लेणी, इ. कृती निर्माण होण्यासाठी ज्ञानाच्या त्या कक्षेंत किती प्रचंड प्रमाणांत मानवी संहार वा खप झाला असेल हे अजमावणें कठिण आहे.

लेखनपूर्व–संस्कृतीचा हा काल. या संस्कृतीच्या अवस्थेत कशा प्रकारचें साहित्य निर्माण झाले याचा थोडा उल्लेख वर आलाच आहे. संस्कृतीच्या पार्श्वभूमीवर ह्या साहित्याचे स्वरूप पाहणें उद्‌बोधक आहे. हे साहित्य निर्माण करणारे समाजांतले ज्ञानी लोक होते. त्यांना त्या अर्थानें ऋषि वा कवि अशी संज्ञा प्राप्त झाली. हे ऋषि वा कवि समाजाच्या कोणत्या वर्गांतून आले होते हें लक्षांत घेणें आवश्यक आहे. अर्थात् कृषि, संस्कृतीच्या–वा लेखन-पूर्वसाहित्याच्या–कालांतील जी बौद्धिक प्रगति झाली होती ती त्यांनीच केली होती. या वर्गाच्या आशा, आकांक्षा, मनीषा, इच्छा, अडचणी, ह्या सर्व त्यांच्या साहित्यांतून व्यक्त झालेल्या आहेत.

**बाल्यावस्थेंतले बोबडे बोल—**

मानवी मन नुकतेंच जागृत झालेलें होतें. सूर्य, चंद्र, अग्नि, पाऊस, नदी, इ, निसर्गप्रतीकांकडे पाहून त्यांच्यांतल्या सामर्थ्याची प्रतीति कशी झाली

असेल, व ह्या गोष्टीमागे मोठमोठ्या 'शक्ती' आहेत, ही कल्पना त्यांना कशी आलेली असेल हें पाहणें मनोरंजक आहे. कृषि-संस्कृति भरास आल्यानंतर मानवी मनाला जे एक सुप्त सामर्थ्य गवसले, व त्यांतून त्या मनांत नवे विचार उदित झाले, अशा नवोदित मनाचे ( रेनास्सॉंट् माइंड् ) हे उत्स्फूर्त उद्गार आहेत. नवोदित मनाच्या या नुसत्या उभाऱ्या आहेत. त्यांत आपल्या दृष्टीला आज कल्पनारम्यता, अद्भुतता दिसते. तथापि अद्याप बुद्धिशीलता यावयाची होती. ती यावयास थोडा अवकाश होता. व त्या दृष्टीनें हे साहित्य म्हणजे 'मानवी जीविताच्या बाल्यावस्थेतले बोबडे बोल' (बॅबलिंग सॉंग्ज़ ऑफ् चाइल्ड् ह्युमॅनिटी) असें कुणी म्हटलें आहे, तें अवास्तव आहे असें म्हणण्याचे कारण नाही. सर्व जगाच्या साहित्याची साक्ष तशीच पडेल. साहित्याचा उगम हा मानवी जीवित-मूल्यांच्या प्रतीतीत आहे. अशी अनेक वा एखादें मूल्य प्रतीत होण्याइतके व्यापक मानवी जीवन, मन व बुद्धि यांपैकी कांहीहि यावेळी प्रगत किंवा उन्नत झालेलें नव्हतें. आणि साहजिकच उत्कृष्ट असे काव्य वा साहित्य विरलत्वानें आढळावे यांत नवल ते कसले?

**शांतिः पुष्टिः तुष्टिः चास्तु—**

ह्या साहित्याचे प्रातिनिधिक म्हणून आपलें वैदिक वाङ्मय घेतां येतें. हे सर्व वाङ्मय मंत्रात्मक, प्रार्थनास्वरूप असे असून किती तरी काल ते लेखाननिविष्ट नव्हते. किंबहुना तसे लेखनबद्ध न करण्याकडे ज्यांनी ते निर्मिलें त्यांचा कल होता. पूर्णपणें वाक्-मय असें हे 'वाङ्मय' होतें. या साहित्यास अतिमानवीपणाची छटा देऊन तसेंच ते टिक-विले गेले, हे पाहिलें म्हणजे या साहित्याची निष्ठा कोणती होती ते स्पष्ट होते. माणसाने लेखनकला शोधून काढून तिचा व्यवहार व उपयोग सर्रास सुरू केला, तरी वेदवाङ्मय हे वाणीरूपच राहिलें. ते तसें कां राहिलें हे समजण्यासाठी खोलांत जावयास नको. बहुसंख्य समाजाच्याठायी कोणतीच उन्नत निष्ठा निर्माण व्हावी अशी त्याची परिस्थितीच नव्हती. ती त्याच्या ठायी निर्माण होऊन त्याला हें ज्ञान द्यावयाचें कां नाही, हा विचार पुढे १० व्या ११ व्या शतकाच्या सुमारास निर्माण झालेला आहे.

वैदिक वाङ्मयाचा आशय 'प्रार्थना' आहे. या प्रार्थनेमागे जी नम्रतेची भूमिका आहे, ती निर्माण होण्याइतके ऋषि लोक प्रगत होते. त्याचें स्वरूप हे उत्स्फूर्त उद्गारात्मक आहे. त्यांत विचारांस आवहन नसून केवळ भौतिक जीवनांत स्वास्थ्य, समृद्धि, लाभावयास हवी अशी साधी आकांक्षा आहे. पण हे जे आवाहन आहे ते मात्र निरनिराळ्या 'देवतांना' आहे.

ह्या सामाजिक सांस्कृतिक पार्श्वभूमीवरून जेव्हा आपण 'मूल्या' चे दृष्टीने पाहूं लागतो तेव्हा असे आढळून येते की, या काली भौतिक समृद्धतेची इच्छा हे अंतिम ईप्सित होतें. ते साध्य करण्यासाठी मनाचे ठायीं नम्रता हवी असे वाटलें असावें. सूर्य उगवणे, पाऊस पडणे, पिकें वाढणें इ. भौतिक 'चमत्कार' घडवून आणणाऱ्या देवांच्या पायीं माणसानें आपलें सर्वस्व समर्पण करण्याची आंतून इच्छा निर्माण व्हावी, येवढीच प्रगति येथपर्यंत झाली होती.

वर उल्लेखिलेल्याप्रमाणे मानवी मनाला जी 'जाग' आली होती, तिच्या आधारें काव्याचा उगम कसा झाला हे पाहणे आवश्यक आहे.

**काव्याचा उगम दुःखांत नाही, यशोगानांत—**

हिंदुस्थानांत जगांतले पहिले काव्य जन्मास आले, व तें म्हणजे क्रौंचमिथुनापैकी एकाचा व्याधाचे हातून वध झाल्यानंतर वाल्मीकि ऋषीच्या मुखांतून बाहेर पडलेले "मा निषाद प्रतिष्ठात्वं..." हे उद्गार होत; असा एक समज रूढ आहे. कारुण्यभावनेचा तो जगांतला पहिला उद्रेक असेलहि. परंतु मानवी जमातीने केलेले ते पहिले काव्य, असा दावा टिकणें कठिण दिसते. याचे कारण साहित्याचा वा काव्याचा उगम दुःखांत आहे ही समजूत अवास्तव आहे हे होय. दुःख, पीडा, सहानुभूति या भावना 'सुसंस्कृत' आहेत. मनुष्याचें मन साध्यासुध्या दुःखानें व्याकूळ होण्यासाठी त्याची मानसिक प्रगति खूप झालेली असावी लागते. व अशी प्रगति झालेली असली तर, तिचा एक भाग म्हणून हे काव्य निर्माण होणें शक्य आहे. काव्याचा उगम हा दुःखांत निश्चित नाही. माणूस प्रथम

हासावयास शिकला व नंतर रडावयास शिकला. आणि त्याच अनुरोधाने काव्याचा उदय हा दुःखांत नसून यशोगानांत आहे.

**खरें पहिलें काव्य--**

मनुष्याने शेतकी अवस्थेंत प्रवेश केला. परंतु ही क्रिया पण होत होत आली. कांही टोळया वन्यावस्थेत आजहि आहेत व त्यावेळीहि होत्या. अशा टोळयांशी जेव्हा अधिक सुसंस्कृत लोकांची लढाई झाली, व त्यांत जेव्हा ती 'सुसंस्कृत' टोळी यशस्वी झाली असेल, तेव्हा तिच्या प्रमुखाची जरब आपल्या टोळीवर व दुसऱ्या जिंकलेल्या पण टोळीवर बसली असणे शक्य आहे. या जरबेंतून ... पुढे 'राजा' निर्माण झाला.

**उत्सवप्रियः खलु मनुजः --**

मनुष्य हा निसर्गतः उत्सवप्रिय आहे असे दिसते. उत्सवप्रियतेत उन्नत असा आनंद उपभोगावयास मिळावा ही उर्मी स्पष्ट दिसते. या उत्सव प्रसंगी आपला आनंद उत्साह व्यक्त करण्यासाठी जे अनेक मार्ग शोधून काढले त्यांत नृत्य, नाट्य, संगीत, ... इ. प्रमुख आहेत. त्यांचे अनुषंगानेच त्यापेक्षा अधिक उन्नत असे काव्य निर्माण झालें. राजा निर्माण केल्यानंतर माणसें त्याच्याठायी आपल्या निष्ठा केंद्रित करू लागली. कारण राजा हा लोकांच्या सामाजिक, राजकीय, मानसिक, आवश्यकतांतून निर्माण झालेला आहे. मग त्याच्या आयुष्यांतले, विवाह, विजय, पुत्रजन्म, वाढदिवस, त्याच्या कुटुंबीयांचे असेच प्रसंग हे 'उत्सव प्रसंग' ठरले. तसच कृषि ज्यांवर अवलंबून होती अशा ऋतूंचे सुद्धा उत्सव माणसाने सुरू केले. यांतून खरें पहिलें काव्य निर्माण झालें. तथापि असे सहेतुक काव्य खूपच नंतरचे आहे. खरें पहिले काव्य ज्यावेळी माणसाला गातां येऊं लागलें–म्हणजे त्याला आपल्या कंठांतून बाहेर पडणाऱ्या आवाजावर आपलें कांही प्रभुत्व चालू शकते, असें प्रत्ययास आले–त्याचवेळी जन्मास आले. माणसांना गातां येऊं लागल्यानंतर माणसें दिवस दिवस कशी गात असतील यांचे मोठे गमतीचें वर्णन येस्परसनने केलें आहे. खरा काव्याचा उगम तोच होय. पुढे समृद्ध कृषि अवस्थेंत काव्य हें त्यामानाने खूपच विविध झालें, आणि विशेषतः राजा आल्यानंतर तर ते

काव्याचा विषय i ..तीतरी काल झाला. राजाबरोबर राज्य पण आले. कृषिअवस्थेत प्रवेश केल्यानतर टोळीतील–वा राज्यांतील–एका विभागास अधिक सवड शांतता मिळू लागली. त्याला बौद्धिक प्रगति करणं शक्य झाले. सृष्टीच्या चमत्काराचे गूढ सोडविण्याचा त्याचा प्रयत्न सुरू झाला. हे जे गूढ उकलत गेले, त्यातून दंतकथा, काव्य निघालें. राजाच्या यशोगानांतून काव्याच्या उत्पत्तीचे धागेदोरे मिळतात. पुढे सृष्टीच्या चमत्कारांच्या मागे पण निरनिराळ्या 'शक्ति' आहेत असे वाटूं लागून त्यांच्या आराधनेसाठी 'प्रार्थना' सुरू झाल्या असे वेदांवरून म्हणतां येते. व हे वा असलेच जगांतील खरं पहिले काव्य.

**'महाकाव्या'ची पार्श्वभूमि—**

राजाला पुढे अधिक यश मिळालें. त्याच्या राज्याचा विस्तार वाढला. मानवी व्यवहारांची गुंतागुंत वाढली. मानवी प्रज्ञा व कर्तृत्व यांना अधिक वाव मिळाला. असा वाव देणाऱ्या राजाचें वैभव गाणे आवश्यक वाटूं लागलें. त्याची शूर कृत्यें वर्णन करण्याची जरूरी भासूं लागली. त्याच्या भावनांना, विचारांना एकप्रकारचे अद्वितीयत्व प्राप्त झालें. कारण सर्वच बाबतीत तो श्रेष्ठ ठरत होता. व त्याच्याच कृपेने कविवर्गाला सुखी जीवन जगणें शक्य होते. त्याचा वंश पण मोठा झाला. सूर्यचंद्रापर्यंत त्याच्या परंपरा जाऊ लागल्या. तो वंश टिकावा, वंशांतील लोकांस इतिहास कळावा, असें राजाला पण वाटूं लागलें. 'कवीं'ना राजावर निसर्ग शक्तीची, देवतांची, मर्जी आहे असे भासूं लागलें. त्याचा पराक्रम गाणें 'पुण्यप्रद' वाटूं लागलें, व अशा रीतीने 'महाकाव्य' व त्याला लागणारी मनोवृत्ति व पार्श्वभूमि निर्माण झाली. आणि निरनिराळ्या प्रदेशांतील सुसंस्कृत–मानवी–गटांत महाकाव्यांचा जन्म झाला.

कृषि–संस्कृति उन्नताअवस्थेंत असतांना, अशा प्रकारें जगांतील निरनिराळ्या देशांत 'आर्ष महाकाव्यां'चा जन्म झाला. आपल्याकडील रामायण–महाभारत, चीनमधीलही तशीच रचना, व इजिप्त बॅबिलोनचा वारसा ज्या संस्कृतीने घेतला ती ग्रीक संस्कृति, तिच्यांत होमरच्या काव्यांसारखा काव्ये झाली, होऊ लागली. महाकाव्याच्या संबंधीच्या विवेचनांत आजही ह्या काव्यांचा एक वेगळा प्रकार करतात. त्यांना 'इतिहास-वजा' काव्ये असें पण म्हणतात. त्यांचें स्वरूप त्या दृष्टीने पहाणे अधिक उद्बोधक आहे.

**साहसे श्री प्रतिवसति—**

या महाकाव्यांनी वा तत्सम काव्यांना मानव जातीच्या आवश्यकतेच्या दृष्टीने फार मोठ्या जीवित–मूल्याचा पुरस्कार केला आहे. व ते जीवित-मूल्य म्हणजे शौर्य साहस. उत्साह हा एक व्यक्तिगत स्थायीभाव असला तरी त्याला सामाजिक किंवा कर्तृत्वाची बैठक आणण्यासाठी, त्याचा उत्कर्ष साधणे आवश्यक होते. त्याच गुणाची तत्कालीन परिस्थितीच्या दृष्टीने अधिक आवश्यकता होती. यापेक्षा उच्चतर अशा जीवितमूल्यांची साधना सुरू होती, तरी त्यांची महती पटण्याची वेळ अद्यापि यावयाची होती.

ही अशी महताप्रधान महाकाव्ये निर्माण होण्याचे कारण, मानवांतर्गत शौर्यास वा कर्तृत्वास अवाहन पोचावयाची इच्छा निर्माण व्हावी हे असावें. कारण पुढच्या पिढीपर्यंत कर्तृत्वाचे सातत्य टिकवून धरण्याचा वा ठेवण्याचा हा मोठा मार्ग उपलब्ध झाला आहे असे वाटणें साहजिक आहे. व राजा या संस्थेच्या सातत्यासाठी हे सर्व आवश्यक होते.

ह्या महकाव्याचें 'अितीहासवजा' असें स्वरूप असण्यास आणखीहि एक कारण संभवते.

**हीं महाकाव्यें म्हणजे तत्कालीन 'विश्वकोश'** (एन्सायक्लोपीडिया)—

कृषि–संस्कृतीत स्वस्थता लाभली ती एका विशिष्ट वर्गास लाभली, ह्याचा उल्लेख मागे आलाच आहे. त्या जेत्या वर्गातील व्यक्तीच्या भावना, विचार, आकांक्षा...इ. ना महत्व आलें. व त्यांच्या कर्तृत्वालाच वाव मिळणें शक्य झालें. समाज बनत बनत सुयंत्रित होत होता. त्याच्या व्यवस्थेसाठी कायदे करावे लागत होते. त्यांपासून तो इमारती बांधणे, औषधी शोध लावणें, रस्ते करणे, घरे बांधणें, व्यापार इ. गोष्टींकडे लक्ष द्यावे लागत होतें. त्याशिवाय कनिष्ठ संस्कृती–अवस्थेंत असलेल्यांचे वारंवार हल्ले होत होते. त्यांच्यांवर प्रभुत्व संपादन करावे लागे. आणि राजाच्या प्रज्ञेचा वा कर्तृत्वाचा बराच भाग यांत खर्च होई. बुद्धिनिष्ठ असे राज्य-शास्त्र जन्मले नसल्याने केवळ युद्धकलेचें पारंगततत्व हे महत्त्वाचें ठरलें.

व यशोगानांत गांवयाच्या अनेकविध गोष्टीत त्यालाच प्राधान्य येणे क्रमप्राप्त झाले. ही सर्व प्रकारची कार्ये या वरिष्ठ विजेत्या वर्गास करणे प्राप्त होतें, तेंहि समाजाच्या बहुसंख्य वर्गास दास्यांत ठेऊन. साहाजिकपणे इतक्या विविध शाखांत मानवी वर्गाधिष्ठित "प्रतिभा" खर्च झाल्याने फारच थोडे की, खरोखर बुद्धीने हुशार होते, त्यांचे मानसिक बाजूकडे लक्ष गेले. बाकीच्यांना ही कामे, निदान 'लढाई' हे पुरून उरण्यासारखे होत. हे जे 'कवि' म्हणून म्हणवून घेऊं लागले. त्यांचें काम तितकेच महत्वाचें होते. त्यांचा जीवन–व्यवसायच होता तो. व त्यांनी आपण समजतों त्या अर्थाने हे काव्य लिहिले नाही. ते प्रज्ञावंत लोक असल्याने समाजशास्त्र, धर्मशास्त्र, नीतिशास्त्र इ. शास्त्र, तसेंच मानवी मनाचे व्यवहार, कर्तृत्व, ही त्यांना दिसली, ती सर्व अद्याप प्राथमिक अवस्थेतच होती. परतु हा 'ठेवा' जो जमत होता तो जतन करून ठेवावा असे वाटले, व तें त्यांनी पद्यमय आणि बृहद्रूप देऊन साधले. म्हणून त्यांस आपण आज 'महाकाव्य' म्हणतो.

त्यांची वास्तव आकांक्षा ज्ञानाचा संग्रह करून ठेवण्याची, कर्तृत्वाचें लोण पुढील पिढीपर्यत लावण्याची, इतिहासाची परंपरा सांगण्याची होती. व त्यांच्या परिस्थितीनुरुप जे जे ज्ञान त्यांना उपलब्ध झालें ते तें सर्व कर्तृत्वास आवाहन देण्याच्या दृष्टीने त्यांनी ग्रथित केलें. थोडक्यांत असें म्हणतां येईल की, त्याकालचे ज्ञान व मानवी कर्तृत्व यांच्या साहाय्याने तयार झालेला विश्वकोश ( एन्सायक्लोपिडिया ) म्हणजे ही महाकाव्यें होत. व हे विवेचन 'इतिहास'वजा महाकाव्यांना विशेषतः लागू पडेल. 'व्यासोच्छिष्ट-जगत्सर्वं' हा जो पर्याय रूढ आहे, त्याचे हे स्पष्टीकरण स्वीकार्य वाटावे.

म्हणजे जीवन इतके प्राथमिक अवस्थेत होतें की, समाज-जीवनाचें कोणतेंच अंग विकसित झालें नव्हतें. परंतु आपल्या जीवनांतील निरनिराळ्या अंगांची बीजें रोवली गेली होती, व म्हणूनच आज आपणांस सर्व प्रकारच्या संशोधनासाठी या महाकाव्यांचा आधार घ्यावा लागतो.

हा महाकाव्याचा काल म्हणजे आपल्या या विवेचनाच्या दृष्टीने लेखन पूर्व व लेखनोत्तर या दोन कालखंडांच्या मधला संधिकाल होय. यापुढे

कांही कालानंतर लेखनाचें व साहित्याचें अविभाज्य अस्तित्व निर्माण झालें, त्याचें 'वाङ्मय'त्व संपलें. या जीवनांत साहित्यास विशेषतया निद-र्शक असे कार्य नाही, किंबहुना जीवनास अंग उपांगें फुटली नसल्याने, सारे ज्ञान, भावना, आशा आकांक्षा ... ही एकतारूपाने या वाङ्मयांत अवतरल्यासारखी दिसतात, व हेंच लक्षण प्रामुख्याने दृष्टीत भरते.

**ग्रीक संस्कृतीचें ऋण—**

या कालविभागाचा विचार करतांना ग्रीक संस्कृतीच्या एतद्विषयक स्वरूपाचा थोडा उल्लेख करणें प्राप्त आहे. ग्रीकांना प्रथम लेखनकला विदित नव्हती, पुढे त्यांनी ती फिनिशीअनांजवळून घेतली. तरी साहित्यासाठी त्यांनी ती वापरली नाही.

ग्रीक सस्कृतीचा अव्वल वारसा विशेषतः बौद्धिक वारसा आजच्या युरोपीय संस्कृतीकडे जातो. असे मत रूढ आहे व त्यांत बरेच तथ्य आहे. बुद्धिप्रधान ज्ञानाचा व संस्कृतीचा आविष्कार फार ठसठशीतपणें ग्रीकांनी केला. आपल्या आजच्या कालांतील सांस्कृतिक जीवनाचें बरेंचसें तत्त्वज्ञान ग्रीकांच्या या अविष्कारापासून निघालेलें आहे. ग्रीक संस्कृतीची दोन वैशिष्ठ सांगतां येतील. पहिलें असे की, ग्रीक संस्कृतीने ज्ञानाचीच उपा-सना प्रामुख्याने केली. इतर स्थापत्य—कला ... इ. भौतिक कालांत त्यांची प्रगति त्यामानानें बेताचीच आहे. मानवी प्रतिभा अशा प्रकारें बौद्धिक कार्यास मुख्यतः कामी लागल्याने निरनिराळे राजकीय, सामाजिक, विचार निर्माण झाले, व त्यांतून उन्नत मूल्यें उदयास आली. व तीच आज आपणांस पूज्य वाटतात.

ग्रीक संस्कृतीचें दुसरें वैशिष्टय म्हणजे, धर्म व तत्त्वज्ञान यांचें साहचर्य नसणें, व हे फार मोठें गमक आहे तिच्या श्रेष्ठत्वाचें. आज आपली अशी कल्पना आहे की, धर्माशिवाय संस्कृतीची आराधाना व्यर्थ आहे. व तशी आराधाना झाल्याचा इतिहासांत दाखला नाही. पण ते म्हणणं चूक आहे. ग्रीकांपर्यंतच्या कालांत धर्म ही संस्था सामाजिक शक्ति म्हणून अस्तित्वांत नव्हती नंतर विश्वधर्म निर्माण झाला, व तो सामाजिक शक्ति, स्फूर्ति,

निधान बनला.

ग्रीसची तत्त्वज्ञान, नाट्य, काव्य, ( महा व भावगीतात्मक ) यांतील प्रगति व बुद्धिशीलताही दृष्टीस भरतेही. पण याहि विविध संस्कृति-शाखांस तत्कालीन जीवनांत वेगळे व स्वतंत्र स्थान होते, असे दिसत नाही. त्या जीवनांत अविभाज्यपणे विलीन झाल्या, व असे अविभाज्य राहून जीवन उन्नत करावयाचें हे या संस्कृतीतील साहित्याचें स्वरूप होय, वैशिष्ट्य होय.

ग्रीसने तत्त्वज्ञान, समाज–राज्यशास्त्र, नाट्य, काव्य, वक्तृत्व, इ. क्षेत्रांत फारच मोठी प्रगति केली होती. आपल्या कालाचा लोकशाहीचा विचार येथ प्रथम उद्भवला. त्याचप्रमाणे महाकाव्य, कथाकाव्य, भावगीत, दुक्खांतिका, ...इ. काव्य प्रकारांचा पण उभ्दव झालेला होता असे दिसते. त्यापेक्षाहि या सर्व साहित्यप्रकारांचें साहित्य म्हणून विवेचन सुरू झालें असें दिसते. व त्या संबधांत ॲरिस्टॉटलचें नांव सर्व विश्रत आहे. समृद्ध जीवनात माणसाची प्रज्ञा निरनिराळया क्षेत्रांत किती अकुंठितपणें चालू शकते, याचे प्रत्यंतर या ग्रीसच्या उदाहरणांवरून येते. आपल्याकडे वेदांनंतर उपनिषत्काली बुद्धि-वादास अशीच भरभराट आलेली दिसते. व त्याचेंही कारण समृद्ध स्थिति शील जीवन-समाजाच्या एका वर्गास लाभले होते, हेच आहे. तथापि ग्रीक-बुद्धिवाद तेथेच संपला, आणि उपनिषद्-कालीन बुद्धिवादाची तीच गत झाली. कारण तो सारा बुद्धिवाद, व ते सारे ज्ञान, हे केवळ एका वर्गापुरते मर्यादित होतें. प्लेटोने आपल्या आदर्श राज्यव्यवस्थेत गुलामांना साधे नागरिकत्वाचे अधिकार दिलेले नाहीत; तर वेदाचा, उपनिषदांचा अर्थ लावण्याची, ती पठण करण्याची मोकळीक ब्राह्मणाविना इतरांस नव्हती.

**बुद्धिशीलतेचे तेजःकण—**

यानतर पुढे हजार दीड हजार वर्षे धार्मिक प्राबल्याचा काल सुरू झाला. त्यांत जीवनांतील बुद्धिशीलता लोपली असें दिसतें. परंतु अशा बुद्धिशीलतेची गमकें प्रत्येक संस्कृतीत दिसून येतात. ग्रीकांचे अधिष्ठान तर बुद्धीवरच होतें. त्या खेरीज त्यांना तत्वज्ञानाची उपासना करतां येणें अशक्य होते. डिमाक्रसी हा शद्ब ज्याच्या नांवावरून आला त्या 'डिमोक्री-

टसने' सर्व विश्व अणूंनी भरलेलें आहे, हा विचार जोराने मांडला. आपल्याकडील कणादाची आठवण या संबंधांत येण्यासारखी आहे. ॲनॅक्झिमॅंडर या तत्त्वज्ञान्याने मनुष्य हा माशापासून झाला आहे असे सिद्ध केलें होतें. आपल्याकडील अवतार कल्पनेकडे या दृष्टीने पाहिले तर त्यांत एक-प्रकारची मानवी जीविताची उपपत्ति—नव्या उत्क्रांति तत्त्वाला जवळ असणारी अशी—संभवते. हा व उपनिषदांचा उल्लेख वर आलेला आहेच. पण बुद्धिशीलतेचें, ज्ञानाचें एवढे व असें अपवादात्मकच स्वरूप. यापुढे ही प्रवृत्ति वाढीला लागली नाही. त्यापेक्षा धर्मभावनेला भलतेंच महत्त्व आलें. आणि त्यामुळे सांस्कृतिक जीवनास एक वेगळेच वळण लागले. कृषि—संस्कृतीची एक नवीन अवस्था सुरू झाली.

स्थिरता-शील जीवनास सुरुवात—

हे आर्ष महाकाव्यांचे युग संपले. अधिक शांततामय परिस्थिति निर्माण झाली. राज्यें मोठीं झाली, उत्पन्न वाढलें, राज्यसंस्थेच्या व्यापकत्वाच्या कक्षा वाढल्या. त्यायोगें समाजाची धारणा बदलूं लागली. ती अधिक अवयवबद्ध होऊं लागली. शेतीचें उत्पन्न वाढल्याने अन्नाची ददात पण मिटली. जीवन अधिक स्थिर होऊं लागलें. अशी परिस्थिति आली की, फारसा सामाजिक फरक न जाणवतां वर्षानुवर्षे जाऊं लागली. त्याचा परिणाम एक प्रकारची गतानुगतिकता येण्यांत झाला, व या गतानुगतिकतेच्या आधारे समाज—व्यवस्थेच्या नियमांसाठी धर्मसंस्थेचा उगम झाला, जीवन गतिशून्य झालें, एकंदर सांस्कृतिक प्रगति मंद झाली.

'वर्गीय' जाणिवेच्या शंका—

ह्यां धर्मपूर्व कालांत ही जी ज्ञानाची सेवा झाली, ती उज्ज्वल असली तरी तिच्या उज्ज्वलतेचें स्वरूप व सामर्थ्य यांची प्रतीति आज आपणांपेक्षा ती प्रगति ज्यांनी केली त्यांनाच अधिक आलेली असणे शक्य आहे. जोपर्यंत समाजाचे दोन वर्ग, एक अत्यंत प्रगत व दुसरा अत्यंत अप्रगत असे होते, तोंपर्यंत हें सर्व ठीक झालें. परंतु जेव्हा 'अप्रगत वर्गाला ह्या ज्ञानाची जाणीव झाली तर?' असा विचार प्रगत वर्गातील लोकांस आला, तेव्हा त्या

वर्गाचे ठायी नवी जाणीव, नवी भीति, निर्माण झाली. समाजाची बंधनें अधिक पक्की असावयास हवीत, त्यांत शिथिलता असतां उपयोगी नाही असे वाटूं लागलें. कृषिव्यवसायाने समाज पण अधिक स्थितिशील, गतानुगतिक, होत होता. तेव्हा त्याचें मन जिंकतां येणें ह अधिक शक्य व सोपे वाटूं लागले, व ह्या परिस्थितीतून धर्मसंस्थेचा जन्म झालेला आहे. नीतिकथा लेखक इसाप हा ग्रीक गुलाम होता. त्याने लिहिलेल्या वा त्याच्या नांवावर मोडत असलेल्या नीतिकथांवरून गुलामांचे ठिकाणीहि विशिष्ट जागृति झाली होती असे दिसते.* त्याचे किंवा आपल्याकडीलहि अशी इतर उदाहरणे दाखविता येतील. महाभारतांतील कर्णाचे पात्र, एकलव्याची कथा, रामायणांतील शंबुकाची गोष्ट, इ. उल्लेख ह्या दृष्टीने अभ्यासण्यासारखे आहेत.

साहित्यिक प्रगतीला पोषक असा एक भाग म्हणजे या कालांत लेखन-साहित्य मुबलक प्रमाणांत उपलब्ध झाले असणे शक्य झाले. व लेखनाची व्याप्ति ही इतर व्यवहारांपासून रुदावत साहित्याप्रत आली. तथाकथित 'साहित्य' लेखननिविष्ट झाले की, त्याचा प्रसार वाढणार. हे ज्या वर्गाने ते साहित्य जतन केले, निर्माण केले, त्यास कळण्यासारखे होते. व प्रसार वाढल्याने त्या विशिष्ट वर्गाचे महत्त्व कमी होणार होते. या भीतीतूनच पुढे 'वेद हे अपौरुषेय आहेत, ती परमेश्वराची निश्वासितें आहेत, अपवित्र अशा लेखन-साहित्याने त्यांना भ्रष्ट करणे अयोग्य, पापप्रद आहे' अशी विचारसरणी फोफावत गेली. त्याबरोबर सामाजिक विषमता वाढीला लागली. सांस्कृतिक प्रगतीही मंद झाली.

आपल्याच देशांत ही परिस्थिति होती असें नव्हे. कृषि-संस्कृति उतारावस्थेत असतांना साहाजिकपणेच सर्वच देशांत हा प्रकार होत होता. यूरपमध्ये तर धर्मसंस्था विरोधासाठी सामर्थ्याने संघटित-होत होती. राज्यसंस्थेशी ती एकरूप झाली होती. रोमन-साम्राज्य

* ग्रीकमधील डेल्फी नांवाचें स्थळास भेट देत असतां तेथील अधिकाऱ्याशी इसापचे संभाषण चालू होते, आणि त्यांत त्याची कांही विशिष्ट विधाने तेथील अधिकाऱ्यांस लागली म्हणून त्याला त्यांनी तेथेच ठार मारले!

हे ' पवित्र साम्राज्य ' ( होली एम्पायर ) गणले जाऊ लागलें. शेतीच्या योगाने जी गतानुगतिकता निर्माण होत होती, तिला ज्याप्रमाणे सर्व-सामान्य जनता बळी पडत होती, त्याचप्रमाणे हा धर्माधिकारी वा राज-प्रमुखांचा वर्ग पण बळी पडत होता. त्याला पण प्रगतीचे मार्ग दिसेनासे झाले होते. व या कालासच अंधारयुगें, मध्ययुगें म्हणतात. आपल्याकडे ती तितकी 'अंधारी' नव्हती, यूरपमध्ये ती अधिक अज्ञानपूर्ण होती.

असे असले तरी या कालांतल्या साहित्याने लेखनकलेच्या आधाराने फार मोठ्या जीवितमूल्याची सेवा केली व ते म्हणजे 'धर्म' हे होय. या धर्माच्या अनुरोधाने अधिक उन्नत मानवीमूल्यें निर्माण झाली. त्यामुळे साहित्यहि उन्नत, गुणपूर्ण झालें. साहजिकपणेंच त्या जीवितमूल्यांचा विचार करणें आवश्यक आहे.

धर्मसंस्थेप्रत येण्यांत माणसाने फार मोठा टप्पा गाठला आहे. मानवी जीविताला व्यापक नैतिक पाठबळ संपादणे, हे धर्मसंस्थेचे प्रमुख कार्य होय. कोणती उन्नत मूल्यें धर्मसंस्थेने निर्माण केली ह्याचा ऊहापोह पुढे येणारच आहे. तथापि ह्या ठिकाणी जो दृष्टिकोण स्वीकारला आहे त्याचे आधारें असे म्हणतां येते की, कृषि–संस्कृतीच्या उतरत्या अवस्थेत धर्म ही संस्था रूढ व लोकप्रिय झालेली आहे. उन्नत वाटणारी अशी मूल्यें सुद्धा अशा प्रकारें संस्कृतीच्या उतारावस्थेत निर्माण झालेली आहेत. आताच जी ' वर्गीय जाणिवे 'ची शंका व्यक्त केली आहे, ती या दृष्टीने महत्त्वाची आहे. धर्म मुख्यतः समाजांतील प्रगत वर्गाने निर्माण केला. तो निर्माण करण्यांत स्वतःचें स्थैर्य साधणें हा त्याचा उद्देश असणे अपरिहार्य आहे. धर्माला मान्य असणाऱ्या 'उन्नत' मूल्यांना ही सामाजिक पार्श्वभूमि आहे, हे विसरून चालणार नाही. तथापि या संस्कृती–अवस्थेतला युग-विचार हा धर्म-विचार होता. आणि अर्थातच कनिष्ठ वर्गाची प्रतिक्रिया पण धर्माच्या नावाखालीच झालेली आहे, हें विसरून चालत नाही. या क्रिया-प्रतिक्रियांचें स्वरूप पाहण्यापूर्वी या अवस्थेचा नवा विचार जो 'धर्म' तो कसा उदित झाला हे प्रथम पाहणें आवश्यक आहे.

: २ :

**धर्मसंस्था रूढा—**

धर्मसंस्थेचा उगम हा भाषेप्रमाणेच मनुष्याच्या सामाजिक व व्यक्तिगत गरजेंतून झाला आहे. निसर्ग—चमत्कारांबाबत जी 'भीति' किंवा आश्चर्य वाटलें तिच्यांतून निसर्गाच्या श्रेष्ठतेचा व सर्वकपतेचा ठसा मनुष्याचे मनावर उमटला. परंतु त्याही पेक्षा धर्मामध्यें अंतर्भूत होत असलेल्या पारलौकिक बाबींचा विचार मृत्यूच्या आस्तित्वाने वा प्रसंगाने आला असावा. उदाहरणार्थ एकादी निकटवर्ति व्यक्ति मृत झाली तर देहांतील चैतन्य नष्ट होतें हें लक्षांत घेऊन त्याने मृतदेहाची विल्हेवाट पण लावली असेल. परंतु स्वप्नांत जेव्हा त्याच व्यक्तीशी संभाषणादि व्यवहार घडले असतील तेव्हा त्याला साहजिक असें वाटणें शक्य आहे की, देहस्वरूपांत नसली तरी इतर स्वरूपांत ती व्यक्ति आपणाभोंवती वावरत असावी, आपल्या जीवनावर मृत्यूनंतरहि तिची सत्ता चालत असावी. ह्या विचारांतून आणि निसर्ग 'चमत्कारां'तून विशिष्ट अतिमानव (सुपर नॅचरल) शक्तीचा प्रत्यय माणसास आला असावा. व येथून देवाचा शोध सुरू झाला असें दिसतें. मग नदी, सरोवर, पर्वत, अरण्य, मेघ, पशू झाडें, मनुष्यपूर्वज... इत्यादींच्या ठायीं तथाकथित **देवाचें** आस्तिव त्याने मानलें. पुढे प्रगत अवस्थेंत चिकित्सा बुद्धीवर आधारलेल्या **तत्त्वज्ञानांचा** जन्म झाला. जगावर नियंत्रण करणारी शक्ति कोणती असावी ह्याबद्दल बुद्धीचे तर्काचे आधारें संशोधन सुरू झालें...त्या संशोधनांत जे निष्कर्ष निघाले ते 'गूढ' असणें क्रमप्राप्त होतें. तथापि त्यांतील गूढता दडवून ठेवण्याचा प्रयत्नही झालेला आहे. त्या गूढतेबरोबर विश्वास आला, श्रद्धा आली, व धार्मिकताहि पण आली.

**तत्त्वज्ञानांचा जन्म—**

धर्मसंस्थेच्या आश्रयाने निरनिराळ्या तत्वज्ञानांचा उदय झाला. जगा-संबंधींचें (सृष्ट चमत्कारांचें) वास्तव—ज्ञान, व मानवी जीवितासंबंधीचें तर्क-सिद्ध ज्ञान ह्या दोहोंचा संबंध कसा आहे हें पाहण्याच्या प्रयत्नांतून तत्त्वज्ञान निर्माण झालें. मनुष्याला स्वास्थ्य आल्यानंतर त्याला जर कोणते प्रश्न वा कोडीं सोडवावीशीं वाटलीं असतील तर तीं म्हणजे, पृथ्वी हें काय आहे? झाडें वाढतात कशीं? रात्री आकाशांत दिसतात ते तारे, चंद्र, हे काय आहेत? तसेंच पृथ्वी निर्माण कशी झाली? या सबंध विश्वामागे कांही संयोजन आहे काय? मानवजीवनाचें सार्थकत्व वा कृतार्थत्व कशांत आहे? इ. इ. होत. आजहि ह्या पैकी कांही प्रश्न अनिर्णितच आहेत. त्याचा शोध आज तत्त्वज्ञानाचे व विज्ञानाचे द्वारा चालू आहे. ह्या प्रश्नाची विल्हेवाट आज आपण निरानिराळ्या शास्त्रांत मोडणारे प्रश्न अशी लावूं*. 'प्रथमावस्थेंत अशी विभक्तिकरणाची आवश्यकता वाटणें अशक्य होतें. ह्या प्रश्नांचा थोडा उलगडा ज्यांनी केला ते प्रामुख्याने धर्मसंस्थेशी संबंधी होते. त्यांना मिळालेली उत्तरें अधिक गूढ करून सर्वसाधारण लोकांपासून दडवून ठेविली गेलीं. अशा रीतीने मानवीजिज्ञासा वा प्रज्ञा बरीचशी प्रतिहत होण्याचा प्रयत्न झालेला आहे.

व्यक्तिगत अशा वा तत्त्वज्ञानात्मक अशा स्वरूपाबरोबर धर्मसंस्थेला फार मोठें असें सामाजिक स्वरूप होतें. गांव वा शहर वसविल्यानंतर जो 'समाज' निर्माण झाला, त्याच्या संरक्षणाचे व स्वास्थ्याचे दृष्टीने कांही नियम. बंधनें, असणें आव-श्यक होतें. हे नियम घालून मानवी जीवनाला एक प्रकारचा व्यवस्थितपणा व सुरळीतपणा आणण्याचा यत्न धर्मसंस्थेने केला आहे. तिने सामाजिक वागणुकिसाठी व व्यक्तिगत वागणुकीसाठी कांही नियम तयार केले. त्याच्या पालनाचें महत्त्व त्याच संस्थेच्या द्वारें लोकांना पटविलें गेलें. व अशा प्रकारें मनोव्यवहार व समाजव्यवहार यांत एक प्रकारचें नियंत्रण प्रविष्ट करण्याचे म्हणजे नीति निर्माण करण्याचें फार मोठें कार्य धर्मसंस्थेने केलें आहे. प्रत्यक्ष ते

* ॲस्ट्रॉनॉमी वा खगोलशास्त्र हें १८ व्या शतकापर्यंत तत्त्वज्ञान ह्या ज्ञानशाखेंत मोडत होतें, असें बर्ट्रेंड रसेलनें एकाठिकाणीं म्हटलें आहे.

नीतिनियम न्याय वा सोय यांवर अधारलेले होते काय हा प्रश्न नाही, परंतु धर्म-प्रमुख वर्गाने जें निबंधन सुरू केलें तें अशा प्रकारचें होतें.

**हें साहित्य धर्म–विचार–प्रधान कां ?––**

साहित्य-विषयक चर्चेत हें सामाजिक विवेचन कित्येकांना अस्थानी वाटणें शक्य आहे. परंतु लेखन-कलेची व साहित्याची सांगड बसल्यापासून तों मुद्रण कलेपर्यंतचें जगांतील सर्व देशांचें साहित्य हें धर्म–विचार--प्रधान आहे, हें लक्षांत घ्यावें लागतें. याच काळांत 'धर्म' संस्थेला 'विश्वधर्म' हें स्वरूप आलें, ती संस्था एक सामाजिक शक्ति म्हणून महत्त्व पावली. मानवी जीवितार्ची मूल्यें पण धर्मसंस्थेच्या आधारेंच विकसित झालीं, व त्यांचा उत्कर्ष पण साहित्यांत धर्म संस्थेस अभिप्रेत असलेल्या–तिला साजेशा पद्धतीने झाला. म्हणून सर्व जीवनाला व्यापून टाकणाऱ्या अशा या सामाजिक संस्थेचें थोडें मूलगामी विवेचन येथे आवश्यक वाटलें.

प्रथमावस्थेंत धर्मसंस्थेनें मनुष्याच्या मनाला व समाजाला सुव्यवस्थित व शांततापूर्ण स्वरूप देण्यांत यश मिळविलें. या काळांत बहुसंख्य लोकांचा व्यवसाय शेती वा मेहनतीची कामें करणें हा होता. धर्मविचारानें मनुष्य-मनाची पकड घेतल्यानंतर विशेष असंतोष न वाढतां समाजजीवन शांततापूर्ण राखणें थोड्या लोकांस शक्य झालें. साहजिकपणेंच धर्म व राज्य या संस्था अविभाज्य स्वरूपाने समाज व व्यक्ति जीवन नियंत्रण करत्या झाल्या. प्रत्येक देशांत हाच प्रकार झालेला आहे.

धर्मसंस्थेचें आणखी एक महत्त्वाचें कार्य म्हणजे शिक्षण. शिक्षण हें या कालांत धर्म–मंदिरांतून देण्याची व्यवस्था असे. त्याचें स्वरूप नीतिप्रधान असे. ती नीति पण ज्यांनी ती निर्माण केली त्यांच्या सोयीची. शिक्षण घेण्याच्या अधिकारांत सुद्धां सर्व साधारण समाजाला स्थान नव्हतें. असें असलें तरी मनुष्याच्या मनावर लीनतेचा फार मोठा ठसा धर्मसंस्थेनें उमटविला. व त्यामुळें समाज शांतता प्रधान बनले.

**उन्नत जीवन मूल्यांचा उदय––**

साहित्याच्या व संस्कृतीच्या दृष्टीनेहि धर्म या संस्थेचें महत्त्व अपूर्व आहे.

समाज-व्यवस्था अन्याय-पूर्ण असली तरी समाजांतील ज्या वर्गाचें जीवन संपन्न होतें त्याला उन्नत जीवित-मूल्यांचा साक्षात्कार होत होता. व ती सर्वसाधारण माणसाच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न त्याच्याकडून होत होता. साहित्यांतून त्याचेंच आविष्करण होत होतें. हीं जीवितमूल्यें म्हणजे **सत्य, धर्म, नीति, (चारित्र्य), दया, सत्प्रवृत्ति, सहिष्णुता, परमेश्वर इ.** होत. विश्वधर्मांचें मोठेपण या जीवित-तत्त्वांच्या पुरस्कारांत, आणि तीं मनावर बिंबविण्यात आहे. अखिल मानवजातीला हीं जीवित-मूल्यें प्राणापलीकडे-अत्यंत प्रिय अशीं वाटत आलीं आहेत. प्रदेश बदलला, धर्म बदलला, धर्माला अभिप्रेत असणारें तत्त्वज्ञान बदललें तरी, हीं जीवितमूल्यें तशीच आकर्षक राहिलीं. त्याचें लोकांवर इतकें जबरदस्त वजन पडलें की कित्येकदां अन्याय दिसत असूनहि लोकांनी या जीवितमूल्याचा पुरस्कार केलेला आहे. अशा प्रकारें भौतिक जीवनापलीकडे जें काही अज्ञात आहे, त्यासाठी भौतिक सुखांचा परित्याग करण्यास मनुष्यास तयार करणें हे धर्मसंस्थेचें अत्यंत भव्योदात्त असें अंग आहे. उन्नत मानवी जीवित-मूल्यांचें धर्मसंस्थेने हें जें आराधन केलें त्यामुळें तिची पकड समाजावर फार विलक्षण बसलेली आहे.

## स्थितिशीलता संस्कृतींत उतरली—

सत्य, नीति, इ. हीं जीं तत्त्वें वा मूल्यें निर्माण झालीं ती जीवनात एक प्रकारची स्थिरता, उदात्तता, आणण्यासाठी; जीवित अधिक उज्ज्वल करण्यासाठी. परंतु या मूल्यांची अंमलबजावणी करण्याचें कार्य ज्या वर्गाच्या हातीं गेलें त्याचे हातांत भलतीच सत्ता केंद्रित झाली. व त्या सत्तेचा अपलाप होऊं लागला. ह्या मूल्याचें त्याला पोषक असें स्पष्टीकरण फक्त मान्य करण्यांत आलें. त्यामुळें समाज अधोगतिप्रत जाऊं लागला. शेतीच्या योगाने जीवित इतकें नियमबद्ध, गतिहीन झालें होतें की, वर्षानुवर्षे काडीचाहि फरक न घडतां रूढ तऱ्हेने तें कंठणें शक्य झालें. विशिष्ट ऋतूंत विशिष्ट कामें तशीच करावयाचीं, व त्यांनें—अपेक्षेप्रमाणे—विशिष्ट ऋतूंत फळ मिळावयाचें, ह्या ठराविकतेचा परिणाम असा झाला कीं, जीवन गतिशील असतें वा असावें, अशी जाणीवच मुळीं नष्ट झाली. हा परिणाम मन्सून प्रदेशीय राष्ट्रांत अधिक झाला. यूरपमध्ये

हवामानात तरी लहरीपणा वा अनिश्चितता होती, पण तीहि येथे नव्हती. राजे-लोकांच्या एकमेकांत महत्त्वाकांक्षेपोटी होणाऱ्या लढाया सोडल्या तर सर्व समाज शतकानुशतकें स्थितिशीलच राहिला...श्रीकृष्णाचे वेळची परिस्थिति जवळ जवळ त्याच स्वरूपांत अकबरापर्यंत होती असें म्हटलें असतां फारशी अतिशयोक्ति होत आहे असें वाटण्याचें कारण नाही.

## साहित्यांतील विदग्धपणा—

संस्कृति जशी स्थितिशील झाली तसें साहित्यहि झालें. 'आर्ष महाकाव्यें' जाऊन 'विदग्ध महाकाव्यें' आली. आर्ष महाकाव्यांचा उद्देश हा तत्कालीन सर्व ज्ञान एकत्र करून ठेवण्याचा आहे; याचे उलट विदग्ध महाकाव्यातून केवळ साहित्यविषयक विचारांना व संकेताना प्रामुख्य देण्याचा प्रयत्न झालेला आहे. संस्कृतीची, साहित्याची धारणा याकालात कशी बदलली याचें वर्णन डॉ. के. ना. वाटवे यांनीं आपल्या 'संस्कृत काव्याचे पंचप्राण' यात केले आहे. तें जरा दीर्घ वाटण्यासारखें असलें तरी समर्पक आहे असें वाटतें; विदग्ध काव्यें निर्माण होण्याचेवेळी संस्कृतीची एक अवस्था संपून दुसरी कशी सुरू झाली होती ते त्यांच्याच शब्दांत देणें योग्य होईल.

"नवे शिष्टाचार, सभ्यता व संस्कृति उत्पन्न झाली. पूर्वीची निरागसता, सरळपणा, साधेपणा जाऊन त्याचे जागी व्यवहारांत चतुरता, पाटव व नागरपणा येऊं लागला. राजधर्म व प्रजाधर्म अधिक सूक्ष्म व गुंतागुंतीचे बनले. माणसाचे मनोव्यापार संयम व शिस्त यांच्या दडपणाखाली संमिश्र बनूं लागले. त्यामुळें भाषेचा सरळपणा व साधेपणा जाऊन ती ध्वनियुक्त, श्लेषप्रधान, नटवी व पांडित्यप्रचुर होऊं लागली. सामान्य वाचक व विशिष्ट अभ्यासू वाचक, आणि बहुजन समाज व राजदरबारचे वेचक रसिक, असा भेद अधिकाधिक दिसूं लागला... मोठाले व्यापार, बाजारपेठा नौकायनें सुरू होऊन संपत्ति फैलाऊं लागली..ऐषआराम क्रीडावृत्ति व सुखलोलुपता अधिकाधिक दिसून येऊं लागली. पूर्वीच्या दणकटपणाची जागा नाजुकाने घेतली. खुल्या वृत्तीच्या ऐवजी लाज, भीड आली...थोडक्यांत सांगायचें तर नागरी-जीवन अधिक प्रमाणात सुरू झालें व आंतर व बाह्य संस्कृतीला नवा रंग चढला."

**मूल्यें 'सनातन' झालीं—**

ह्या परिस्थितीचा परिणाम सर्वसाधारण समाजावर तर झालाच, पण समाजाचें पुढारीपण ज्यांचेकडे होतें त्यांचेवर पण झाल्याविना राहिला नाही. जी जीवितमूल्यें म्हणून हा वर्ग पुरस्कारीत होता, ती जीवितांत जीवितत्व म्हणजे गतिशीलता आणण्यासाठीं निर्माण झालीं. ही जाणीव पार विसरून गेली, व एकंदर मूल्यांचे आविष्करणांत स्थितिशीलता आली. ही मूल्यें 'सनातन' व न बदलणारीं—आहेत, कोणत्याहि परिस्थितींत त्यांचें आविष्करण विशिष्ट तऱ्हेनेच व्हावयास हवें, असा आग्रह सुरू झाला. गतानुगतिकेचा पुरस्कार करणारी तत्त्वज्ञानें सुरू झालीं. सारें धर्मस्वरूप स्थितिशील व गतिहीन झाले. ही स्थिति शतकानुशतकें होती. नवे विचार सुचणें कठीणच होतें. सर्व जगात अशा अवनत अवस्थेमध्ये धर्मसंस्था हजार वर्षांवर टिकली आहे. त्यायोगें तिने केलेला सुपरिणाम स्वतःच खोडून टाकला. असें झालें आहे खरें, त्यामुळें मानवाचें ठायीचें एकंदर व्यक्तिगत्त कर्तृत्व आहे तें पण अवमानित करण्याचे यत्न झाले. देव धर्म, इ. मूल्यें अंतिम, गतिहीन अशी धरली गेली. त्यांचा जीवनांत पुरस्कार निर्दयपणें व निर्बुद्धपणें झाला. ही परिस्थिति बराच काल टिकली.

जगांतल्या इतिहासांतला १६ व्या शतकापूर्वीचा एक हजार वर्षांवरचा काल हा अशाप्रकारें धर्मसंस्थेच्या अवनत स्वरूपाचा आहे. या कालांत, राज्यें, साम्राज्यें, लढाया, तत्त्वज्ञानें, इ. प्रकार झाले, पण तें एक प्रकारच्या अवनतीचे निदर्शक होत. इस्लामनें जे आक्रमण केलें, त्यायोगें एकप्रकारची प्रतिक्रिया झाली, पण तें आक्रमण भ्रमणशील संस्कृतीचें कृषिसंस्कृतीवर असल्याने राजकीय सामाजिक लुटालुटीपलीकडे सांस्कृतिक प्रगतिशीलतेचा भाग त्यांत थोडा होता.

**या कालांतलें साहित्य—**

या कालांतलें सर्व वाङ्मय हें धर्मसंस्थेच्या आधाराने व तिने पुरस्कारिलेल्या मूल्यांसाठी लिहिलें गेलें. कित्येकवेळा त्यांत मृत्यूत्तर गतीचें चित्रच दाखविलेलें असतें, व त्या आधारें सत्य, नीति, सत्प्रवृत्ति, देव...इ. मूल्यांचा पुरस्कार असतो.*

* डँटेची "डिव्हाइन कॉमेडी" व गटेचें "फाउस्ट" इ. या प्रकारची अगदी अपवादात्मक भासणारीं पण उत्कृष्ट उदाहरणें होत.

परंतु त्याचेंहि वातावरण हें धार्मिकच्च असतें. त्याचप्रमाणे प्राचीन संस्कृतिवर लक्ष खिळलेलें असणें हें दुसरें लक्षण होय. कारण स्वकालीन जीवनांत गतिशीलता नसल्यानें त्या संस्कृतीत ती जेव्हा होती तो काल आकर्षक वाटणें साहजिक आहे. प्राचीनतेवर एकप्रकारें अद्भुततेचें वलय जमा झालें असल्याने साहजिकपणेंच प्राचनिकाल आकर्षक वाटणें शक्य आहे. आपल्या मराठी साहित्यातील, वा भारतीय भाषाच्या जुन्या साहित्यात रामायण भारतांच्या कथा घेणें, हें आपल्याकडचें उदाहरण देतां येतें. वर म्हटल्याप्रमाणे श्रीकृष्णाच्याच वेळची (कृषि) संस्कृति ही मोरोपंताचे काळापर्यंत असल्याने त्या संस्कृतींतील उज्ज्वल काल, व्यक्ती, कृत्यें, ही अधिक साक्षात्कारी वाटावी हें क्रमप्राप्त आहे. ह्या कालांत एकंदर सर्व संस्कृति उतारास लागलेली होती हा विचार मनांत आला तर व्यक्तिगत कवींना अगर लेखकांना दोष देण्याचें कारण उरत नाही.

**थोडें समालोचन—**

आधुनिक युग सुरू होण्यापूर्वी साहित्य कशा प्रकारचें होतें हें पाहिलें. त्याची कांही लक्षणें दृष्टींत भरतात. धर्म ही संस्था ह्या कालांत अत्यंत प्रभावी असल्याने धर्मानें जी मूल्यें पुरस्कारिली त्यांच्याविषयी एक प्रकारचा अतीव आदर सर्वसाधारण समाजास वाटत आलेला आहे.

साहित्य विचार व उच्च विचार हे नेहमी समृद्ध व भौतिक दृष्टीने संतृप्त अवस्थेंत सुचत असतात. ही समृद्धता केवळ समाजाच्या एकाच वर्गास उपलब्ध होती. सर्वसाधारण बहुसंख्य वर्ग हा दारिद्र्यांत, अज्ञानात, दैन्यांत, काल कंठीत होता. जुनें साहित्य ज्या परिस्थितींत निर्माण झालें त्या परिस्थितीचें हें एक अत्यंत महत्त्वाचें लक्षण आहे. जुन्या काव्याचें परिशीलन करताना हे ध्यानात धरणे आवश्यक आहे.

ह्या प्रबंधांत प्रारंभी पाहिल्याप्रमाणे हा लिखित साहित्याचा काल होय. लेखन साहित्याची—म्हणजे कागद, दौत, शाई, लेखणी इ. वस्तु यांची—पैदास बरीच निर्माण होत असल्याने वाङ्मय म्हणजे लेखनबद्ध असें समीकरण जवळ जवळ रूढ झालें. विद्वान् व संपन्न लोक आपणांजवळ 'लेखक' ठेऊन उत्कृष्ट ग्रंथांच्या प्रती तयार करून ठेवीत असत, त्यांची देवघेवहि चाले, असा उल्लेख

डॉ. केतकरांनी एके ठिकाणीं दिला आहे. तरीपण ह्या लेखन साहित्याचीं पैदास हीं एकंदरीनें वेताचींच होती.

समाजव्यवस्था, संस्कृतिअवस्था हीं कशी जरीं असलीं तरी साहित्य निर्माण होण्यास आविष्काराची अदम्य इच्छा असावीं लागते. वर उल्लेखिलेल्या विद्वान् व राजाश्रयी वर्गास हीं इच्छा उत्कटत्वाने असणें संभवत नव्हतें. संस्कृति उतारावस्थेंत असल्याने नवे विचार ह्या वर्गास सुचणें शक्य नव्हतें. त्याच्या ठायींची बुद्धिमत्ता आहे ही समाजव्यवस्था अधिक बद्धमूल कशी होईल, याकडे खर्च होणें साहजिकच होतें. त्याचा परिणाम असा झाला कीं उज्ज्वल प्रकारचें साहित्य निर्माण होईनासे झाले.

साहित्याचा प्रत्यक्ष आशय पाहतांहि असें आढळून येतें कीं, राजाभोंवतीं, देवांभोंवती—हें साहित्य घोटाळतें आहे. राजचारित्राच्या आधाराने धर्मानें पुरस्कारिलेलीं धर्मप्रेम, न्यायप्रेम, देवप्रेम, इ. मूल्यें व धर्म, अर्थ, काम, मोक्ष, हे 'पुरुषार्थ' यांचें आविष्करण चालू होतें. पंडितांच्या बुद्धीला हें सारें कदाचित् कंटाळवाणें व जुनें असें वाटत असेल, आणि म्हणून त्याचा साहित्य-तंत्राबाबत अधिक आग्रह सुरू झाला. कारण साहित्याचा विषय हा असा जुना पुराणा ठरल्यानंतर त्यात नवेंपणा तंत्राशिवाय कोठला येणार ? एका दृष्टीनें आपल्या कालातील कलावाद्याचे हे पूर्वजच होत असें म्हणावयास हरकत नाही. अगदीं महाकाव्य जरी झाले तरी त्याचे ' नियम ' ठरवून टाकले गेले. त्या नियमा-पलीकडे कांही भव्य, उज्ज्वलतर आहे, याची कोणास पण जाणीव राहिली नाहीं. कृषि-संस्कृतीच्या उन्नत अवस्थेंत ज्या वर्गाने ह्या संस्कृतीचें आणि पर्यायानें जगाचें नेतृत्व केलें, तो वर्ग असा झाला होता. प्रत्येक देशाच्या परिस्थितीत ह्या वस्तुस्थितीचे पडसाद दिसून येतात.

### व्यक्तित्वाचा संकोच—

साहित्याची दुसरी प्रेरणा व्यक्ति ही आहे. कृषि संस्कृतीत—सर्वसाधारण समाजाच्या ठायीं व्यक्तित्वाचा उद्भव होणें अशक्य असतें. केवळ राजा वा तत्सम व्यक्ती यांनाच काय तें व्यक्तित्व असतें. सर्वसाधारण व्यक्तीस राजाच्या वा तत्सम व्यक्तीच्या व्यक्तित्वाच्या आविष्करणांतच आपल्या व्यक्तित्वाचें आविष्करण झालें असें

वाटतें. कारण शेवटी पुरस्कार होतो तो धार्मिक मूल्यांचाच व तीं मूल्यें साध्या व्यक्तींसहि प्राणापलीकडे प्रिय वाटत असल्याने, त्यांवर भर दिला जातो, व मग व्यक्तित्वाची अडचण भासत नाहीं.

एकंदर समाजाच्या धारणेंत व्यक्तिगत यत्नास फारसें महत्त्व शिल्लक न उरल्याने व्यक्तीच्या कर्तृत्वाचा अपकर्ष व्हावा हें क्रमप्राप्त होतें. साहित्यास आवश्यक असणारें प्रभावी व्यक्तित्व ह्या कालात विरलतत्त्वानेच निर्माण होणें शक्य आहे, व त्यायोगें या कालांतील साहित्यात व्यक्तिगत आकांक्षा, इच्छा, यांचें प्रतिबिंब अप्रत्यक्षपणें पडलेलें आहे. व एका दृष्टीने धर्म, नीति, देव या मूल्या-खालीं कवीचें व्यक्तित्व चेंगरलें गेलें आहे असें आढळतें.

परंतु शांततामय जीवनाच्या योगाने अशा बुद्धिजीवि वर्गाच्या बुद्धि व्यापा-रास वाव न राहिल्याने साहजिकपणें त्याची प्रज्ञा चित्रकाव्य, यमक, प्रास, अलं-कारपूर्ण काव्य,...इ. बौद्धिक 'अटापटी' करण्यात का खर्च झाली याचा पण उलगडा होतो.

### साहित्य हें जीवनोपांगः--

मध्ययुगाच्या शेवटापर्यंत जें साहित्य निर्माण झालें त्याचें स्वरूप व पार्श्वभूमि ही अशाप्रकारची आहे. त्यायोगें साहित्यांत धर्मप्रवणता का शिरली, व साहित्यांत व्यक्तित्त्वाचा उदय का झाला नाहीं, हें समजून येण्यास मदत होईल. साहित्य हें ह्या वेळेपर्यंत जीवनाचें एक उपांग म्हणून लिहिलें गेलें. म्हणजे उन्नत-वा तत्कालिक कल्पनेप्रमाणें शाश्वत—जीवित-मूल्याचें आविष्करण म्हणून तें लिहिलें गेलें. धर्म व तत्सदृश जीवितमूल्यें हीं मानवी जीवितांत फार महत्त्वाची गणली गेल्याने **जीवनासच** एक प्रकारचें दुय्यमत्व प्राप्त झालें. हें सर्व साहित्य त्या त्या देशाच्या सुसंस्कृत वर्गाने निर्माण केलें. त्याचा प्रसारहि प्रामुख्याने त्या वर्गापुरताच मर्यादित राहिला. काव्यमयता वा गेयता यांच्या योगाने, व पुराणें, प्रवचनें, कीर्तनें इ. याच्याद्वारें त्यांच्यांतला काय थोडासा भाग सर्वसाधारण समाजासमोर जाईल तेवढाच.

### साहित्याचा विषय–'नीति'—

ह्या कालांत ग्रंथांचें कागदावर संस्करण वा लेखन होत असे. व साहित्य–

प्रेमी लोक कवीचें वा लेखकाचें काव्य वा पुस्तक स्वतःच्या उपयोगासाठी उतरूनहि ठेवीत. पण एकंदरीने लेखनाच्या साह्याने साहित्याचा प्रसार फार अल्प. त्याच प्रमाणे साहित्यांत कलात्मकता असावी असें वाटलें तरी त्या कलात्मकतेला अलंकारांचें स्वरूप दिलें गेलें असल्याने, त्यांच्या अनुषंगानें जो काय कला-प्रकर्ष साधेल तेवढाच. परंतु तरीहि बरेंच वाङ्मय लोकांच्या तोंडी होतें, व तेंच आज ' लोक वाङ्मय ' म्हणून पुढें येत आहे. त्यावरून सुद्धा कलात्मकतेपेक्षा एकंदर साहित्याचा रोख हा जीवनाच्या उन्नत मूल्यावरच आहे असें दिसून येतें. कलात्मकता वा अभिरुचि ही अद्याप बरीच विकसित व्हावयाची होती असें वाटतें. थोडक्यांत यावेळेपर्यंत साहित्याचा विषय व्यक्ति नसून 'नीति' होता असें म्हणावयास हरकत नाही.

तथापि ह्या सर्व साहित्यास आणखी एक व अत्यंत महत्त्वाचें अंग आहे. व त्या अंगाचें दर्शन घेतल्याविना ह्या मुद्रणपूर्व साहित्याचें विवेचन पुरें होऊं शकत नाही. परिस्थिति आणि मनुष्य यामध्ये एकमेकांवर मात करण्याचे दृष्टीने नेहमीच झगडा चाललेला दिसून येतो. कधी मानवी प्रज्ञा व कर्तृत्व विजय मिळविते तर कधी परिस्थिति मात करते. सूक्ष्मतेनें पाहू लागलें तर परिस्थिति हीहि मानवी किमयाच आहे. परिस्थिति कितीही प्रतिकूल असली तरी कोणत्या तरी मानवांनी केव्हा तरी ती निर्माण केली आहे. ही गोष्ट मानवी इतिहासाचा वा सांस्कृतिक इतिहासाचा विचार करताना विसरून चालत नाही. ज्यावेळीं परिस्थिति ही मानवी संस्कारविरहित असते त्यावेळीं तिला आपण 'निसर्ग' म्हणतों. त्या निसर्गाचा विचार येथे आपणास आवश्यक नाही. परिस्थिती कितीहि विरोधी असली तरी तीतून मार्ग काढण्याचें काम तो बदलण्याचें कार्य माणसेच करूं शकतात. निसर्गाचे मानवेतर प्रतिनिधि मार्ग काढूं शकत नाहीत.

### पुनर्मूल्यीकरणाचा प्रयत्न--

कृषिसंस्कृतीच्या उतरत्या कालांत मनास एकप्रकारची ग्लानी आलेली होती. इत्यादि विवेचन वर आलेंच आहे. ह्या ग्लानीतून मानवी समाजाला बाहेर काढण्याचें कार्य काहीं बुद्धिमंतांनी सुरू केलें होतें. या बुद्धिमंताना एकंदर परिस्थिति फार खालावलेली आहे हें कळलें, आणि तींतून बाहेर पडण्यासाठी

कांहीं नवीन दृष्टींने विचार करावयास हवा याची जाणीव झाली. धर्म, परमेश्वर सत्य, नीति...इ. मूल्यें जीं निर्माण झालेलीं होती त्यांच्यावरचा त्यांचा विश्वास अढळ होता. त्याच्या विरुद्ध जाण्याची त्याचीं बिलकुल तयारी नव्हती. खरें म्हटलें तर हा कांहीं त्यांचा दोष नव्हे. कारण तीं मूल्यें ज्या समाज व्यवस्थेंतून निर्माण झाली तिची धारणा बदलल्याशिवाय त्या मूल्यावरचा विश्वास विचलित होणें शक्य नव्हतें. [ ती अवस्था अद्याप दूर होती. ती कशी प्राप्त झाली याचें विवेचन पुढे येईलच. ] आणि असा काही मूलभूत बदल होणें शक्य आहे हें त्याना कळणें पण कठिण होतें. तथापि मानवी प्रज्ञेचा प्रयत्नवाद ही काही अजब चीज आहे. आणि हें येथे पाहावयास सापडतें. हे विचारवंत श्रेष्ठ खरेच. आणि सर्व साधारण समाजास जी मूल्ये श्रेष्ठ वाटत होती त्याचेंच त्यांनीं पुरस्करण केलें. पण पुरस्करणाची दृष्टि बदलली. त्या मूल्यांचें त्यानी पुनर्मापन (रीव्हॅल्युएशन) सुरू केलें. व तें अत्यंत महत्त्वाचें होते. उद्योग-संस्कृतीत पुढे जीं क्रांतिकारक परिस्थिति निर्माण झाली तिला तोंड देण्यासाटी माणसाना मनाने तयार करण्याचें फार मोठें काम ह्या विचारवंतानी केलें आहे.

धर्मसंस्थेने पुरस्कारलेली अध्यात्मिक मूल्येंच ह्या लोकांनी हाती धरली, परंतु त्यांना जिवंत वाटेल असें सामाजिक स्वरूप देण्याचा प्रयत्न केला—त्या मूल्या-मागली स्थितीशीलता घालवून त्यांना गतिशीलता आणण्याचा तो प्रयत्न होता व तेंच अत्यंत आवश्यक होतें. कारण कृषिसंस्कृतीतल्या दोन समाजवर्गात विलक्षण अंतर निर्माण झालें होते. तथापि दोन्ही वर्गावर धर्मप्रणित मूल्याचा सारखाच परिणाम झाला होता, व दोहोंसही ती पूज्य वाटत होती. त्या दृष्टीने ह्या वर्गाचें वैशिष्ट्य हे की, रूढ समाजव्यवस्थेत क्रांतिकारक फरक होतील असें काहींहि न करता धर्मसंस्थेनें पुरस्कारिलेल्या मूल्याबद्दल आशंका न घेतां, केवळ त्या मूल्याना अध्यात्मिक वा विशिष्ट वर्गीय असें जे महत्त्व होते तें घालविण्याचा प्रयत्न करणें हें होय.

यूरपमधील धर्म-सुधारणेची चळवळ व आपल्याकडील भक्ति-पंथाची चळ-वळ हीं दोन उदाहरणें या बाबतचें वरील विवेचन स्पष्ट करतील. यूरपमधले 'धर्म सुधारक' हे कोणत्याहि अर्थाने धर्म विरोधक नव्हते. पोपच्या नियमाविरुद्ध

त्यांनी जरी चळवळ केली तरी त्यांना धर्म मान्य नव्हता, असें तर बिलकूल नव्हे. उलट बायबलच्या अंतिमतेवर त्यांचा कोणत्याही पोपइतकाच विश्वास होता. ह्यांचें म्हणणें येवढेंच की, परमेश्वराराधाना ही कोणत्याहि मध्यस्थाविना कोणालाही करता यावी. ही सुधारणा करणारे कांही सर्व साधारण समाजामधले लोक होते त्याप्रमाणे कांही पोपाहि होते.

## भागवत-धर्माची साक्ष—

आपल्याकडील भक्तिपंथाचे बाबतींत तेंच म्हणतां येईल. भक्तिपंथी लोकाना अद्वैत मान्य होतें, चातुर्वर्ण्य मान्य होतें, जातिभेदहि मान्य होता. मग त्यांचें म्हणणें काय, तर ईश्वरपूजेचा हक्क हा कोणाहि एका वर्गाचा, जातीचा नाही. तो सर्व साधारण व्यक्तीलाहि आहे. आज आपण सामाजिक समतेच्या युगांत आहोंत. ही पुढची पायरी आहे. तत्पूर्वी अध्यात्मिक समता निर्माण होणें आवश्यक होते. ती एक अनिवार्य अवस्था होय. आपणास आज समतादि विचार जितके जिवंत व जिव्हाळ्याचे वाटतात तितके किंबहुना त्याहूनहि अधिक जिवंत व जिव्हाळ्याचे असे हे विचार आहेत. असें तत्कालिनाना वाटत आलें आहे. असे नसतें तर ज्ञानेश्वरांनंतर अठरापगड जातींतून जे निरनिराळे 'संत' ह्या 'अध्यात्मिक समते'चा पुरस्कार करण्यास व तो 'हक्क' शाबीत करण्यास पुढे आले ते आले नसते. आणि अद्यापहि तुकारामासारख्या शूद्र कवीला जी अतिरिक्त लोकप्रियता लाभते आहे ती लाभली नसती. आपल्याकडे ही पुनर्मापनाची क्रिया लवकर सुरु झाली. यूरपमध्ये त्यामानाने ती उशीरा सुरु झाली. व म्हणूनच मागे एका ठिकाणी आपल्याकडे मध्ययुगें इतकीं अंधारी नव्हतीं असें म्हटलें आहे. तथापि यूरपने उद्योग संस्कृतींत लवकर प्रवेश केला. व त्यामुळे तेथे ही सामाजिक क्रांति, व उद्योग संस्कृतीला अभिप्रेत असणारी औद्योगिक क्रांति या फार थोड्या अंतराने सुरु झाल्या. साहित्य त्यायोगें कसें बदललें तें विवेचन पुढें येईलच.

मानवी मनाची उदात्ततेसाठी धडपड म्हणून या पुनर्मूल्यमापनाला अतीव महत्त्व ओह. अवनत अवस्थेंत त्याने अधिकाधिक जिवंतपणा आणलेला आहे. धर्म-विचारांच्या व परमार्थ विचारांच्या आहारीं सर्व सामान्य जनता ही इतकी

गेली होती की, ह्या जविनांत आपणांस कांही कर्तव्यें आहेत, व ह्या जीवनास भौतिक दृष्टीने कांही अर्थ आहे, ह्या गोष्टीचा विसर पडला होता. पुढे येणाऱ्या उद्योगसंस्कृतींत भौतिक विचार पूर्णतया वाढीला लागले. पण ते फारच वेगळ्या कारणाने. तत्पूर्वीच्या अवस्थेंत परमार्थ विचारावरून मानवी जविनांवर लक्ष केंद्रित झालें पाहिजे, हा विचार ह्या 'समाज सुधारक' संतांनी मांडला. कृषिसंस्कृतींत माणसाने परमेश्वर निर्माण केला व माणसें त्या परमेश्वराच्या आहारी जाऊं लागलीं; ऐहिक कर्तव्याकडे, समाज परिस्थितीकडे त्याचें दुर्लक्ष झालें, तें तिकडे ओढण्याचा प्रयत्न स्वतःच्या चारित्र्याने व वाङ्मयाने ह्या कृषिसंस्कृतींतील सुधारकांनी केला आहे. त्या कालच्या साहित्याचें हें एक उज्ज्वलतर कार्य होय.

## कांहीं साहित्य–संकेताची पार्श्वभूमि—

केवळ साहित्य स्वरूपाचे दृष्टीने या साहित्याचे काही विशेष दृष्टींत भरतात. एक म्हणजे त्याची अम्दुतरम्यता. ही अम्दुतरम्यता मानवी जीवनाच्या भौतिक अपूर्णतेमुळे निर्माण झालेली असणें शक्य आहे. रसचर्चेत सुद्धां अम्दुत हा एक 'रस' (स्थायीभाव) गणला गेला आहे, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. मनुष्याच्या सर्वच भावना जागृत झाल्या नसल्याने जेव्हा एखादी गोष्ट अतीव भडकपणाने मांडावी तेव्हाच तिच्यांतलें खरें वैशिष्ट्य प्रतीत व्हावें अशी माणसाची मनोरचना होती. आज आपण अम्दुततेचा—वास्तवतेची विरोधी अवस्था—म्हणून उल्लेख करतों. आणि आपलीं पुष्कळशी साहित्यमूल्यें हीं वास्तवतेतून अवतीर्ण झालेली आहेत. ह्या वास्तवतेची कल्पना हा उद्योग संस्कृतीचा एक परिपाक आहे, हें मागील विभागांत पाहिले. ह्या वास्तवतेपर्यंत मजल गाठलेली नसलेल्या काळांत अम्दुतरम्यता हाच साहित्याचा पाया गणला गेला तर नवल नाही जुनें सारें साहित्य अम्दुताधिष्ठित आहे. तर नवें वास्तवाधिष्ठित आहे. रसव्यवस्था ही अद्भुताधिष्ठित साहित्यशास्त्रांत निर्माण झालेली आहे नि तसेंच अलंकार. अम्दुताचें आज आविष्करण भव्यत्व वा दिव्यत्व या स्वरूपांतच आपण स्वीकारूं.—साहित्य स्वरूपाच्या दृष्टीने हा विचार लक्षांत घेण्यासारखा आहे.— आपल्या कल्पनेप्रमाणे रम्यत्व हें वास्तवतेंत आहे; उलट

जुन्या साहित्यविचारांचा कौल घेतला तर त्यांचें रम्यत्व हें अद्भुततेंत आहे असें प्रतीत होईल. संस्कृतसाहित्यचर्चेत जी जीं म्हणून साहित्य–मूल्यें–रसालंकारादि–प्रमाण मानलीं आहेत त्यांचा पाया प्रायः अद्भुत आहे, असें आढळून येईल. ज्या ठिकाणीं स्वाभाविकता आहे अशा ठिकाणीं त्यांना काव्य वा रम्यत्व आहे अशी अगदींच पुसट कल्पना आली नि म्हणून अशा आविष्कारासाठी 'स्वभावोक्ति' सारखा एक साधा 'अलंकार' तेवढा मुक्रर केलेला आहे.

### नव्या युगाकडे ––

पंधराव्या शतकाच्या शेवटच्या अर्धांगांत परिस्थितींत झपाट्याने फरक पडून जीवनांत गतिशीलता येत चालली आहे असें निदर्शनास येऊं लागलें. ही क्रिया प्रथम यूरपमध्ये सुरू झाली व तेथून ती जगांत पसरली. आणखीहि अशा कांही घटना घडून आल्या–वा घडूं लागल्या–की, मानव-समाजाच्या धार्मिक समजुतींत, धर्म विषयक व धर्मसुधारणा विषयक विचारांस जबरदस्त धक्का बसला, बसत चालला. धर्म संस्थेनें जीं जीवितमूल्यें समाजाचे ठायीं रुजविण्याचा प्रयत्न केला तीं खरोखरच 'सत्य' व सदैव अवलंबनीय आहेत की काय अशी शंका माणसांच्या मनांत येऊं लागली, व थोडक्यांत सांगायचें तर नव्या व आधुनिक युगाचा जन्म झाला

## : ३ :

### जीवनांत गतिशीलता येत चालली—

लोकांच्या मनोवृत्तीत व जीवित विषयक तत्त्वज्ञानांत जो फरक घडून येत होता तो हलके हलके जरी घडून येत होता तरी, अशा कांही घटना घडल्या की, त्यायोगें ही जी मनोक्रांति होत होती तिला वेगळेंच वळण मिळालें, तिचा वेग एकदम वाढला व इतिहासाचा ओघ बदलला. मनोवृत्तीत फरक होण्याचें कारण बाह्य भौतिक जगाविषयींच्या ज्ञानाच्या कक्षा रुंदावत होत्या हें होय. त्यायोगें मानसिक खळबळ पण जोराजोराने सुरू झाली. परंतु ही जी खळबळ होती हिची बीजें मध्ययुगाच्या शेवटल्या अवस्थेंत प्रत्येक देशाच्या इतिहासात कशी जात होती हें मागे पाहिलें. परंतु कांही क्रांतिकारक भौतिक घटनांचे योगाने एकंदर गतिमानता वाढली हें खरें. यांपैकी तीन घटना महत्त्वाच्या आहेत.

### तीन घटना—

तसें म्हटलें तर या घटना परस्परांशी संबद्ध आहेत असें मुळीच नाही, व त्यांचें एकमेकांशी कोणतेंहि जवळचें नातें नाही. तरीहि त्यांनी मनोवृत्ति बदलावयास लावली हें मान्य करावें लागतें. ह्यापैकी पहिली घटना म्हणजे कोपरनिकस या पोलंडदेशीय विद्वानाने पृथ्वी फिरते आहे असें मत प्रसृत केलें, दुसरी कोलंबसाने अमेरिकेच्या अस्तित्वाचा निश्चित शोध लावला, व तिसरी तुर्क लोकांनी कॉन्स्टॅंटिनोपल् हें शहर घेतलें ही होय. कालाचे दृष्टीनेहि या घटना मागे पुढे आहेत. पण विचारक्रांतीच्या दृष्टीने त्यांचा एकत्र उल्लेख करणें आवश्यक आहे.

### आणखी क्रांतिकारक शोध—

यांपैकी पहिल्या दोन फार महत्त्वाच्या आहेत. त्यानी जगाविषयीं नवें ज्ञान

दिलें. त्यायोगें धर्मग्रंथांतील पृथ्वीच्या उत्पत्तीबद्दल व स्वरूपाबद्दल शंका आली, येऊं लागली, व यांतून अर्वाचीन चिकित्सक बुद्धीचा व अनुषंगाने शास्त्रीय बुद्धिशीलतेचा उदय झाला. धर्मसंस्थेच्या 'सर्वज्ञते'च्या दाव्यास एक भला मोठा धक्का बसला. कोलंबसाच्या शोधाने जगाची व्याप्ति भरपूर आहे अशी प्रतीति आली, व त्याचा परिणाम अत्यंत वेगळ्या स्वरूपात झाला. साहस वृत्तीस आवाहन मिळालें आणि नवीन कर्तृत्वाचा जन्म झाला. तिसऱ्या घटनेने पूर्वेकडील देशाचा खुष्कीचा मार्ग बंद झाला व्यापारासाठी समुद्रमार्गाचें आकर्षण वाढून आफ्रिकेचें अस्तित्व कळलें. विचारांचे दृष्टीने व सांस्कृतिक दृष्टीने आणखी एक फरक झाला. कॉन्स्टॅंटिनोपल् हें शहर रोम व ग्रीस संस्कृतींनी पुरस्कारलेल्या ज्ञानाचें माहेरघर होतें. तेथे पुष्कळ विद्वान असणें साहजिक होतें. तुर्कांच्या हल्ल्यामुळे ते निराश्रित झाले. व त्यानी यूरपमधील निरनिराळ्या देशांत जाऊन वास्तव्य केलें. तेथे त्यांनी आपल्या ज्ञानाचा प्रसार केला व त्यामुळे पुढे "विद्येचें पुनरुज्जीवन" ही चळवळ झाली, हें प्रसिद्ध आहे. तिचे पडसाद साहित्यांत पण उमटल्याविना राहिले नाहींत. आणखीहि महत्त्वाचे शोध या सुमारास लागले. त्यांत प्रामुख्याने बंदुकीची दारू, खलाशांना उपयोगी पडणारें होकायंत्र, दुर्बिणीच्या कांचेचें रहस्य, इत्यादि शोधांचा समावेश करावा लागेल, ह्या शोधांनी मनुष्याच्या ज्ञानलालसेला नवीनवी दालनें मुक्त केली. आपल्या ह्या ठिकाणच्या विवेचनाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा शोध म्हणजे कागदाची मोठ्या प्रमाणावर पैदास व मुद्रणकला हे होत. या सर्वांचा मानवी मनावर जो परिणाम झाला, त्यांतून आपल्या संस्कृतीचा व आपल्या कालाच्या साहित्याचा व त्याच्या निष्ठाचा जन्म झाला आहे.

## मुद्रित-साहित्यास सुरवात --

हा जो नवा कालखंड सुरू झाला त्यालाच या ठिकाणीं "मुद्रित--साहित्याचा काल" असें म्हणणें योग्य होईल. कारण सामाजिक क्रांति, बरोबर--जी मानसिक क्रांति होत होती, तिचें क्षेत्र अधिकाधिक वाढविण्याचें काम मुद्रणकलेने केलें आहे. आधुनिक कालांत मुद्रणाचा शोध गटेनबर्गने जर्मनींत इ. स. १४४२ मध्ये लावला, ह्या नंतर ती कला इंग्लंडादि यूरपमधील देशांत पसरली. इंग्लंडमध्ये कॅक्स्टनने त्याच सुमारास आपला छापखाना घातला. मुद्रित

मजकूर बाहेर मुबलक—सुबक रीतीने पडूं लागला. पुस्तकाची व्याप्ति प्रसार वाढला आणि त्यायोगें ज्ञानाच्या क्षेत्रांत विलक्षणच क्रांति झाली. परंतु मुद्रणाने होऊं घातलेल्या क्रांतीचे व सामाजिक क्रांतीचे परस्परावलंबी व परस्परपोषक संबंध आहेत हें विसरून चालणार नाही. कारण हेच वा असले शोध हजार दीड हजार वर्षांपूर्वी ग्रीस, कोरिया, जपान, चीन, इ. देशांत लागलेले आहेत. परंतु त्यांनी त्यावेळीं व्यापक स्वरूपाची क्रांति घडवून आणली असा पुरावा नाही. या वेळीं ते एका काल विभागात व त्याच वेळीं एका भूविभागांत लागले, आणि या वस्तुस्थितीत त्यांच्या क्रांतिकारकतेचें रहस्य आहे.

**ज्ञानाची कक्षा सामान्य व्यक्तिप्रत आली—**

पुस्तकें छापणें शक्य झाल्याने सर्वसाधारण व्यक्तीस ज्ञान देणे शक्य कोटींतलें व सुलभ झालें. शिक्षणाचें स्वरूप पार बदललें. त्या क्षेत्रावरील पण धर्माची सत्ता धुळीस मिळाली. व नव्या नव्या शोधांचें ज्ञान एका वर्गाच्या सेवेसाठीं कुलपाच्या आड न राहतां सर्वसाधारण व्यक्तीपर्यंत त्याचें लोण पोंचण्याची शक्यता निर्माण झाली. त्याशिवाय मुद्रणकलेच्या योगाने गद्यास विलक्षण महत्त्व आलें. त्यामुळें रोजच्या बोलण्याच्या भाषेत व गद्यांत ज्ञान घेतां आल्यानें ज्ञानाच क्षितिज पण अधिकाधिक रुंदावत गेलें व मोठमोठे लेखक, इतिहासकार, निबंधकार,...इ. चें गद्य प्रधान लेखन होऊं लागलें, साहित्य म्हणजे काव्य हें समीकरण नष्ट होऊन व्यापक कल्पनांचें बीज पेरलें गेलें.

**मानव्याला आलेली दुसरी जाग—**

कृषि अवस्था सुरू केल्यावर वा करण्यापूर्वी असे महत्त्वाचे असे शोध लागले होते, हें मागे पाहिलेंच आहे. ते वस्तुतः पूर्णपणें भौतिक होते, पण त्यांनी मानवाला उपलब्ध करून दिलेल्या सामर्थ्याची जेव्हा मानवाला कल्पना आली तेव्हा आत्मविश्वासाचें एक नवेंच वारें कसें निर्माण झालें, त्याचा पण उल्लेख यापूर्वी आलाच आहे. आतांच उल्लेखिलेल्या शोधांचाही परिणामही असाच झालेला आहे. मानवी कर्तृत्वाच्या कक्षा या शोधांनी किती रुंदावल्या आहेत याची जेव्हा माणसांना कल्पना आली, नव्या शोधांनी किती सामर्थ्य हातीं दिलेलें आहे हें जेव्हा प्रत्ययास आलें, तेव्हा माण-

साच्या डोक्यांत पुन्हा नवें वारें शिरलें. व जगाच्या इतिहासांतलें दुसरें असें सृजनशीलतेचें युग सुरू झालें. कृषि-संस्कृतीच्या प्रारंभकाली कांहीं माणसांस भूतकाल विशेष उज्ज्वल आहे याचें ज्ञान नसावें. तथापि यावेळी जी जागृति आली तिच्यातलें एक वैशिष्ट्य असें कीं, माणसें भूतकालावर, तत्कालीन संस्कृतीवर प्रेम करूं लागलीं. व नव्या सामर्थ्यानें आपण भूतकालीन श्रेष्ठ (?) संस्कृति परत निर्माण करूं अशीं स्वप्नें पाहू लागली. नि या नव्या चळवळीला नि जाणिवेला 'सांस्कृतिक पुनरुज्जीवन' असें म्हटलें जातें. वास्तविक तो नव्या संस्कृतीचा प्रारंभ होता. व ही नवी संस्कृति म्हणजे 'उद्योग संस्कृति' होय. आणि हें जें उज्जीवन होतें हें नव्या सामर्थ्यांच्या जाणिवांनी आलेलें होतें.

ज्या ज्या वेळी नवी संस्कृति जुन्या संस्कृतीवर आक्रमण करते त्या त्या प्रत्येक वेळीं ती समाजांत वा विशिष्ट समाजवर्गांत एक वेगळेंच असें चैतन्य निर्माण करते, कीं ज्याचें वर्णन आपण वा तो समाजवर्ग—' उज्जीवन ' असें करतो. स्वतःच्या इतिहासाचा तीव्र अभिमान निर्माण होतो, आणि तो इतिहासकाल परत नव्या सामर्थ्यांनी आपण निर्माण करावा अशीं स्वप्नें त्यांतील कांहींना पडूं लागतात.

साहजिकपणें प्रत्येक समाजगटास आपला नजीकचा भूतकाल हा अत्यंत अज्ञानाचा, अंधकाराचा गेला असें वाटूं लागतें. आणि मग त्याविरुद्ध जोराची प्रतिक्रिया सुरू होते. मानवीं प्रज्ञेंतली सुप्त कर्तृत्वशक्ति व प्रतिभा जागृत होते. आणि सृजनशीलतेचें नवें युग आस्तित्वांत येतें. प्रत्येक देशाच्या इतिहासांत हाच प्रकार घडतो, घडलेला आहे. साहित्य दृष्टीने हा पुनरुज्जीवनाच्या जाणिवेचा काल अत्यंत सृजनशील असतो. इंग्लंडमधला शेक्सपीअर व त्याच्या वेळचे इतर जॉन्सन, स्पेन्सर... नाटककार कवि याच वेळचे. याच काळांत विपुल अशी भावगीतात्मक कविता लिहिली गेली. व त्या कालांतील साहित्यांत एक प्रकारचा पुनरुज्जीवनाचा सूर, एकप्रकारची व्यापक सहानुभूति यांचे संमिश्र पडसाद आढळून येतात. आपल्याकडे हीं पुनरुज्जीवनाची कल्पना प्रथम पूर्णपणें निबंधमालाकारांनी स्वीकारली व त्या विचारसरणीचा परिणाम तत्कालीन विचारवंतांवर व कलावंतांवर एवढा

जबरदस्त झालेला आहे कीं, अद्यापहि आपण पुनरुज्जीवनाच्या काल्पनिक ध्येय-वादांतून पूर्णपणें बाहेर पडलों असें वाटत नाही. निबंधमालेच्याकाळी आपल्या आधुनिक मराठी वाङ्मयाची पण सृजनशीलता वाढली हें केशवसुत, कोल्हटकर आपटे, किर्लोस्कर, देवल...इ. च्या उदाहरणांवरून स्पष्ट होतें. शेक्स्पीअर-मिल्टन पूर्वीचें बरेंच इंग्रजी वाङ्मय भाषांतरित आहे. आपल्या पण आधुनिक वाङ्मयांत चिपळूणकरांपूर्वीच्या कालास भाषांतर युग असें साभिप्रायतेनें म्हटलें जातें. ती साहित्य–दृष्ट्या एक अपरिहार्य अवस्था होय. भारतीय दृष्टीने महत्त्वाची अशी संघटना राष्ट्रीय सभाही ह्याच उज्जीवनकालीं स्थापन झालेली आहे, व येथूनच आधुनिक कर्तृत्वाचा नवा इतिहास सुरू होतो.

**यूरप अग्रभागीं—**

तथापि वर उल्लेखिलेले सर्व 'शोध' प्रथम यूरपमध्ये लागले. ते तेथेच कां लागले, ह्याचें कारण देतां येण्यासारखें असलें तरी येथे तें विवेचन जरूर नाही. यूरपमध्ये लागले, ही वस्तुस्थिति तेवढी विचारांत घेणें आवश्यक आहे. त्या योगेंच आतां पावेतो तरी आधुनिक कालांत यूरप अग्रभागी राहिला आहे.

**साहित्य जीवनाबरोबर वाढूं लागलें (भौतिक झालें)--**

साहित्याचे दृष्टीने या घटनांना इतकें महत्त्व आहे कीं, या शोधांनी साहित्याचें आंतर्बाह्य स्वरूप बदललें. जीवन अधिक गतिमान झालें, व जीवना-बरोबर साहित्य पण बदलूं वाढूं लागलें. यापूर्वीचें साहित्य हें जवळ जवळ काल-निरपेक्ष असे. यापुढे कालसापेक्षता, आणि साक्षेपता वाढला. लेखकांचा जीवित-विषयक नि साहित्य विषयक दृष्टिकोण बदलला, वाचकांचा पण बदलला. आणि वाचक व लेखक यांत एका दृष्टीने प्रत्यक्ष व्यवहार सुरू झाला. दोघांच्या मधलें अंतर त्या दृष्टीने कमी झालें, कलात्मक दृष्टीचें बीजारोपण झालें. सामाजिक घटनांना, विचारांना अधिक गति आणण्याचा साहित्याने प्रयत्न केला व एका नव्या नि आधुनिक संस्कृतीस साकारता आली.

**नवीं क्षितिजें--**

या संस्कृतीला उद्योग-संस्कृति म्हटलें जातें. तिने प्रारंभीं वेगाने प्रगति घडवून आणली. क्रांतिकारक शोध लागत होते. नव्या नव्या घटना घडत होत्या...

संस्था निर्माण होत होत्या, सुखसोयी उपलब्ध होत होत्या. जीवनाविषयींची आस्था वाढीस लागली. मनुष्याचें एकंदर निसर्गप्रभुत्व पण दृष्टींत भरेल इतकें वाढलें. धर्म (कृषि) संस्कृतीने कर्तृत्वशून्यतेचें परिपालन केलें होतें, त्यामुळे या नव्या प्रभुत्वाच्या जाणिवेच्या प्रतिक्रिया होऊन असा परिणाम झाला की, एक वेगळाच व्यक्तिवाद जन्मास आला. शास्त्राची अविरत प्रगति होत गेल्याने बुद्धिवादाविषयीं आस्था निर्माण होऊन कर्तृत्वाचीं नवीं नवीं क्षितिजें निर्माण झाली.

**मध्यम वर्गाचा उदय—**

हीं जीं नवीं क्षितीजें निर्माण होत होती, त्यामुळे त्या क्षेत्रांत नवें नवें कर्तृत्व जन्मास येत होतें. समाजाचा जो वर्ग ह्या बाबतींत पुढे आला त्यास मध्यम-वर्ग असें म्हटलें जातें. आतापर्यंत जे समाजांत दोनच वर्ग होते त्याच्यांत हा तिसरा ( मधला ) वर्ग होऊं घातला. त्या वर्गाला स्वतःच्या कर्तृत्वाची जाणीव व वाव असल्याने त्याच्या ठायीं एक नवें व्यक्तित्व उदयास आलें. एका बाजूने त्याचा धर्मसंस्थेशी लढा सुरू झाला. व त्याचा परिणाम असा झाला की, या वेळपावेतों जें धर्म व राज्य ह्यांचें अविभाज्यत्व होतें तें भंग पावलें. राज्य-संस्था स्वतंत्रतया पुढे येऊं लागली. धर्मसंस्थेंत शिथिलपणा आला होता, ती केव्हाच इतिहासजमा झाली होती. राज्यसंस्था मात्र समाजजीवनाबरोबर अधिक विकसत गेली, बलाढ्य होत गेली, तिचें सर्वंकषत्व वर्धमान होत गेलें.

सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीने या मध्यमवर्गास महत्त्व आहे. बौद्धिक क्षेत्रांत हाच वर्ग पुढे आला. म्हणजे भौतिक-विज्ञान-शास्त्रज्ञ, तसेच समाज–शास्त्रज्ञ, कलावंत, हे या वर्गांतून पुढे आले. नवे नवे देश याच्या कर्तृत्वकक्षेत येत होतें. त्यांची संपत्ति एकत्रित होत होती. उत्पादन वाढत होतें. धर्मसंस्थेचें अपूरेपण ह्या वर्गास कळून आलें. व त्यामुळे धर्मांने पुरस्कारलेलीं मूल्यें कोठे पाळा-यचीं, व कोठे पाळावयाची नाहीत, ह्याच्या कक्षा पण ह्या वर्गाने स्वतःच्या फायद्याचे दृष्टीने आखून घेतल्या होत्या, कांही वेळां लोकांच्या मनांत धार्मिक गोष्टींविषयीं जें आकर्षण आहे त्याचा उपयोग आपल्या फायद्यासाठी करून घेण्याचा प्रयत्नहि या वर्गाकडून झाला आहे.

समाजाचा कनिष्ठ वर्ग होता त्याचें नष्टचर्य संपण्याची शक्यता नव्हतीच. नवीन शोधांनी जें सामर्थ्य मनुष्यांसाठी उत्पन्न झालें तें त्यांच्या सुखसोयीसाठी उपयोगांत येणें शक्य नव्हतें. शेतावरचें राबणें जाऊन कारखान्यांत कष्ट उपसणें नशीबीं आलें... कोणत्याही प्रकारची प्रगति, किंवा सांस्कृतिक विकास ही या वर्गाच्या सर्वस्वी कक्षेपलीकडचीं होतीं. शेतीवर कष्ट करून पण कसेबसें पोट भरणारा मनुष्य अर्धपोटीं, व उपाशीं राहूं लागला. ह्या विषमतेकडे मध्यमवर्गांतिल एका बुद्धिशील गटाचें लक्ष जाऊं लागलें.

## ही मध्यमवर्गीय संस्कृति—

सांस्कृतिक दृष्टीने मध्यमवर्गास महत्त्व येणें वरील परिस्थितीच्या योगें अपरिहार्य होतें. धर्मसंस्थेने निर्माण केलेली मूल्यें या वर्गावर परिणाम करीत होतीं, परंतु त्याबरोबरच नव्या व्यवस्थेंत दारिद्र्य, विषमता वाढीस लागली हें पण त्याला दिसत होतें, या दोहोंचा समन्वय करण्याचा या वर्गाने प्रयत्न केला. त्यांतून नवी मूल्यें निर्माण कशी होत होतीं, त्यांचा उल्लेख पुढे येईलच. वैज्ञानिक शास्त्रांची उपासना करण्यात या वर्गाचें बुद्धिबल खर्ची पडूं लागलें. व राज्य-संस्थेला महत्त्व आणण्यांत कर्तृत्व कामीं लागलें. या योगें जी संस्कृती निर्माण होत होती तिच्यावर सर्व दृष्टीने ह्या वर्गाचा ठसा होता, म्हणूनच तिला मध्यम-वर्गीय संस्कृति असें म्हटलें जातें. साहित्यांत पण मध्यमवर्गीय आशा आकांक्षा व मूल्यें प्रतिबिंबित होऊं लागली. ही जी नवी संस्कृति आली तिने उत्पादन सामर्थ्य वाढविलें. व जगांत भौतिक संपत्तीची पैदास फार मोठ्या प्रमाणावर होऊं लागली. साहाजिकपणें विचारांचा रोख सुद्धा भौतिकतेवर केंद्रित झाला. कारण नवी समाजाची घडी जी निर्माण होत होती तिला अद्याप नैतिक अधिष्ठान वा स्थैर्य प्राप्त व्हावयाचें होतें. तें तसें प्राप्त व्हावयास हवें ह्या साठी मध्यम-वर्गाची साभिप्राय धडपड होती. हें नैतिक अधिष्ठान प्रस्थापित होण्यासाठीं धर्माधिष्ठित मूल्यें व समाजरचना यांचाच अधिक्षेप व्हावयास हवा होता. मध्यम वर्गाच्या एका विभागाने बुद्धिवादाचा अवलंब करून हें काम सुरू केलें. याला

शास्त्रीय संशोधानें व अभ्यासानें अत्यंत महत्त्व येत होतें. यूरपमध्ये १८ व्या शतकांत बुद्धिशीलता मोठे मोठे विचारवंत वाढीस लावीत होते.*

तथापि सर्वच मध्यमवर्ग हा अशा प्रकारें नव संस्कृतीचा पुरस्कार करील हें शक्य नव्हतें. त्याचें लक्ष अद्याप प्रथम जें भूतकालीन संस्कृतीसंबंधीं आकर्षण निर्माण झाले होतें तेथेच खिळलें,—त्यांतूनच पुढे आक्रमक वा संरक्षक—राष्ट्रवाद निर्माण झाला. 'राष्ट्रीय संस्कृती'ची कल्पना वाढीला लागली. दुरभिमान पण वर्धमान झाला. मध्यमवर्गीय कर्तृत्व हें असें दुभंगले गेलें, व जवळ जवळ परस्पर विरोधी अशा दोन विचारधारा प्रत्येक राष्ट्रात—ज्या ज्या ठिकाणीं ही उद्योग संस्कृति गेली वा जाते तेथे—निर्माण झाल्या व होतात हें ध्यानांत धरणें आवश्यक आहे.

तत्पूर्वी हा वेळ पावेतों सांस्कृतिक जीवनांत अनन्य साधारण महत्त्व असलेल्या धर्म संस्थेचें सामाजिक व राजकीय वर्चस्व वा महत्त्व कमी होणें आवश्यक होतें—व तें कसें कमी होत गेलें हें पाहणें उद्बोधक आहे.

**धर्मसंस्था कृतिशून्य झाली—**

धर्मसंस्था ही वास्तविक पाहूं गेलें असतां या पूर्वींच कालपक्क झाली होती. तथापि तिला विरोधी अशी कोणतीहि सामाजिक आणि राजकीय शक्ति निर्माण झालेली नव्हती. ती संस्था दीर्घकाल टिकल्यानें तिचें स्वरूप व कार्य खूपच गुंतागुंतीचें व शिथिल झालें होतें, आणि त्यामुळे कोणतीहि 'एक' समाजसंस्था तिची जागा घेईल हें शक्य नव्हतें. राजकीय क्षेत्रांतून तिची हकालपट्टी करण्यासाठी वर निर्दिष्ट केलेल्या मध्यम वर्गानें राजास हातीं धरलें व राज्यसंस्था ही धर्मसंस्थेपासून पूर्णपणें विभक्त करण्यास ह्या मध्यम वर्गास कमालीचें यश मिळालें. यूरपचा आधुनिक कालाच्या आरंभीचा इतिहास हा अशा प्रकारें धर्म-व राज्य या संस्थांच्या सामाजिक पुढारीपण मिळविण्यासाठी झालेल्या लढ्याचा इतिहास आहे. आणि कांही कालानंतर राजकीय क्षेत्रांतून धर्मसंस्था पूर्णपणें निवृत्त झाली.

* या कालांत भौतिक विचार कसे वाढीला लागत होते, ह्याचें सविस्तर विवेचन आचार्य जावडेकर यांच्या 'आधुनिक राज्यमीमांसा'या ग्रंथांत आढळतें.

तथापि सांस्कृतिक व विशेषतः ज्ञानाच्या क्षेत्रांत तिचें अग्रेसरत्व नष्ट व्हावयास हवें होतें. तेंहि नवनवीन शास्त्रीय शोधांनी जो बुद्धिवाद वाढीला लावला त्याने, आणि मुद्रण कलेच्या प्रसारानें नष्ट झालें. असें असलें तरीहि वर-उल्लेखिलेल्या मध्यम वर्गीय एका विभागानें धर्मसंस्थेचें 'राष्ट्र' संस्थेच्या आधारानें संजीवन करण्याचा यत्न केला. राष्ट्रीय जीवनाच्या आणि साहित्याच्या वाढीचा आढावा घेतांना तो धागा अवश्य विचारांत घ्यावा लागतो. साहित्य-बाह्य अतएव केवळ सामाजिक वा राजकीय विचारप्रणाली म्हणून त्यांचा अनुल्लेख करणें चुकीचें ठरेल.

**विविध समाज-संस्थांचा व शास्त्रांचा उदय—**

धर्मसंस्थेचें सार्वभौमत्व नष्ट झाल्याने वैचारिक व सांस्कृतिक क्षेत्रांत फार मोठे फेरबदल झाले. समाजाला जो नवा आकार येत होता त्याचें स्वरूप खूप संमिश्र होतें. बहुविध होते. धर्मसंस्था सामर्थ्यशून्य होऊं लागली होती परंतु एक संस्था वा नवी संस्था तिची जागा घेईल असें दिसेना. हा उल्लेख वर आलाच आहे. त्यायोगें बरीच अस्थिरता निर्माण झाली. एकंदर शांतता पालन व समाज नियंत्रण या दृष्टीनें राज्यसंस्थेने तिचा वारसा घेतला. व या राज्य-संस्थेची सूत्रें आपल्या हातीं घेण्यांत व धर्मसंस्थेशीं टक्कर देण्यास मध्यम वर्गानें यश मिळविलें. धर्मसंस्थेचें सांस्कृतिक जीवनांतलें सार्वभौमत्व निरनिराळ्या भौतिक ( वैज्ञानिक ) व सामाजिक शास्त्रांनी व समाज-संस्थांनी घेतलें. पुढे त्या संस्था व ती शास्त्रें, स्वतंत्र रीतीनें वाढीस लागलीं. आजच्या भाषेंत सांगावयाचें तर समाजशास्त्र, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र, तत्त्वज्ञान, न्यायशास्त्र, भौतिक शास्त्रें (रसायन, पदार्थ, जीव,...इ. विज्ञानशास्त्रें) व शिक्षण, साहित्य, इतिहास इ. सांस्कृतिक क्षेत्रें स्वायत्तता पावलीं. त्यांचा धर्मनिरपेक्ष-व नंतर समाजनिरपेक्ष-असा विकास सुरू झाला. एकंदर जीवनांत बुद्धिनिष्ठेने, भौतिकतेने प्रवेश केला.

**मध्ययुगांतील जागृतीची पाउलवाट—**

ही एक मोठी, व्यापक स्वरूपाची प्रक्रिया होती, व तिचीं बीजें मध्य-युगाच्या उत्तरार्धांत कशीं पेरलीं जात होती. जीवनमूल्याचें पुनर्मूल्यांकिरण कसें कसें होऊं घातलें होतें, हें मागे पाहिलें आहे. प्रत्येक देशाच्या संस्कृतींत हाच प्रकार

होत होता. ज्या प्रमाणें मध्ययुगांत जगांतील जीवनाचा रोख एका विशिष्ट गोष्टींकडे होता, म्हणजे सर्वसाधारणपणें जीवन व कल्पना यांत एकप्रकारचा सारखेपणा दिसतो, त्याचप्रमाणे या जागृतीचें स्वरूप पण निरनिराळ्या देशांत सारखेंच दिसतें. युरोपीय देशांतलीं व आपल्याकडली कांही उदाहरणें सापडतात. त्यावरून हें म्हणणें अधिक स्पष्ट होतें.

**कांही लक्षणें—**

मध्ययुगीन कृषिसंस्कृतीत धर्म सुधारणेबाबत विचारवंत कसा विचार करीत होते याचा उल्लेख मुद्रणपूर्व साहित्याचा विचार केला तेव्हा आला आहे. धर्माच्या स्वरूपाबद्दल, आवश्यकतेबद्दलचें ऐक्य हा या विचार जागृतीचा पहिला भाग कसा आहे हेंहि पण त्या वेळीं पाहिलें.

साहित्याच्या दृष्टीने त्यापेक्षा अत्यंत महत्त्वाचें असें अंग दृष्टीत भरतें. तें म्हणजे या कालातलें भाषेसंबंधीचें धोरण हें होय. धर्माच्या सुधारणेची चळवळ ही प्रामुख्याने आज आपण ज्यांना आधुनिक भाषा म्हणूं त्यांच्या द्वारें व त्यांच्या आरंभस्थानापासून झालेली आहे. आणि ह्या विशिष्ट धोरणामुळे आधुनिक भाषांचें विचार-धन हें समृद्ध झालें आहे. यूरपमधील इंग्रजी, फ्रेंच आदि भाषाना या कालात महत्त्व येऊं लागलें. लोकांची सहानुभूति संपादण्यासाठी तेथील मध्यम-वर्गानें ह्या भाषांना हातीं धरलें, समृद्ध केलें. आपल्याकडेही हाच प्रकार आढळून येतो. मराठी, हिंदी, बंगाली, आदि भाषांनी आपले संसार थाटले व त्यांचें साहित्य-धन या दृष्टीनें वाढील लागलें. स्वभाषेविषयी प्रत्येक लेखकास जो आदर आहे तो अत्यंत महत्त्वाचा आहे. ज्ञानेश्वरांपासून तों मोरोपंतांपर्यंत सर्व मराठी कवींना मराठीचा जो जाज्वल्य अभिमान आहे, तो लक्षांत घेतां कृषि-संस्कृतीच्या उतारावस्थेतली ही जागृति आपणांस वाटतें तितकी कृतिशून्य नव्हती. सर्वसाधारण समाजाला आपल्या मातृभाषेंत आपल्या हृदयाशी बाळगिलेली ध्येयें, मनीषा व्यक्त करावयास, ऐकावयास मिळतात म्हणून फारच मोठा हर्षाचा उमाळा आला होता. कारण ह्या भाषांनी अगम्य देववाणीचा पांडित्य-ओजडपणा कमी केला. आणि दलितांची, सद्विचारांची वूज राखली आहे. इतकी प्रत्यक्ष संस्कृत आदि भाषांनी राखली आहे की नाही हें पाहाणें निश्चितपणें मौजेचें ठरेल.

तिसरें एक लक्षण म्हणजे एका मोठ्या भूखंडाबद्दल 'एकतेची भावना', हें होय. आपण आज ' भारतीय संस्कृति ' असा उल्लेख करतों. व सर्व भारताला साधारण अशी संस्कृति आहे अशी आपणांपैकी कांहींची श्रद्धा आहे. यूरपच्या बाबतीतही असेंच होतें. आपण पाश्चात्य लोकांस सर्वसाधारणपणें युरोपियन् म्हणतों. त्यांच्यांत, फ्रेंच, डच्, जर्मन, इ. असा फरक पुष्कळ दिवस करीत नव्हतों. अशा प्रकारें 'यूरप हा एक आहे.' हा युरोपीय 'तात्त्विक एकते'चा ( थिऑरीटिकल् यूनिटी ऑफ् यूरप ) विचार हा यूरोपीय विचारवंतांस पहिल्या महायुद्धापावेतों प्रिय होता. अशा प्रकारें आपण राहतों त्या विस्तृत भूखंडाबद्दल अशी ' एकतेची ' भावना असणें हा एक मध्ययुगीन विचारांचा भाग आहे, असें रँडॉल हा संस्कृति समीक्षक आपल्या ' क्रियेटिव्ह सेंचरीज ' ह्या ग्रंथात म्हणतो.—सांस्कृतिक सारखवटपणा दर्शविणारी हीं उदाहरणें पुरेशी आहेत. यावरून व मागे आलेल्या विवेचनावरून मध्ययुगांत चालू असलेल्या व्यापक अशा सामाजिक प्रक्रियेची कल्पना येऊं शकेल.

मध्ययुगांतील अज्ञानाप्रमाणे ज्ञानप्राप्तीच्या दिशेंत असलेलें हें साम्य मध्ययुगीन कालात कृषि संस्कृति ही जगभर कशी एक होती हे दर्शवील...त्यावरून समाजाच्या अंतरंगांतून प्रगतीचा ओघ कसा सुसशीलपणें वाहात होता हें स्पष्ट होईल. ब्रिटीशांच्या आपल्या देशांतील आगमनाचे योगाने ह्या नैसर्गिक वेगास धक्का बसून अत्याचाराचें, हटवादाचें स्वरूप आलें. व त्यायोगें आपणांस ही नवी संस्कृति आदरणीय वाटत नाहीं. ह्या संस्कृतीची वाढ यूरोपमध्ये जास्तींत जास्त सहजशीलतेने झाली असल्याने तेथील सांस्कृतिक...इ. जीवनागांचा विचार करणें आवश्यक आहे. कारण तेथून ही संस्कृति जगात पसरली. म्हणून वेगवेगळ्या देशांत तिच्या आगमनानंतर जी उलथापालथ झाली तिचें रूप, व यूरोपमध्यें ती संस्कृति वर्धमान होत असतां झालेल्या घडामोडी, यांत बरेंच साम्य असणे अपरिहार्य आहे.

## " स्वातंत्र्य, समता, बंधुता "—

आधुनिक कालाला त्याच्या संस्कृतीला हें रूप देण्याला कोणत्या घटनांनी किंवा चळवळींनी मदत केली आहे त्यांचें स्वरूप पाहिलें.) समाजांत

जी उलथापालथ होत होती तिचें स्वरूप पुष्कळसें, उद्योगभिन्नतेवर आधारलेलें होतें, जीवनानिर्वाहासाठी म्हणून जो व्यवसाय करावयाचा त्यांत विविधता येऊं लागली, व मोठमोठे उत्पादक धंदे सुरु झाले, त्यामुळे या उलथापालथीस औद्योगिक क्रांति म्हटलें जातें. या क्रांतीची प्रक्रिया निरनिराळ्या अवस्थांतून सुरू झाली. क्रांति जों जों बद्धमूल झाली, तों तों विषमता वाढूं लागली व सर्व सामान्य समाजांतला असंतोष पण वाढूं लागला. त्यांतून, मध्यम वर्गाच्या बुद्धिशीलतेंतून, व त्याच्या वरिष्ठ वर्गाशी होत असलेल्या क्रिया प्रतिक्रियांतून काही विशिष्ट मूल्ये निर्माण होणें आवश्यक होतें. तसेंच ही नवी व मध्यमवर्गाची संस्कृति होती, तिला स्वतःची अशीं जीवितमूल्यें असणें आवश्यक वाटलें.

भौतिक समृद्धतेच्या योगाने साहाजिकपणेच समाजांत भौतिक विचार दाढीला लागूं लागले, आणि धर्माधिष्ठित व पारमार्थिक विचार हे मागे पडले. त्याचें सामाजिक अधिष्ठान नष्ट झालें. तथापि नवीं जीवित-मूल्यें निर्माण झाल्याखेरीज या नव्या-उद्योग संस्कृतीस-स्थिरता लाभणें शक्य नव्हतें. मध्यम-वर्गाचा वरिष्ठ वर्गाशी जसा झगडा सुरू होता त्याप्रमाणेच कनिष्ठ वर्गहि त्याच वरिष्ठ वर्गाच्या दास्यांत खितपत पडला होता. त्याला त्या दास्यांतून बाहेर काढल्याखेरीज त्याची शक्ति नवें सामर्थ्य आलें होतें त्यासाठी वापरणें मध्यम वर्गास शक्य नव्हतें. तेव्हा या दुहेरी आवश्यकतेंतून—व उद्योग धंद्याच्या आधाराने जी व्यक्तित्वाची जाणीव निर्माण झाली होती, त्यांतून नवीं मूल्यें निर्माण होणें आवश्यक होतें. तशी मूल्यें निर्माण झाली. व तीं म्हणजे **' समता, स्वातंत्र्य, बंधुभाव '** ही होत.—स्वातंत्र्य, समता बन्धुभाव या विचारांप्रत येण्यांत मानव जातीने फार मोठा टप्पा गांठला आहे.—ही विशिष्ट उच्च मूल्यें हा सामाजिक व सांस्कृतिक परिस्थितीचा परिपाक होत. कृषि-संस्कृतींत देव, धर्म, परमेश्वर, मोक्ष, इ. जितकीं आकर्षक वाटलीं तितकींच हींहि वाटत आलीं आहेत. ज्या मानव जातीनें त्या धर्म-प्रणित मूल्यांची पूजा केली आहे, तिनेच ही निर्माण केलीं आहेत, हें लक्षांत धरणें आवश्यक आहे. त्याखेरीज ही पुढची पायरी आहे हें लक्षात येणार नाही. धर्मप्रणित मूल्यें

हीं नैतिक, अध्यात्मिक, व उच्च, आणि ही, भौतिक, हीन, असा फरक करणें योग्य नव्हे.

सामाजिक व जीवित मूल्याचें हें जें संक्रमण होत होतें तें प्रामुख्याने साहित्याचे आधाराने झालें, व म्हणून साहित्य चर्चेत त्यांचा उल्लेख आवश्यक वाटला. ह्या मूल्यांच्या पुरस्कारार्थ फ्रेंच राज्यक्रांतीचें नांव घेतलें जातें, व तें योग्य आहे. तों पर्यंत ही होऊं घातलेली उलथापालथ वा समाजक्रांति अधिक साकार, सादेश होत होती, व मध्यम वर्गाचे हाती राज्ययंत्र येण्यास, धर्मसंस्थेचें सामाजिक दडपण नष्ट होण्यास व ही नवीं मूल्ये निर्माण होण्यास एवढा काल यूरपमध्ये लागला.

## व्यक्तित्वाची नवी जाणीव--

कृषि संस्कृतीच्या प्रथमावस्थेंत माणसास मानवी जीवन व निसर्ग ह्यावर हुकमत चालविणाऱ्या शक्तीची कल्पना आली. दुसऱ्या अवस्थेत तीतून परमेश्वर विषयक --आस्था निर्माण झाली. भौतिक जीवन हें अत्यंत परावलंबी व निकृष्ट दर्जाचें होतें. भौतिक सृष्टीवरलें माणसाचें प्रभुत्वहि बेताचेंच होतें. त्यामुळे जीवनास आधार म्हणून माणसाने कल्पनेंतून परमेश्वर निर्माण केला. त्या परमेश्वराच्या आधारेंच त्या कंगाल भौतिक अवस्थेंत विशिष्ट प्रकारचा जीवन--विषयक--आशावाद निर्माण झालेला आहे, हें लक्षांत धरावें लागतें. या नव्या संस्कृतीत माणसाचें भौतिक जीवनावर प्रभुत्व वाढलें. तें जेव्हा त्याच्या लक्षांत आलें तेव्हा एक नवीनच जाणीव निर्माण झाली व ती म्हणजे स्वतःचें व्यक्तित्व वा मन. ह्या जाणिवेंतून ह्या संस्कृतीला संमत असणारें समता, स्वातंत्र्यादि मूल्यांइतकेंच महत्त्वाचें मूल्य उदयास आलें व तें म्हणजे व्यक्तित्व, हें होय. हें व्यक्तित्व प्रथमावस्थेंत प्रगतिशील कार्य करतें झालें. पुढील अवस्थेंत--धर्मप्रणित--मूल्या-प्रमाणेंच त्यांत एक प्रकारची 'अंतिमता' (अॅब्सोल्यूटनेस्) शिरली. व उद्योग संस्कृति ही तेथेंच स्थिर झाली.

वर आलेल्या जीवन मूल्यांबाबतची आस्था ही ज्याप्रमाणें या कालीन साहित्याची एक निष्ठा ठरली त्या प्रमाणेंच व्यक्तित्व हें पण मोलाचें ठरलें. ह्या

व्यक्तित्वास साहित्यक्षेत्रांत अतीव महत्व आलें. शेक्स्पीअरने ह्या बाबतींत फार मोठें कार्य केलें आहे.

**मध्यमवर्गीय मनाचें आविष्करण—**

साहित्य क्षेत्रांत हा फरक घडून येण्यास नवा वाचक वर्ग व शिक्षित वर्ग हा पण कारणीभूत होता. हा वर्ग लेखकांपुढे वाचक म्हणून उभा राहूं लागला, व त्याचा असा परिणाम झाला की साध्या व्यक्तीच्या आशा, आकांक्षा, वांच्छा, साफल्य, वैफल्य,... इ. मनोभावनांचें प्रत्यक्ष आविष्करण करणें लेखकांना पण नैसर्गिक वाटूं लागलें. त्याचप्रमाणे प्रसिद्ध वा पौराणिक व्यक्ति, किंवा राजा, राणी...इ. जेष्ठवर्गीय व्यक्तींचें साहित्यांतून उच्चाटण झालें. शेक्स्पीअरच्या वेळीं ही क्रिया नुकतीच कोठे सुरू होत होती. व त्यादृष्टीने शेक्स्पीअर हा संधिकालचा नाटककार आहे असें म्हणावयास हरकत नाही. म्हणजे पूर्णपणें व्यवहारांतील व्यक्तींना रंगभूमीवर पाहण्याइतकी लोकांची मनोवृत्ति तयार झालेली नव्हती. परंतु व्यक्तिगत भावनांची खळबळ मात्र प्रत्येकाच्या परिचयाची होत होती. व म्हणून शेक्स्पीअरने मध्ययुगीन व्यक्ति, वातावरण कायम ठेवलें. कारण त्यांत तत्कालीन मनाला (रेनास्सॉंट माइण्ड) एक प्रकारचें आकर्षण वाटे. व भावना वासना...इ. मात्र शेक्स्पीअर कालीन. त्यामुळे त्याची नाटकें आज-पर्यंतहि लोकप्रिय आहेत—होऊं शकलीं. वाङ्मयांत हें जें नवें मध्यम वर्गीय कर्तृत्व व त्यांच्या अनुषंगाने व्यक्तित्व निर्माण होत होते, त्याचे गुणदोष शेक्स्पिअर व तत्कालीन ग्रंथकारांत आपणांस पाहाण्यास मिळतात. व्यक्तित्वास प्रत्यक्ष वाव भावगीतात मिळत असल्याने या कालांत उत्कृष्ट भावगीतें रचली गेलीं.

आपल्याकडे सुद्धां नवें व्यक्तित्व व जुनीं प्रतीकें वा पात्रें वा वातावरण असा प्रकार कोल्हटकर, परांजपे, खाडीलकर, गडकरी इ. च्या कृतींतून व हरीभाऊंच्या ऐतिहासिक कथांतून दिसून येतो. त्यांत हरीभाऊंच्या साहित्य निष्ठा या नवजीवननिष्ठांशी अधिक एकरूप झाल्या होत्या असें दिसतें.

**साहित्यिक व्यक्तित्वाचा व साहित्य प्रकारांचा जन्म—**

पुनरुज्जीवनाच्या चळवळीपासून फ्रेंच राज्यक्रांतीपर्यंत दोन अडीच शतकें लोटलीं. पुनरुज्जीवनाच्या चळवळीचें, सांस्कृतिक व साहित्यविषयक स्वरूपाचें,

आणि परिणामाचें विवेचन केलें आहे. अठराव्या शतकांत नव्या जाणिवेने, व कर्तृत्वाने संपन्न झालेलें असें नवें जीवन स्थिरता पावलें. व याचा परिणाम साहित्य विषयक प्रगति होण्यांत, झाला. साहित्याचें क्षेत्र हें एक विद्वत्ताशील कर्तृत्व क्षेत्र गणलें गेलें. त्याचा व उपदेशाचा संबंध तुटावा असें वाटूं लागलें, व त्याचीं स्वतःचीं अशीं मूल्यें असावींत अशी जाणीव लेखक, टीकाकारांना होऊं लागली. त्याचप्रमाणे नवें साहित्यिक व्यक्तित्व तयार झालें. डॉक्टर जॉनसन, पोप, अॅडीसन, स्टील, स्विफ्ट इ. व्यक्तित्वपूर्ण लेखक 'लेखक' म्हणून पुढे आले. लेखक म्हणून जगण्यास इंग्लंडमधील जीवन तितकेंसें अनुकूल नव्हतें. परंतु लेखकाचें वेगळेंपण निदर्शनास येऊन तो समाजांत मान्यता पावत होता.

याही ठिकाणी पुन्हा मुद्रणाचाच उल्लेख करणें अपरिहार्य आहे. या काला-पर्यंत ( १८ व्या शतकांत ) मुद्रणकलेचा प्रसार बराच झाला होता. प्रकाश-काचा धंदा पण वाढला. कागदाची पैदास आणखी वाढली; वाचकवर्गहि वाढला त्याचा परिणाम दोन गोष्टींत झाला. पहिला परिणाम म्हणजे गद्य–प्रधान साहित्य लिहिलें जात होतें त्यांत आणखी कलापूर्ण वाङ्मय–प्रकार सुरू झाले. काव्याचें क्षेत्र थोडें संकुचित झालें, उलटपक्षी काव्यांत मोडेल असें उत्कृष्ट गद्य लिहिलें बोललें जाऊं लागलें. संभाषणांना साहित्यिक सांस्कृतिक महत्त्व आले, थोडक्यांत सांगायचें तर कथा, कादंबरी, विनोद, टीका, चरित्र, इतिहास, प्रवास...इ. साहित्यप्रकार रुजू लागून, साहित्याचें वेगळेंपण स्वतंत्र रीतीनें वाढीस लागलें, त्यांत कलात्मकता, व्यक्तित्व अधिकाधिक प्रतीत येऊं लागलें.

### वृत्तपत्रें मदतीस आलीं

मुद्रणकलेच्या आधाराने वाढलेली आपल्या युगाची अत्यंत मोठी संस्था म्हणजे वर्तमानपत्रें. या संस्थेने मानव समाजाची किती सेवा केली आहे वा करीत आहे हें येथे सांगावयाचें नाही. परंतु साहित्यास आजचें स्वरूप येण्यास ह्या संस्थेचें अनंत उपकार झाले आहेत. व्यक्तिपरिचय, लघुनिबंध हे आपल्या कालाचे मनोज्ञ वाङ्मयप्रकार वृत्तपत्रांनीच वाढीला लावले, व वर निर्दिशलेल्या वाङ्मयप्रकारांचा पण प्रसार–होण्यास वृत्तपत्रांची मदत झाली आहे. याखेरीज

विचार क्षेत्रांत व सांस्कृतिक क्षेत्रांत वृत्तपत्राची कामगिरी फार मोठी आहे. जीं नवीं जीवित मूल्यें निर्माण झाली, तीं वृत्तपत्रांनी निर्माण केलीं आहेत असें म्हणणें अस्थानी होणार नाही. हें विवेचन आपल्याकडील वर्तमानपत्रसंस्थेच्या आधारेंहि स्पष्ट करतां येईल.

नव्या मूल्यांविषयी श्रद्धा, व समाज राजकारण विषयक प्रश्नांमागील नैतिक अधिष्ठान हीं अधिक महत्त्वाची आहेत. वृत्तपत्रांनी निरनिराळ्या जीवन क्षेत्रांत निरनिराळ्या चळवळी स्वतंत्रतया घडून येणें शक्य झालें. साहित्यक्षेत्रांतहि अशा—विविध चळवळी होऊं लागल्या, विविध प्रकारचे ' वाद ' होऊं लागले.

**नव्या साहित्याचें स्वरूपावलोकन—**

साहित्य विषयक—साहित्य क्षेत्रीय—चळवळींकडे वळण्यापूर्वी नव्या साहित्याचें आलोचन करणें आवश्यक आहे. नव्या साहित्याची—मानवी सांस्कृतिक-व भौतिक पार्श्वभूमि कशी होती याचें दिग्दर्शन केलें. त्या पार्श्वभूमींतून नवीं मूल्यें कोणती व कशी आलीं, आणि नव्या शोधांनी तीं कशीं आविष्कृत झालीं हें पण पाहिलें. आता या सर्वांचा परिपाक म्हणून जें नवें साहित्य निर्माण होऊं लागलें—झालें—त्याचें स्वरूप पाहणें आवश्यक आहे.

हें साहित्य सर्व दृष्टींनी नवें होतें. म्हणजे अंतर्बाह्य नवें होतें, मुद्रण-पूर्व संस्कृतीच्या शेवटीं शेवटीं जें नव-मूल्यीकरण सुरु झालें होतें त्यायोगें ह्या साहित्याचा तोंडवळा तत्पूर्व साहित्याहून वेगळा होता. तरी पण अंतिम जीवितमूल्यें हीं तींच असल्याने तसा क्रांतिकारक फरक आहे असें म्हणतां येत नाही. मुद्रणोत्तर जीवनांत आमूलाग्र क्रांति झाली. साहित्य हें ही ' वाङ्मय ' न राहतां साहित्य झालें. तें ग्रंथानिविष्ट होऊं लागलें, त्याचा प्रसार होऊं लागला. लेखक व वाचक यांच्या मधील अंतर कमी होण्याची प्रक्रिया सुरु झाली. म्हणजे श्रेष्ठ विचार वा साहित्य समजून घेण्यासाठीं, हरदास, पुराणिक, प्रवचनकार, धर्माधिकारी यांची मध्यस्थी वाटेनाशी झाली. ती आवश्यकता कमी करण्याचा पुष्कळशा प्रयत्न पुनर्मूल्यीकरण—चळवळीच्या काळांत झाला, तथापि संपूर्णतया त्या बाबतचें यश हें मुद्रणाचा परिशोध परिपूर्ण झाल्यानंतरच हातीं आलें आहे.

**भौतिक विचारांना महत्त्व—**

स्वरूपदृष्ट्या साहित्यांत महत्त्वाचा असा फरक झाला की, साहित्य व वैचारिक जीवन हें भौतिकतेच्या पातळीवर आलें. साहित्यांतहि भौतिक–सामाजिक मूल्यांना महत्त्व प्राप्त झालें. देव, धर्म, मोक्ष, ह्या 'उन्नत' मूल्याचें आकर्षण कमी झालें. त्या गोष्टींकडे पाहण्याचा लेखकांचा व वाचकांचा दृष्टिकोण बदलला. अर्थात् त्या मूल्यासंबंधींचे आकर्षण एकदम खलास होणें शक्य नव्हतें. परन्तु ह्या पुढे धर्मविषयक मूल्यांचा उल्लेख हा प्रतीकात्मक वा रूपकात्मक रीतीने होऊं लागला. त्या धार्मिक वातावरणाचे आवरणाखाली प्रचलित सामाजिक परिस्थितींचा उहापोह ( अप्रत्यक्ष ) करणें लेखकांना सोयीचें व योग्य वाटलें. मिल्टनने महाकाव्यांचे विषय जरी पौराणिक– धार्मिक घेतले– तरी त्याच्यापुढे स्वकालीन जग होतें, आणि त्याचें प्रतीकात्मक प्रतिबिंब त्याच्या काव्यांतून उतरलें आहे. म्हणजे धार्मिक वा पारमार्थिक वातावरण राहिलें तरी त्यांतले पारलौकिक रंग उडाले, व लौकिक रंग चित्रण अधिक भडक होऊं लागलें.

दुसरें लक्षण म्हणजे सामाजिक व राजकीय प्रश्न खुल्या दिलाने चर्चिले जाऊं लागले. जीवनांत जी भौतिकता येत होती तिचाच हा परिणाम होता. मानवी जीवन हें अधिक व्यापक व उन्नत व्हावयास हवें हा विचार पटला व त्याबरोबर जीवनाची अगतिकता ही सामाजिक राजकीय परिस्थितीने निर्माण होते, हें लक्षांत आलें, साहाजिकपणें देशादेशाच्या परिस्थिती प्रकृतीप्रमाणे त्यांना महत्त्वाचे वाटणारे सामाजिक राजकीय–प्रश्न साहित्यांत आले. आणि सामाजिक–राजकीय घडामोडींचा परिणाम तत्काल साहित्यावर झाला, होऊं लागला; थोडक्यांत म्हणजे जीवनासांगाती हलूं डोलूं बोलूं चालूं लागलें.

कृषि संस्कृतींत परमेश्वरावर माणसाचें मन स्थिर झालें होतें. उद्योग संस्कृतींत तें तेथून निघून स्वतःचे ठायीं केंद्रित झालें. हा जो नवा ' ठेवा ' माणसास सापडला त्याचें अत्यंत प्रभावी दर्शन शेक्सपिअरने प्रथम घडविलें. व त्यांतच त्याचें थोरपण आहे. अर्थात् हें जें ' मन ' होतें तें मध्यम वर्गीय व नवजागृत मन होतें. तथापि या पुढें साहित्याचा केंद्रबिंदु मानवी मन हा झाला.

## साहित्य-परिशीलन शास्त्राचा जन्म—

पुस्तकें छापलीं जाऊं लागल्यानंतर लेखकाशी वाचकाचा प्रत्यक्ष संबंध सुरु-झाला व पुराणिक प्रवचनकार...इ. ची आवश्यकता कमी झाली इ. उल्लेख वर आला आहेच. गद्याचे योगाने सोपेपणा आल्याने हें सारें शक्य झालें. तथापि ह्याच घटनेचा असा परिणाम झाला की, लेखकाचें व्यक्तित्व हें अदृश्य झालें. म्हणजे ज्या प्रमाणे टेबल, खुर्ची, इ. वस्तू आहेत त्याप्रमाणें पुस्तकें आहेत, या वस्तूमागें त्या कोणी केल्या हे जाणून घेणें फारसें महत्त्वाचें नसतें, तसें पुस्तकांचें-साहित्याचे बाबतीत होऊं लागलें.—मग अर्थातच साहित्य कृतीचें परिशीलन 'कलाकृती' म्हणून होऊं लागलें. व अशा प्रकारें साहित्य परिशिलन-शास्त्राचा जन्म झाला. यापूर्वी साहित्याचें परिशिलन म्हणजे फक्त विवरण करणें-विचार, कल्पना स्पष्ट करणें येवढाच होता.

त्या परिशीलनाबरोबर कांहींना लेखकाच्या व्यक्तित्वाची खबरदारी घ्यावी असेहि वाटूं लागलें. ती ही गोष्ट साहित्य-परिशिलन शास्त्रांत येऊं लागली. त्या शास्त्रान्वयें नवीन साहित्य-टीकाकारांचा वर्ग निर्माण झाला. व साहित्य क्षेत्रांत निरनिराळे 'संप्रदाय' सुरु झाले. विशिष्ट 'संप्रदाया'स आभिप्रेत असणाऱ्या वैशिष्ठ्यांवर अतिरिक्त भर लेखक कलावंतांकडून दिला गेला. अशा संप्रदायांत या कालांतील सर्वांत महत्त्वाचा संप्रदाय म्हणजे 'क्लासिसिसम्' होय. नंतर त्यावरील क्रियाप्रतिक्रियेंतून साहित्य परिशीलन-शास्त्र वाढीस लागलें.

## रंजकतेची जरुरी—

साहित्याच्या स्वरूपांत आणखी महत्त्वाचा फरक पडला. साहित्यांत रंजक-तेची- कलात्मकतेचा- आवश्यकता निर्माण झाली. धर्मप्रधान संस्कृतींतलें साहित्य हें वरच्या वर्गातील 'सर्वज्ञ' लोकांनी लिहिलें होतें. आणि तें सर्व-साधारण समाजापावेतों येण्यास व त्याला कळण्यास वर उल्लेखिल्याप्रमाणे मध्य-स्थाची आवश्यकता होतीच. ऐतिहासिक दृष्टीने पाहतां ही मोठी उणीव भरून काढण्याचें काम पुनर्मूल्यीकरणाच्या चळवळीने केलें. छापखान्यांतून वृत्तपत्रें वा पुस्तकें- वा मुद्रित मजकूर-बाहेर पडूं लागल्यानंतर आणखी एक आवश्यकता भासली. व ती म्हणजे रंजनाची. पूर्वसाहित्यांतील उच्च जीवितमूल्यें-हरदासादि

मध्यस्थ रंजवून रंगवून सांगत असत. पण नव्या परिस्थितींत तें काम करण्याची जबाबदारी लेखकावरच व त्याच्या साहित्यावरच पडली. त्यामुळे आपाततः वा बुद्ध्या साहित्यांत आकर्षकपणा आणणें आवश्यक झालें. या आकर्षकपणाचा, त्याच्या स्वरूपाची चर्चा होऊं लागली; हें आकर्षण पूर्व-साहित्यांत कसकसें आलें—आणलें ह्याचा तपास सुरू झाला. त्या दृष्टीने जुनें साहित्य-धन पुन्हा एकदा परिमापलें गेलें. त्याचा परिणाम असा झाला की, साहित्यांत कलात्मकता—आकर्षकपणा असणें अपरिहार्य आहे, असें वाटूं लागलें. कित्येकाच्या साहित्याच्या श्रेष्ठतेचा निर्णायक गमक म्हणून त्यालाच स्थान द्यावें असा आग्रह पडला. त्यामुळें तो गुण साहित्यांत परिवर्तित झाला. यापुढील साहित्य अशाप्रकारे टीका प्रतिटीकांच्या आघातांनी घडत घडत अधिक सुरेख, समृद्ध, सकस, निर्दोष होऊं लागलें.

**'तंत्र' शुद्धतेची जाणीव**

या कलात्मकतेच्या अनुषंगाने जी चर्चा झाली, होऊं लागली, तीमुळें साहित्य हें लेखकाचें एक आविष्करण आहे हा विचार बद्धमूल होऊं लागला. व साहित्यिक व्यक्तित्वाची कल्पना येऊं लागली. हें आविष्करण अधिक विविध, विचित्र, विपुल, विदग्ध कसें होईल असें वाटूं लागलें. छापखान्याची वृद्धि होतच होती. लोकांची वाचण्याची आवड पण वाढत होती. जीवनांत—विशिष्ट वर्गांत—समृद्धी आल्याने त्यांना कलात्मकतेची जरुरी वाटूं लागली. आणि या परिस्थितीतून साहित्य स्वरूप दृष्ट्या असा मोठा फरक घडून आला की निरानिराळे साहित्याचे 'प्रकार' सुरु झाले, वाढीला लागले. कथा, कादंबरी, नाटक, निबंध, भावगीत, कथा-काव्य, विनोद...इ. जे प्रकार स्वयंपूर्णतेने वाढत होते, त्याबरोबर त्या प्रत्येकाचें स्वतःचें असें स्वरूप जें बनत होतें, त्यांतून त्याचें 'तंत्र' निर्माण झालें. आणि टीकाकारांचा तांत्रिक शुद्धतेबाबत अधिक आग्रह सुरू झाला.

**व्यक्तिनिष्ठेचा उदय**

पूर्वकालीन साहित्यांत राजा...इ. महान् व्यक्ति असत, आणि त्याच्या चारित्र्यावर कलावंतांकरवीं प्रकाश टाकला जात असे. त्या महाव्यक्तींचा परिचय सामान्य व्यक्तीला करून देण्यासाठी मध्यस्थ लागणें क्रमप्राप्त होतें. ह्या

मध्यस्थ गेल्यानंतर साहाजिकपणें वाचक व लेखक यांत अधिक जवळचें व घनिष्ठ नातें निर्माण होऊं लागलें. कलात्मकतेची जाणीव–सामर्थ्य–प्रतीत झाल्या-नंतर आपलें स्वतःचें–स्वकालीन जीवन ही कलापूर्ण रीतीने रंगविणे शक्य आहे अशी कल्पना लेखकास आली, मग स्वकालीन जीवनांतील साध्या व्यक्तीच्या भावना, रागलोभाकडे लक्ष गेलें, व साहित्यात सर्व साधारण व्यक्तीचा प्रवेश झाला. राजा, प्रधान, देव, परमेश्वर हे जवळ जवळ साहित्यांतून निवृत्त झाले आणि मधून मधून आलेच तर ते केवळ स्वकालीनांना (लेखकाच्या) विशिष्ट संदेश, संजवीन, देण्यासाठीच. सामान्य व्यक्तीच्या मनाचा परिघहि विशाल होत होता आणि समाजशास्त्र, मानसशास्त्र यांचा साहाय्याने साहित्यांत क्रांतिकारक फरक होऊं लागले.

यापुढे साहित्य प्रामुख्याने गद्यांतच होऊं लागलें. चित्रकलाशास्त्रांत फोटो-ग्राफीने जी क्रांति घडवून आणली त्यापेक्षा कितीतरी व्यापक व सर्वकष अशी क्रांति ही गद्याने साहित्य स्वरूपांत घडवून आणली. यापूर्वी गद्य लिहिलें जात नव्हतें अशांतला भाग नव्हे. पण तें केवळ व्यवहाराच्याच निकडीने, व्यवहाराच्या सोयीसाठी. यापलीकडे कलात्मक व उच्च विचारांचें आविष्करण म्हणून गद्यास महत्त्व नव्हतें. राजकीय, सामाजिक, विचारांच्या अनुरोधाने व वर उल्लेखिलेल्या निरनिराळ्या गोष्टींमुळे गद्य साहित्य हें व उच्च समृद्ध होत गेलें.

हा जो स्वरूप बदल झाला त्यांत आणखी एका अंगाचा उल्लेख करणें आवश्यक आहे. लेखकाचें आवाहन ह्यापूर्वी राजाला, देवाला,...अगर तत्सम व्यक्तीला असे. यापुढें तें आवाहन सर्व साधारण व्यक्तीला आलें आणि सर्व साधारण व्यक्तीच्या भावना, हर्ष, आनंद, अनुभव,...इ.ना महत्त्व प्राप्त झालें. आणि व्यक्तीला–सर्व साधारण व्यक्तीला–कोणत्या गोष्टींची चाड आहे याचा शोध सुरु झाला. प्रथम नुसतीच साधी सहानुभूति आली; नंतर राष्ट्रीय संस्कृतीचा अभिमान आला; नंतर कलात्मकता आली, शेवटी व्यक्तित्व आलें. त्या व्यक्तित्वाची सबलता दुर्बलता ही दोन्ही दिसून आली, आणि तीतूनच समता, स्वातंत्र्य, बन्धुभाव, ह्या मूल्यत्रयीचा व राष्ट्रवादाचा उद्गम झाला.

मुद्रणोत्तर–साहित्यांत हा जो फरक झाला तो कांही एकाच भाषेंत झाला असें नाही; तर मुद्रणोत्तर प्रत्येक भाषेचें साहित्य स्वरूप हें असें बदलत असतें

असें आढळून येईल. प्रत्येक भाषेच्या साहित्याची साक्ष तशीच पडेल. आपल्या मराठीच्या बाबतीतही तेंच झालें आहे, लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, आपटे, खाडीलकर, केशवसुत, परांजपे आदि लेखकांचें साहित्य-स्वरूप जर आपण या दृष्टीनें पाहूं लागलों तर हीं लक्षणें आपल्या साहित्यासहि लागूं पडतात असें आढळून येईल.

## साहित्य-क्षेत्रीय 'वादां' ची पार्श्वभूमि

साहित्य परिशीलन शास्त्राचा उदय कसा झाला ह्याचा उल्लेख वर आलेलाच आहे. ज्ञानशाखांचें जें विभक्तीकरण सुरु झालें होतें. त्यांत साहित्य ही एक स्वतंत्र ज्ञान व कर्तृत्व-शाखा निर्माण झाली. आणि त्या शाखेचें विवेचन साहित्य परिशीलनशास्त्राधारें होऊं लागलें. त्याचा एक परिणाम असा झाला की साहित्याचें व जीवनाचें जवळचे नातें संपुष्टांत येऊं लागलें. साहित्य जीवनापासून दूर दूर जाण्याची शक्यता निर्माण झाली. स्वतंत्र ज्ञान वा कर्तृत्व क्षेत्र झालें की थोड्याफार प्रमाणांत असें होतेंच. अशा प्रकारें केवळ पंडितगम्य किंवा साहित्यमूल्यांना प्रमाण मानून लिहिलेलें साहित्य प्रत्येक भाषेंत मधून मधून निर्माण होतें. अठराव्या शतकातल्या इंग्रजी वाङ्मयानें अशा प्रकारें कृत्रिम आकार धारण केला. त्यालाच ' क्लासिसिझम ' म्हटलें जातें. आपल्याहिकडे असें झालेलें नाही असें नाही.

अशा प्रकारें जेव्हां साहित्य जीवनापासून दूर दूर जाऊं लागतें तेव्हा ती परिस्थिति नष्ट करण्यासाठीं नव्या नव्या चळवळी होणें आवश्यक असतें. कारण साहित्य हें जीवन क्षेत्र—कर्तृत्वक्षेत्र—म्हणून मान्य केलें तरी ही त्याची अंतिम निष्ठा जीवन ही आहे हें विसरून चालत नाही. म्हणजेच जीवनाच्या ज्या अंतिम निष्ठा असतात त्याच साहित्याच्या असतात. समाजांतले विचारवंत, साहित्यिक, त्यादृष्टीनें नेहमीं विचार करणारे असतात. व म्हणून केवळ साहि-त्यांत गणल्याजाणाऱ्या अशा चळवळी होतात. इंग्लंडमध्ये—वर निर्दिष्ट केलेलें नवें साहित्य हें १८ व्या शतकाच्या शेवटीं अधिक साकार सावयव झालें, भिन्न झालें, स्वयंनिष्ठ झालें. आणि त्यामुळे केवळ साहित्यिकस्वरूपाची अशी चळवळ होण्याची शक्यता निर्माण झाली—व तशी ती झालीहि.

: ४ :

**पहिली पूर्णपणें साहित्यिक चळवळ—**

अठराव्या शतकांत निरनिराळे वाङ्मय प्रकार रूढ झाले. साहित्य हें वृत्त-पत्राच्या सांगाती प्रामुख्याने वाढूं लागलें. नवें कर्तृत्वक्षेत्र म्हणूनहि साहित्यास महत्त्व प्राप्त झालें, इ. उल्लेख या पूर्वीं आलेले आहेत. ' क्लासिसिझम ' ( अभिजातवाद ) नावाचा संप्रदाय साहित्यक्षेत्रांत खरें म्हणावयाचें झालें तर यापूर्वीच सुरूं झाला होता. त्या ' क्लासिसिझम ' विरुद्ध एक जोराची प्रति-क्रिया साहित्यक्षेत्रांत झाली आणि ती म्हणजे ' रोमँटिक रिव्हायूव्हल् ' ची किंवा अद्भुतरम्यतेच्या पुनरुज्जीवनाची चळवळ ही होय.' क्लासिसिझम' नें साहित्याचें स्वरूप अगदी कृत्रिम करून टाकलें होतें, शहरी नटवेपणा व नकलीपणा यांचा साहित्य विषयक संकेतात फार प्रादुर्भाव झालेला होता. तें अलंकार-बोजड, विद्वद्गम्य असें होऊं पाहात होतें. त्याचे हे दोष घालवून सोपेपणा, साधेपणा व जीवन-शीलत्व या गोष्टी त्याच्यांत याव्यात अशी इच्छा ह्या चळवळीच्या पुरस्कर्त्यांची होती. व ती ह्या चळवळीने बव्हंशाने पूर्ण झाली असें म्हणावयास हरकत नाही.

ही चळवळ म्हणजे फ्रेंच राज्यक्रांतीची इंग्लंडांतली प्रतिक्रिया होय, असें सार्थपणें म्हटलें जातें. या चळवळीचे पुरस्कर्ते लेखक इ. ह्यांची—यातील कांही जण जरी पुढे क्रांतिविरोधी बनले होते तरी त्यांची—प्रेरणा क्रांति ही होती, त्या क्रांतीने पुरस्कारिलेलीं मूल्यें होती, हें विसरून चालत नाही.

औद्योगिक क्रांतीने समाजांत जें दैन्य,दास्य,दारिद्र्य आणलें त्या विरुद्ध जोराची प्रतिक्रिया ह्या क्रांतिवाद्यानी केली. तथापि ही मध्यम वर्गीय चळवळ होती. नव्या मूल्यांचें अधिक मूलगामी परिशीलन वा पुरस्करण कोणी केलें नाही. ह्या

सामाजिक दुःखाचें निरसन कशाने होईल असा जेव्हा यक्ष प्रश्न या लोकांपुढे उभा राहिला तेव्हा त्यांना त्याचें योग्य उत्तर सापडेना. मग कोणास इतिहासकालीन जीवनांत आधार वाटला (व त्यावरूनच रोमँटिक रिव्हायव्हल् हें नांव आलें); कोणास निसर्गात विरंगुळा वाटला. कोणी अनिर्बंध प्रेमाचे व स्वातंत्र्याचे पोवाडे गाऊं लागला; या सर्व प्रतिक्रियांत एक प्रकारची जीवनापासून दूर दूर जाण्याची प्रवृत्ति होती.

ह्या चळवळीने साहित्य मात्र जिवंत, प्रभावी, तेजस्वी, मौलिक असें केलें. धर्मप्राणित मूल्याच्या चाकोरीतून व कृत्रिमतेतून साहित्यास बाहेर काढून नव-संस्कृतीच्या नवमूल्यांची पूजा साहित्यास करावयास लावण्याचें फार मोलाचें काम या चळवळीने केलें आहे. आणि त्या दृष्टीनें निसर्ग, स्वातंत्र्य, प्रेम, संस्कृतिप्रेम यांना महत्त्व आहे.

आपल्या देशावर ब्रिटिश राज्यकर्ते राज्य करूं लागले तेव्हा त्यांच्या देशांतील साहित्याने—व संस्कृतीने—हा मोठा टप्पा गाठला होता हें लक्षांत धरावें लागतें.

**बिंब-प्रतिबिंब भाव...व त्याच्या मर्यादा—**

ब्रिटिशाचें आपल्या देशावर राजकीय वर्चस्व होतें, त्या कालात आपल्या बुद्धीचें, मनाचें, कल्पनाचें पोषण ब्रिटीश-प्रणीत दृष्टीकोणांतून झालेलें आहे. सांस्कृतिक क्षेत्रात व साहित्यांत पण विशिष्ट विचार, चळवळी, संप्रदाय ब्रिटीशांच्या धर्तीवर सुरू झालेले आहेत किंवा पूर्वी होते. ह्या चळवळी इ. केवळ ब्रिटीशांचे अनुकरण करावयाचें या वृत्तीतून निर्माण झाल्या किंवा येथे जी नवीन परिस्थिति निर्माण झाली तिचा परिपाक होत्या हें स्पष्ट करणें कठीण आहे. तरी पण इंग्लंडमधील साहित्य व संस्कृति विषयक चळवळी व येथील तत्क्षेत्रीय चळवळी ह्यांत एक प्रकारचा बिंब प्रतिबिंबत्वाचा संबंध आहे हें स्पष्ट आहे, व ही वस्तुस्थिति इंग्रजीचें आपल्या बौद्धिक जीवनावर वजन आहे, तों पावेतों राहणार असें दिसतें. तथापि काल सापेक्षता ठरविणें कठिण आहे.

यामुळेच आपल्याकडील परिणाम फार संमिश्र आहेत असें दिसून येईल. उदाहरणार्थ, निबंधमालाकार हे पुनरुज्जीवनाचे प्रतिनिधि तर त्यांच्याचनंतर

५-१० वर्षांनी झालेले केशवसुत हे आता उल्लेखिलेल्या अद्भुतरम्यधिष्ठित-चळवळीचे प्रतिनिधि होत. तेव्हा बिंब-प्रतिबिंब भाव तपासण्यांतही तारतम्य धरावें लागतें. यासंबंधींचें अधिक विवेचन पुढे येणारच आहे. कारण ब्रिटीशाच्या विशिष्ठ अशा वर्चस्वाचा वा परिणामाचा माग हा त्या त्या ठिकाणीच पाहणें योग्य होईल.

आपल्याकडे आज जी साहित्य विषयक अवस्था आहे ती इंग्लंडमध्ये अठराव्या शतकाच्या शेवटीं होती असें सामान्यतः म्हणावयास हरकत नाही. म्हणजे साहित्य हें जीवनाच्या बौद्धिक व मानसिक आविष्करणाचें स्वतंत्र क्षेत्र असतें याची जाणीव आज आपणास झालेली आहे. परंतु ती नुसती जाणीवच आहे. कारण साहित्य हें स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र म्हणून मान्य होण्यास जीवनाची सधनता वाढावयास हवी. म्हणजे सर्वसाधारण समाजाचें राहणीचें मान वाढावयास हवें. आपल्याकडे तें अगदी खाली असल्याने अद्याप साहित्य हा स्वयंपूर्ण असा कर्तृत्वमार्ग ( करीअर ) आज होऊं शकत नाही.

अशाच प्रकारची परिस्थिति एकोणीसाव्या शतकाचे प्रारंभी, व अठराव्या शतकाचे शेवटी इंग्लंडमध्ये होती. म्हणजे लेखकांची जरी साहित्य हें स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र म्हणून मानावयाची तयारी झाली असली तरी एकंदर वाचक वर्ग व राहणीचा दर्जा कमी होता.व साहित्य सेवा ही अनुषंगानेंच होत असे. म्हणजे प्रमुख लेखक हे प्रथम, समाज सुधारक, विशिष्ट विषयाचे अभ्यासक, शास्त्रीय विवेचनकार...इ. भूमिकांनी पुढे येतात व नंतर त्यांचे मागे इतिहास 'साहित्यिक' ही पदवी लावतो. आपल्याकडे चिपळूणकर-आगरकरांपासून तों कालेलकर-विनोबांपर्यंत हाच प्रकार चाललेला दिसून येईल. अद्याप केवळ साहित्य हाच व्यवसाय होऊं शकत नाही. व इंग्लंडमध्येहि ही परिस्थिति १९ व्या शतकाच्या प्रथमार्धापर्यंत होती असें दिसतें. एकोणीसाव्या शतकांत-तों पावेतो इतर देशांत प्रसृत होत असणारें-साम्राज्य स्थिर झालें. आणि त्यायोगें अंकित देशातील संपत्तीचा पूर ब्रिटनमध्ये येऊं लागला. त्याचा परिणाम तेथलें एकंदर जीवनमान वाढण्यांत उंचावण्यांत झाला. आणि त्याचा एक परिपाक म्हणजे साहित्योत्पादन हा एक व्यवसाय होऊं शकला.

**एकोणीसावें शतक—**

मुद्रित-साहित्याच्या ह्या कालखंडांत एकोणीसाव्या शतकास अनन्य साधारण महत्त्व आहे. या शतकामध्ये बौद्धिक, सांस्कृतिक आणि भौतिक असे तिहेरी पुढारीपण इंग्लंडला लाभलें. साहजिकच इंग्लंडने जगास निरनिराळ्या क्षेत्रांत उच्च दर्जाची माणसें ह्या शतकांत दिली आहेत. कलावादी संप्रदायाचा पुरस्कार करणारे ऑस्कर वाइल्ड् आदि कलाकार व त्याना विरोध करणारे कार्लाईल, रास्किन आदि समीक्षकहि ह्याच युगातले. तसेंच प्रसिद्ध द्रष्टा कार्लमार्क्स व त्याच्या विचाराशी संपूर्ण विरोधी असणारे मिल्, स्पेन्सर-आदि समाज-समीक्षकहि ह्याच शतकातले. आपल्या उत्क्रांतीच्या उपपत्तीने जगास स्तिमित करणारा डार्विन ह्याच शतकांतला; शतकाच्या सुरवातीला वर्डस्वर्थ, शेले, आदि रम्यवादी कवि होऊन गेले, आणि शतकाचा महत्त्वाचा भाग टेनिसन, ब्राउनिंग, आर्नोल्ड, मेकॉले इ. सारख्या विचारवंत, कलावंतांनी गाजविला; तर शतकाच्या शेवटी हार्डी, शॉ, वेल्स, इ. प्रसिद्ध साहित्यकार आपल्या प्रतिभेच्या तेजाने जगाला स्तिमित करीत होते. साहजिकपणेंच ह्या एकोणीसाव्या शतकाला साहित्य–समीक्षण–विचारांतहि महत्त्व द्यावें लागतें. फ्रेंच राज्यक्रांतीने पुरस्कारिलेल्या व मागे एका ठिकाणी उल्लेखिलेल्या मूल्यांना या शतकांतच सर्व-मान्य स्वरूप प्राप्त झालें. त्यातून नवीं मूल्यें निर्माण होण्याची परिस्थिति कशी झाली व त्यांचा जुन्या मूल्याशी संघर्ष कसा आला तें पाहणें आवश्यक आहे. कारण यांतूनच पुढे आपल्या युगाचे विचार वा मूल्यें बनत आलीं आहेत.

साहित्याच्या अभिवृद्धीबरोबर साहित्य-परिशीलन शास्त्र खूपच प्रगत झालें. जीवनाच्या कक्षाहि ह्या शतकात आता पाहिल्याप्रमाणें निरनिराळ्या लोकांच्या कर्तृत्वाने खूपच रुंदावत होत्या. निरनिराळ्या क्षेत्रात जसे मोठमोठे विचारवंत होते तसे साहित्य क्षेत्रांतहि. साहित्य विचारांची किंवा मूल्यांची ज्यांनी चर्चा केली त्यात अर्नोल्ड, रस्किन्, कार्लाईल, यांना अधिक महत्त्व द्यावें लागतें.

साहित्याचे दृष्टीने आणखी एक महत्त्वाचा फरक झाला व तो म्हणजे साहित्य हें एका बुद्धिजीवी गटाचें जीवनकर्तृत्व क्षेत्र बनलें. साहित्याच्या प्रगतीच्या दृष्टीने ही फारच मोठी पायरी आहे. म्हणजे समाजशास्त्रांत साहि-

त्याचा, कलांचा, समावेश होऊं लागला. प्रज्ञाव्यापाराचें क्षेत्र विज्ञानशास्त्रें, समाजशास्त्रें व कला, असें त्रिविभागित झालें आहे, हें विचारवंताच्या लक्षांत आल्याविना राहिलें नाही.

### मानवी जीवनाच्या ध्येयनिश्चितीचा प्रश्न—

मानवी संस्कृतीनें धर्मप्रणित पारमार्थिक मूल्यें सोडून भौतिक व सामाजिक मूल्यांच्या स्वीकार करण्यापर्यंत कशी मजल मारली इ. उल्लेख मागें आलाच आहे. ह्या फरकानुसार एक नवा असा उपक्रम या शतकांत झाला; व तो म्हणजे सबंध मानवी जीविताचें व मानवी जीवनाच्या निरनिराळ्या शाखा उपशाखा आहेत त्याचें ध्येय-संशोधन करणें, हा होय. आणि ह्या जीवित-ध्येय संशोधन—प्रयत्नांतूनच सत्यं, शिवं, सुंदरं, ही एक विचार प्रणाली पुढें आलेली आहे.—साहित्य हे स्वतंत्र कर्तृत्वक्षेत्र झाल्यानंतर त्याही कर्तृत्वक्षेत्राचें ध्येय कोणतें असावें हा प्रश्न निर्माण होणें साहजिक आहे.—या विचारसरणीप्रमाणें सत्य हें विज्ञानशास्त्रें, तत्त्वज्ञान याचें ध्येय, शिव हें भौतिक शास्त्राचें, व सुंदर हें कलाचें ध्येय असावें असें दिसतें. तथापि या ध्येयसंशोधनाच्या निमित्तानें खूपच उलट सुलट चर्चा झालेली आहे. या चर्चेतील एक पक्ष म्हणजे कलावादी संप्रदाय वा विचारसरणी ही होय.

### उद्योग संस्कृतीचें पुनर्मूल्यीकरण

त्या संप्रदायाच्या मताकडे वळण्यापूर्वी आर्नोल्ड, रस्किन आदि विचारवंतांनी जें नवें ध्येय-संशोधन आरंभिलें होतें त्याचें स्वरूप पाहणें आवश्यक आहे. ह्या विचारवंतांवर थोड्या फार प्रमाणांत खिश्चन धर्मविचारांचा संस्कार झालेला होता. ते संस्कृति प्रेमी व समीक्षक होते. तथापि धर्म व संस्कृति यांच्यावरील प्रेमाइतकेंच त्याचें मानव-प्रेमही अव्वल दर्जाचें होतें. साहजिकपणें मनुष्याला—मानवी जीवनाला—प्राधान्य देऊन काव्याचें—साहित्याचें—परिशीलन व्हावयास हवें, हा विचार या लोकांनी वाटीला लाविला. ऑर्नोल्डची 'काव्य ही संस्कृति टीका आहे' (पोएट्री इज् क्रिटिसिझम् ऑफ् लाइफ्) ही व्याख्या त्यादृष्टीनें ऐतिहासिक महत्त्वाची म्हणून विचारांत घ्यावी लागते. साहित्याचा व जीवनाचा अभेद्य संबंध आहे, असावा, हें फार मोठे

तत्त्व तींत व्यक्त झालेलें आहे. कार्लाईल, रस्किन, यांनी पण तेंच कार्य केलें आहे. या सर्व लोकांच्या अतिरिक्त जीवितवादीत्त्वावर प्रतिक्रिया म्हणून 'कलावाद' निर्माण झाला. ( त्याचें विवेचन येणारच आहे ) तथापि या विचारवंतांचा प्रयत्न हा उद्योग–संस्कृतीचें–तिच्या चौकटींतच बसून–पुनर्मूल्यीकरण करणें हा होता. भागवत संप्रदायानें कृषि-संस्कृतीच्या चौकटींत बसून जसें जीवनाचें पुनर्मूल्यीकरण केलें, तसाच प्रकार या लोकांचा होता. परंतु हे विचारवंत हे मुख्यतः उद्योग-संस्कृतीचे प्रतिनिधि असल्यानें तिच्या चौकटींतून बाहेर पडणें त्याना शक्य झालें नाहीं. तसा दुसरा प्रयत्न कार्लमार्क्सचा आहे. तो मात्र बाहेर पडला असें दिसतें. पण तेथपर्यंत सर्वसाधारण समाजास जाण्यास एक आवश्यक अशी सामाजिक, मानसिक पार्श्वभूमि तयार करणें आवश्यक होतें व ती निर्माण करण्याचें काम या लोकांनीं केले आहे.

एकोणीसाव्या शतकात निरनिराळ्या क्षेत्रांत परस्पर विरोधी विचार वाढीला लागत होते, त्यापैकी साहित्यक्षेत्रांत जे परस्पर विरोधी विचार वाढविला लागू पाहात होते त्याची एकंदर सामाजिक वा सांस्कृतिक बैठक ही अशा प्रकारची आहे.

**सत्यं शिवं सुंदरं—**

आतांच उल्लेखिलेल्या सत्य शिव सुंदर ह्या शब्दांना मराठींत वामनराव जोशांनी ' सत्यं शिवं सुंदरं ' असें संस्कृतप्रचुर रूप दिलें, व त्यामुळे असें वाटतें की, ह्या मूल्याचा उगम वा याना आधार आपल्या देशांतील संस्कृति–विचारांत असावा. परंतु तसें काही एक नसून खिश्चन विचारांतील ' ट्रिनिटी ' शी या विचाराचें अत्यंत जवळचें नातें आहे. व या विचाराचें जनकत्व प्रामुख्यानें रस्किनकडे जातें. तसेंच ह्या शब्दांचें आपल्या तत्वज्ञानात्मक विचारांतील ' सच्चितानंद ' या संकेताशीं अविभाज्यत्व कल्पिलें जातें. परंतु तें तसें नाही. ' सत, चित, आनंद,' ही कल्पना पूर्णतया अध्यात्मिक आहे. उलट पक्षी ' सत्य, शिव, सुंदर,' या संकेताचा आशय हा प्रामुख्यानें भौतिक आहे, तेव्हा या दोहोंची सांगड घालणें योग्य नव्हे.

एकोणीसाव्या शतकांतल्या बुद्धिमंतावर या विचाराचें दडपण विलक्षण होतें. व तसें साहाजिक आहे. कारण, मध्यमवर्गानें जरी धर्मसंस्थेशी लढा पुकारून

राज्यसंस्थेची बाजू विजयी करविली, तरी धर्माच्या अंतिम श्रेष्ठत्वाविषयी, व जरुरीविषयी या वर्गास विलक्षण आकर्षण असे, त्यातच जुन्या संस्कृतीच्या इतिहासाचा व आकर्षणाचा भाग होता, व त्यामुळे कलेचें व विद्येचें पुनरुज्जीवन करण्याचे जे विचार सुरू झाले त्याचा पाया पूर्व संस्कृति-प्रेम हा होता.

**साहित्याचें मूल्य आनंद—**

परंतु प्रत्यक्ष जीवन जितकें समृद्ध तितकें त्याचबरोबर विषमतापूर्ण झालें होतें; परस्पर विरोधी विचारसरणी निरनिराळ्या रीतीनी वाढीला लागणें शक्य झालें. भौतिक स्वरूपाचें जें वैभव निर्माण झालें होतें, त्यांत जशी समाजशास्त्रें, विज्ञान शास्त्रें होती, तसें साहित्यहि होतें. व सत्य, शिव, सुंदर, ही मूल्यें, या शास्त्राना आदर्शभूत मूल्यें कशी होतील याचा तपास सुरू झाला. नैसर्गिकपणेंच विज्ञानशास्त्रें, समाजशास्त्र, अर्थशास्त्र,...इ. शास्त्राचें ध्येय मनुष्याचें कल्याण करणें असल्याने त्यासाठी शिव हें मूल्य त्या त्या शास्त्राचें मूल्य म्हणून स्वीकारावेसें वाटलें. तत्त्वज्ञान व धर्म यांचें सत्य. असें 'व्हिक्टोरियन' मनास वाटलें, व साहित्य, कला, याच्या वाट्यास साहजिकपणें 'सुंदर' (आनंद) हें मूल्य आलें. साहित्याने, कलेने केवळ सौंदर्यप्रधान आनंद देण्याचें कार्य पुढे ठेवावें, जीविताच्या इतर गोष्टींसाठी, विचारप्रधान शास्त्रें आहेतच, तेव्हा त्या प्रांतांत विनाकारण शिरून गोंधळ घालावयाचा नसेल तर साहित्याने 'आनंद' हें मूल्य मानावें. अशी एक विचारसरणी अभिनिवेशाने मांडली गेली व अत्यंत वास्तवपूर्ण अशी पण ती त्यावेळी कित्येकांस वाटली, आजहि वाटत आहे.

लेखकाचा स्वतंत्र धंदा झाल्याचा हा परिपाक होता. कारण धर्म, नीति, तत्त्वज्ञान, यांचें विवेचन हें स्वतंत्र व कला-निरपेक्ष करतां येतें. जेव्हा यापैकीं कोणतेंही बौद्धिक युक्तिवादाने पटण्यासारखें लेखन वाचण्याची वाचकाची इच्छा नसते, व केवळ विरंगुळा वाटावा अशी त्याची अपेक्षा असते त्यावेळीं मनुष्य साहित्याकडे वळतो, व तेव्हा, त्याची ही अपेक्षा साहित्याने व कलेने पूर्ण करावी, दुःखाचा त्यास पूर्ण विसर पाडावा, व हेंच ध्येय साहित्याने पुढे ठेवावें. 'कलेकरता कला' या वादाची वैचारिक, सामाजिक व मानसिक पार्श्वभूमि अशा प्रकारची आहे.

## कलावाद्यांची भूमिका—

तसेंच कलावादी लोकांची भूमिका ध्यानांत धरण्यासारखी आहे. त्यांचे मतें कला हा दिव्य अशा मानवी प्रतिभेचा आविष्कार आहे. कलेची उपासना करतांना वा आस्वाद घेतांना कलावंत हा ह्या जगाच्या नीति नियमांपलीकडे जातो. रसिकाची पण तशीच अवस्था कल्पावयास हरकत नाही. तेव्हा अशा नीतिनियमांपलीकडे वसणाऱ्या कलेला जीविताचे निर्बंध बंधनकारक आहेत हे म्हणणें अयोग्य आहे. कलेचें ध्येय कला हेंच होऊं शकतें. दुसरें कोणतें होऊंच शकत नाही. दुःखपूर्ण, विफलतापूर्ण, मानवी जीवनाच्या साहच्यात मनुष्याला ही कलेची हिरवळ तेवढीच सुखदायी आहे. तिला वाळवंटाचे नियम लावून तिचें वाळवंट करूं पाहणें योग्य नव्हे. रूढ नीतिनियम इ. हे परिवर्तनशील आहेत. तेव्हा त्यांचा पाठपुरावा करण्याने कलेचें श्रेष्ठत्व शिल्लक कसें राहील ? कलेचें श्रेष्ठपण असा नीति निरपेक्ष आनंद देण्यांतच आहे.

## आनंद हें छायारूप मूल्य—

किंचित् चिकित्सेने अवलोकन केलें तर असें आढळतें की, सत्य व शिव ही सांस्कृतिक मूल्यें एका दृष्टीने पूर्ण व स्वयंभू आहेत, असें म्हणतां येईल. परंतु सौंदर्य व त्याला अभिप्रेत असणारें आनंद हें मूल्य असें स्वयंभू आहे, असें म्हणता येणार नाही. आनंद हा छायारूप असतो. छायेला ज्याप्रमाणे कोणत्या-तरी वस्तूचा आधार असतोच, त्याप्रमाणें कोणत्यातरी जीवितमूल्याचें आधारेंच त्याची धारणा होणें शक्य आहे असें दिसून येईल. तेव्हा असें छायारूप असणारें मूल्य हें जीवितमूल्य गणलें तरी तें प्रमुख होऊं शकत नाही. परंतु व्हिक्टोरियन युगांत विशिष्ट गटास जी एक प्रकारची कृतकृत्यता आली होती, तिच्या पोटीं आनंद ह स्वयंभू असें सांस्कृतिक मूल्य आहे असें वाटूं लागलें, व त्याचा पुरस्कार साहित्यांत, कलेंत होऊं लागला . तथापि साहित्याचें मूल्य असें दुय्यम असणें योग्य नव्हे. आनंद हें मूल्य उच्च होऊं शकत नाही. त्यासाठी कोणत्यातरी भव्य मूल्याची कास धरावी लागतेच.

जीवनांतील बऱ्या वाईट अनुभवांच्या जंजालातून दूर जावें, जरा विस्मृति घडावी, अशा उद्देशाने जे साहित्याकडे वळत असतील, त्यांना क्षणभर आनंद

हें मूल्य स्वीकार्य वाटेलहि. पण अशी वृत्ति असणें हें एक प्रकारच्या विकृत मनोवृत्तीचें लक्षण आहे; आणि साहित्यासारख्या उन्नत कर्तृत्वक्षेत्राच्या श्रेष्ठ-कनिष्ठतेचें मापन अशा विकृत प्रवृत्तीच्या निर्वाळ्याने होऊं शकत नाही. भव्यतर दृष्टीने साहित्याकडे पाहूं लागलों तर, त्याचें भव्योदात्त असें दर्शन होतें. तें निश्चितपणें अधिक उन्नत स्पृहणीय आहे असें मान्य करावें लागेल.

त्याच युगांत—एकोणीसाव्या शतकांत—जी ' समृद्धता ' आली होती तिची दुसरी बाजू म्हणून विषमता पण वाढीस लागली, व समाजांत कंगाल, दरिद्री, असा वर्ग निर्माण झाला—या वर्गाचे हाल वर्णन करणें, व त्याच्या अपेक्षा, आशा-निराशा दैन्य, दुःख, वर्णन करणें, वा त्याना वाचा फोडणें हें कार्य पण एका दुसऱ्या वर्गाने केलें. या संबंधांत डिकन्सचें नांव घ्यावें लागतें. जीविनाधिष्ठित सत्याचा आविष्कार साहित्यांत करण्याचा हा एक प्रकार होता, व त्यालाच साहित्यक्षेत्रात ' वास्तववाद ' हें नांव मिळालें. तसेंच ज्या लेखकांना ' शिव ' या मूल्याचें आकर्षण वाटलें त्यांनी विशिष्ट ध्येयवादाचा पुरस्कार केला, व साहित्यांत त्याचे अनुषंगाने ध्येयवाद आला. अशा प्रकारें नवीं साहित्यक्षेत्रीय मूल्यें अस्तित्वांत येऊं लागलीं. साहित्याचें लेखन सुद्धा निरानिराळ्या उद्देशांनी होऊं लागलें. कलावादी लोकांची साहित्य-लेखनाची प्रेरणा ' कला ' ही होती, तर इतरांची ' जीवन ' ही होती. साहित्यात ह्या फरकांचे अनुषंगाने दोन परस्पर समांतर असे प्रवाह निर्माण झाले. साहाजिकपणें साहित्य-मूल्य चर्चेंतहि ते प्रतिबिंबित झाले आहेत.

### कला—नीति—वादाचा निष्कर्ष—

मुद्रित-साहित्याच्या कालांत सर्वांत महत्त्वाचा असा हा वाद झालेला आहे. आतांच पाहिलेल्या विविध प्रकारच्या पार्श्वभूमीवर तो अशारीतीने झालेला आहे की, सर्वसाधारण वाचकाचा असा समाज झालेला आहे,—व तसा तो होणें अगदी शक्य आहे—की, हा वाद असाच अनिर्णितपणें सदैव राहणार, व त्यामुळ त्याची कोणती तरी एक बाजू रंगविणें हें केवळ एक विद्याभ्यासकांच्या बौद्धिक करामतीचा भाग राहणार. पण वस्तुस्थिति तशी नाही.

नीति संबंधीची सांस्कृतिक क्षेत्रांत गणली जाणारी आजपर्यंतची रूढकल्पना म्हणजे, ( जुन्या युगांत अर्थात् ) सत् प्रवृत्तींचा विजय, व असत् प्रवृत्तींचा पराजय, ही होय. ह्या सत् व असत् प्रवृत्ती या व्यक्तिगत आहेत. व्यक्तीने आपलें वर्तन सदाचारी, सदिच्छापूर्ण ठेवावें. कोणाचा हेवा दावा करूं नये, असें ठेवलें असता मनुष्याचा अध्यात्मिक उदय होतो, ( व त्यांतून भौतिक अभ्युदयहि संभवतो ). उलट असत् व हीन इच्छेने प्रेरित अशी वर्तणूक असेल तर ती योग्य नव्हे. तिने प्रथमदर्शनीं जरी फायदा होतो असें दिसलें तरी, अंतिम-रीतीने व्यक्ती अधःपतनाप्रत जाते. अशा स्वरूपाचा मुद्रण—पूर्व जगांतील नीति-विषयक कल्पनांचा आशय वा सारांश आहे. नि ह्याच कल्पनांना थोडें कालसापेक्ष स्वरूप देऊन जीवन अधिक उन्नत करण्याचें कार्य पुनर्मूल्यीकरण करूं इच्छिणाऱ्या रस्किन आदि समीक्षकांनी केलें. रूढ अर्थानें ह्याच गोष्टींना नीति-प्रवण म्हटलें जातें. आणि सनातनी लोक तर आहे त्या नीतिनियमांचें बदलत्या परिस्थितिनुरूप वेगळें स्पष्टीकरणहि मान्य करीत नाहीत. त्यांचे मतें सत्याचा विजय झालेला व असत्याचा पराभव झालेला आहे, असा आग्रह साहित्याने—कलांनी—साक्षेपाने धरावा. असें असणें म्हणजेच कलेने नीतिपर असणें होय.—प्रसिद्ध ग्रीक विचारवंत प्लेटो ह्याला हेंच मत मान्य आहे. व अशा विचारसरणीच्या पुरस्कर्त्यांचा तो पाश्चात्य जगांतील पूर्वज होय.—या मताच्या आग्रही लोकांच्या विचारसरणीचें वैशिष्ट्य असें की, सत् म्हणजे काय ? असत् म्हणजे काय ? या संबंधीची बुद्धिनिष्ठ व बुद्धिगम्य अशी चर्चा करावयाचें हे लोक टाळतात. कारण तशी चर्चा त्यांना कदाचित् या संबंधांत विरोधी जाईल अशी साधार भीति असतें.

### सत्य हें युगसापेक्षच—

वास्तविक पाहतां सत्य व असत्य, हे फार मोठे असे नैतिक प्रश्न आहेत. युगांयुगांतून मानवी प्रज्ञेला सत्याचा साक्षात्कार होत आलेला आहे, आणि सत्य म्हणजे काय हेंहि पण भासमान होत आलेलें आहे. मानवीजीवन हें गतिशील असल्याने सत्य हें पण निसर्गतयाच गतिशील असणें संभवतें—कल्पावें लागतें. सत्याप्रत जाण्याचा मानव जातीचा आग्रह, धडपड, प्रयत्न, असला

तरी, युगांयुगांतून सत्य हें युगबंधनांनीच मर्यादित झालेलें आहे. साहजिकच ज्याला आपण त्रिकालाबाधित ' सत्य ' म्हणूं शकूं असें कांहीहि नाही. तसें दाखवतां येत नाही. सनातनी वृत्तीचे लोक तसें तें आहे असें भासविण्याचा प्रयत्न करीत असतात एवढेच.

तर मग ' सत्य ' हें प्रलोभनीय नाही काय ? सत्यासंबंधीचा मानव-जातीचा आग्रह मूर्खपणाचा आहे काय ? नाही. मुळीच नाही. सत्य साक्षा-त्कारासाठी सर्वस्व व प्राणहि पणास लावण्याचा हव्यास मानव जातीचा आहे. आणि तिचीच ती पात्रता आहे. विशिष्ट युगात युगंधर पुरुषांना युगसापेक्ष असें सत्याचें दर्शन होतें. तें सर्व साधारण समाजाला ते करून देतात. त्या दिव्य प्रकाशांत मानवजात काही काल प्रवास करते. पुढे युग बदलतें, दुसरा युगपुरुष येतो, त्याला त्याच्या युगाला परिपोषक असें सत्यदर्शन होतें. तें लोकांस घडवावें अशी त्याची धडपड असते; त्याचा तसा प्रयत्न असतो. सर्व साधारण व्यक्तीप्रमाणे त्याच्या पण ठायी पूर्वयुगाच्या सत्य कल्पनेविषयी आदर असतो. पण नवें सत्यदर्शन तितकेंच भव्य असतें. व त्याच्या मनांत हा अशा प्रकाराचा दोन प्रकारच्या सत्याविषयी—म्हणजेच मूल्यांविषयी—जो झगडा होतो त्याच्या संघर्षांतून—नवसत्याची विद्युल्लता चमकून जाते. हा संघर्ष मानव जातीला अपरंपार महत्त्वाचा वाटला आहे. तोच युग प्रवर्तक महान् काव्यांचा विषय झालेला आहे.—रामायण, महाभारत, हॅम्लेट, पॅराडाईज लॉस्ट, ज्ञानेश्वरी हीं ह्याचीं उदाहरणें होत. नीतीच्या इतक्या भव्य व विशाल अर्थानें आज असें म्हणतां येईल की, नीति व कोणतीहि महत्त्वाची कला वा साहित्य ह्यांची फारकत होऊं शकत नाही.

बोधवादित्व—

परंतु सनातनी—भूमिकेपासून ही भूमिका पूर्णतया भिन्न आहे. त्यांच्या मताप्रमाणे, सत्याधिष्ठित नीति ही शाश्वत आहे व मग साहजीकच सत्य, धर्म, नीति, ह्यांचे अगदी रूढ व मामुली अर्थ गृहीत धरावे लागतात. कारण त्यांच्या मागले गतिशीलत्व काढून घेतले की ह्या कल्पना म्हणजे नुसते साचे उरतात. ते विशिष्ट संकेत न राहतां नुसते शब्दच राहतात. मग त्या अर्थानें

'बरें सत्य बोला, यथातथ्य चाला,' किंवा
'शिवि कोणा देउं नये, गोड फार खाउं नये,'

इ. प्रकारचें 'काव्य' संभवतें. रसिकाच्या भूमिकेवरून त्याचा उपहास होणें अपरिहार्य होतें. हा उपहासहि त्याला विशेष चीड आणीत नाही. सामान्य वाचकाला तो पटूं शकतो. व ह्या सहानुभूतीचा फायदा घेऊन हे विरोधी लोक साहजिकच कलेंत साहित्यांत अशा प्रकारची—म्हणजे कोणत्याहि प्रकारची—नीतिप्रवणता नसावी. निदान तशी अपेक्षा काव्य साहित्यापासून करूं नये असा आग्रह धरतात. कारण वर जी विशाल स्वरूपाची 'नीति—कल्पना' मांडली ती ह्या आक्षेपकांजवळ तरी कोठें असते ? साहजिकपणेंच परस्परांशी न जमणारे व परस्परविरोधी असे दोन पक्ष निर्माण होतात. साध्या वाचकास वाटतें की, एकंदरींत हे प्रश्न असेच जगाच्या अंतापर्यंत विवाद्यच राहाणार आहेत. तर तेव्हा प्रत्येकात थोडें सत्य आहे असें मानावें व गप्प बसावें. वादातच पडावयाचें असेल तर कोणती तरी एक बाजू स्वीकारावी व तिच्या समर्थनाचा शोध करावा फार तर.

वस्तुस्थिति अशी आहे की, ह्या लोकांना अभिप्रेत असणारी सत्याची, नीतीची, कल्पना आहे ती स्थितिशील आहे. व तिचें स्थितिशीलत्व हें कृषि—संस्कृतीचे द्योतक आहे. ह्या संस्कृतीतला नीतिविचार हा परमार्थ विचारांशी निगडित झाला होता, हें विसरून चालतां येत नाही. व त्यामुळे सत्याचे पारितोषिक म्हणजे स्वर्गप्राप्ति, व असत्याचें प्रायश्चित्त म्हणजे नर्कवास; ही व अशाप्रकारचीं रूपकें माणसाच्या मनांत दीर्घकाल रूढ होतीं. कित्येकदां कलावंतहि त्यांतून बाहेर पडूं शकत नाहींत. जमाना बदलला तरी त्या प्रतीकांतूनच माणसें स्वकालीन संघर्ष व्यक्त करीत होतीं, व याची उत्कृष्ट उदाहरणें म्हणजे डँटे, गटे, मिल्टन, बनियन् इ. लेखकांचीं होत.

**नव्या संस्कृतीचा पाया—व्यक्तिवाद—**

परंतु उद्योग संस्कृति आली नि सारा नूर पालटला. नीति कल्पनामागील स्थितिशील संस्कृति गेली. जीवन अधिक भौतिक झालें, गतिशील झालें. नव्या संस्कृतीचा पाया व्यक्तिवाद झाला. समाजाशी व्यक्तीचा संबंध दृढ झाला. व्यक्तित्वाचें स्वरूप अधिक संमिश्र झालें. पण अबोध व्यक्तित्वाची जाणीव होती ती फार

प्रभावी होती, व त्यामुळे व्यक्तीच्या अंतरंगांत भव्य असा नैतिक झगडा सुरू झाला. तिला वाटलें, व्यक्तिस्वातंत्र्य हें अंतिम ना? मग ही समाजाची काय 'कटकट' आहे? साहजिकच समाजापासून दूर दूर जाण्याचा मार्ग कित्येकांना सुचला. कित्येक निसर्गाकडे गेले, कांही प्रेमाकडे, सौंदर्याकडे वळले... या प्रतिक्रियेंतून वर्डस्वर्थ, कीट्स्, शेले, बायरन्, आदि कवि झाले. यांच्या पूर्वीचा असा झगडा शेक्सपीअर, मिल्टनमध्ये व्यतित झाला हें विसरता येत नाही.

ह्या सर्व उदाहरणांवरून स्पष्ट होईल की, सत्यशोधनाची इच्छा मानवजातीला फार प्रबळ आहे. तो प्रयत्न सापेक्षाने मानवजात युगायुगांतून करीत आली आहे. अशा प्रकारच्या प्रयत्नांची पाऊलवाट म्हणजेच महाकाव्यें व महान् अशा साहित्य कृति होत. त्यांतून मानवाच्या खऱ्या सत्यशोधनाचा मागोवा घेतां येतो. तो प्रयत्न मानवजात अखंडतया करीत राहणार आहे. तेव्हा कोणत्या अर्थाने म्हणता येईल की, कलेने, काव्याने, नीतिवादी असूं नये म्हणून? युगाला अभिप्रेत असणारी जीवितमूल्यें ही साहित्याची अंतिममूल्यें होऊं शकतात, हा या सर्व लिखाणांत मांडलेला विचार जर मान्य होऊं शकला, व जीवित मूल्यें कशीं बदलत आलीं हें येथे दाखविलें आहे तें जर पटलें तर कला नीति...इ. वादांचा निष्कर्ष मिळूं शकतो. कालाने ह्या वादाचा निर्णय निश्चितपणें कलावाद्यांच्या विरुद्ध दिलेला आहे, व तो महत्त्वाचा नि निर्णायक आहे असे म्हणावयास हरकत नाही.

मुद्रित–साहित्याच्या कालांत साहित्याच्या ध्येय–संशोधनाचा भाग हा अत्यंत महत्त्वाचा प्रश्न झाला आहे. ह्या संस्कृतींचा साहित्य–विचार हा प्रामुख्याने ह्या केंद्राभोंवतीं फिरतो आहे, म्हणून त्या विचाराचें येथें जरा विस्ताराने विवेचन करावेंसें वाटलें.

### आपल्याकडील पडसाद—

मुद्रणोत्तर युगांत साहित्याच्या अंतर्बाह्य स्वरूपांत, कसा फरक पडला, नवें साहित्य परिशीलनशास्त्र कसें वर्धमान झालें हें पाहिलें. सांस्कृतिक व वैचारिक दृष्ट्या आपल्या देशांतील संस्कृति अवस्था व इंग्लंड आदि देशांतील संस्कृति–अवस्था यात कालाच्या दृष्टीने फरक कल्पावा लागतो. मुद्रण शोध आपणांकडे १९ व्या शतकांत

सरांस आला. साहजिकपणें त्यानंतर नवे विचार प्रसृत होऊं लागले. सामाजिक क्रांतीस सुरवात झाली. पहिल्या महायुद्धानंतर म्हणजे तों पर्यंत झालेल्या वैज्ञानिक प्रगतीने जग हें लहान लहान होत गेलें. व दुसऱ्या युद्धानंतर तर जगांतील राष्ट्रें—विशेषत: वैचारीक दृष्टीने—एकमेकांच्या खूपच जवळ आलीं. आपल्या देशाच्या बाबतींत असें घडलें आहे की, युरोपांत जी प्रगति वा जे विचार उद्योग संस्कृतीच्या—दोनतीन शतकांतून वाढीस लागले ते येथे आत्मसात करण्याचें काम ५०—७५ वर्षांत झालें आहे. अगदी पहिलीं ५० वर्षे नव्या संस्कृतीची केवळ जाणीवच होण्यांत गेली. म्हणजे खरी तीं नवी संस्कृति आत्मसात करण्याची क्रिया अत्यल्प काळांत झालेली आहे. त्यामुळे तिकडील तीनशें वर्षांतील विचारक्रांति इकडे ५०।७५ वर्षांत कशी झाली हें पडताळून पाहणें क्रमप्राप्त ठरतें.

चिपळूणकरांनी पुनरुज्जीवनाची कल्पना आणली, तर केशवसुत, आगरकरांचे विचारांवर मिल्ल, स्पेन्सर, ह्या उदारवादी, व्यक्तिवादी, विचारवंतांचा परिणाम झाला आहे. रानडे, आपटे, गोखले, ह्यांच्या मतावर उदारमतवादाचा परिणाम झाला आहे. उलटपक्षीं टिळक, परांजपे यांनी सांस्कृतिक राष्ट्रवादाची भूमिका उचलून धरलेली आहे. कथेच्या क्षेत्रांतलें उदाहरण घेतलें तरी तेंच आढळतें. स्कॉट आणि डिकन्स ह्या दोन लेखकाचीं वैशिष्ठ्ये एकट्या हरिभाऊंत आढळतात. इंग्लंडांत प्रथम पुनरुज्जीवनाची कल्पना आली व नंतर शतकाशतकाने उदारमतवाद, बुद्धिवाद,... इ. आले. येथे ह्या सर्व गोष्टी इतिहासांतर्गत गतिशीलतेने फारच अल्पकालांत घडून आलेल्या आहेत. त्यामुळे त्यांचा येथे अधिक तीव्र संघर्ष झालेला दिसतो. साधारणपणें ह्या दोन विचारसरणींचा संघर्षांचा कालखंड हा १९२० चे सुमारास संपतो. आणि हा जो साहित्य-ध्येय संशोधनाचा प्रयत्न तिकडे १९ व्या शतकांत झाला तो विचार आपल्याकडे १९२० ते १९३५ ह्या कालांत महत्त्व पावला होता.

**पहिल्या महायुद्धापूर्वी—**

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत एकंदर परिस्थितींत बराच फरक पडत चालला. हिंदुस्थानसारख्या अंकित देशांत राष्ट्रवादी विचार वाढीस लागले.

त्या देशांचा नवी उद्योगसंस्कृति आत्मसात करण्याचा प्रयत्न जोराने सुरू झाला. व त्याचा वाढता प्रसार पाहून इंग्लंडमधील तथाकथित राष्ट्रवादाने साम्राज्यवादाचा स्वीकार केला. आणि त्यामुळे एकोणिसाव्या शतकांत जी कांही मूल्यविषयक चर्चा झाली, ती नुसती पुस्तकांतच किंवा विचारवंतांच्या डोक्यांतच राहिली. प्रत्यक्ष जीवनापर्यंत ती येऊंच शकली नाही. प्रत्येक उद्योग संस्कृतिवादी राष्ट्रांत थोड्या-फार प्रमाणांत हा प्रकार झाला आहे. राजकीय सत्ताधाऱ्यांना आपले राजकीय आसन अस्थिर आहे. तें स्थिर राहण्यास डोळ्यांत तेल घालून जपावयास हवें अशी जाणीव झाली. त्या स्थैर्य आणण्याच्या प्रयत्नांतून महायुद्ध आलें. त्याने मानवी समाजाला मूल्यात्मकीह जबरदस्त धक्का बसला. विशेषतः समाजाचा कनिष्ठ वर्ग जागृत होऊं लागला. त्याला आपल्या सामर्थ्याची व आपल्यावरील वर्चस्वाची जाणीव होऊं लागली. आणि बौद्धिक व जीवन कर्तृत्व...ध्येय, इ. क्षेत्रांत त्याचें आगमन झालें. त्याच्या दृष्टीने इतिहासाचें, संस्कृतीचें— सर्वच गोष्टींचें परिशीलन सुरू झालें. त्यामुळे 'मध्यमवर्गीय' वर्चास्वास धक्का बसला. अर्थातच त्याची मध्यमवर्गावर प्रतिक्रिया फार मजेची झालेली आहे.

**संभ्रमावस्था—**

पहिलें महायुद्ध सुरू झालें तें जगांतलीं युद्धें संपवण्यासाठी आलें, अशी समजूत व्हिक्टोरियन विचारांचा परिणाम झालेल्यांस वाटणें सहाजिक होतें, व मध्यमवर्गावर याच विचारांचा प्रभाव असल्याने त्याला पण तसेंच वाटलें. पण पहिलें युद्ध येऊन गेलें, तरी शांततेची म्हणून चिन्हे दिसेनात, असें जेव्हा आढळून आलें, तेव्हा मात्र या मध्यमवर्गाची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. एका बाजूला धर्माने शिकविलेली व मनावर ठसलेलीं मूल्यें, ह्यांचें आकर्षण दुसऱ्या बाजूस फ्रेंच राज्यक्रांतीने पुरस्कारिलेलीं आधुनिक मूल्यें पण तितकींच मोहक वाटलीं. कारण त्यांचा पुरस्कार त्या वर्गानेंच अट्टहासाने केला होता. समोर, दैन्य, दारिद्र्य, दास्य, यांनी गोठून कंगाल बनलेला, मनुष्यत्वाला मुकलेला असा व स्वतःच्या अस्तित्वासाठी प्राणपणाने लढण्यास जागृत झालेला सर्व साधारण समाज दिसला; पाठीमागून शास्त्रांची ( विज्ञान व समाज ) विलक्षण वेगाने होत असलेली वाढ पण त्याला लोटीत होती. शास्त्राने

दिलेली चिकित्सक बुद्धि पण धर्मप्रणित मूल्यांइतकीच आकर्षक वाटत होती. व अशा परिस्थितीत त्याच्यापुढे जीवनाच्या नव्या नव्या समस्या निर्माण होत होत्या, पण दुर्दैव असें की त्या सोडविण्याचे मार्ग इतिहासांत उपलब्ध नव्हते !

**बौद्धिक अराजकतेची पार्श्वभूमि—**

या सर्व परिस्थितींचा परिणाम असा झाला की, कोणत्याहि जीवित मूल्यांवरील...वा समाज-संस्थेवरील विश्वास उडाला. जिकडे तिकडे शंकेने पाहण्याची प्रवृत्ति बळावली, बुद्धिजीवनाला एक प्रकारें अराजकत्वाचें स्वरूप प्राप्त झालें. दोन महायुद्धाच्या दरम्यानची वैचारिक अवस्था अशाप्रकारची होती. त्यामुळे, स्वतःच्या मगदुराप्रमाणे कोठे तरी, आशास्थान शोधण्याचा प्रयत्न झाला. कित्येकांना धर्म पुनः आकर्षक वाटला, कित्येकांना इतिहासकालीन संस्कृति प्रभावी वाटल्या, कित्येकांना नुसतीच अशी जाणीव झाली कीं खरा प्रगतीचा कालखंड हा पुढेच आहे; अशा संभ्रावास्थेंत असतांच दुसरें महायुद्ध आलें...गेलें. तरीहि अस्थिरता, मूल्यांवरील अविश्वास...इ. प्रवृत्ति कमी झाल्या आहेत असें दिसत नाही.

१९२० नंतर इकडे जी परिस्थिति निर्माण झाली तींत साधारणपणें ह्या प्रकारचे प्रतिबिंब आपल्या विचारक्षेत्रांतहि पडलेलें दिसून येतें. तथापि राज्यकर्त्यांचें धोरण कडवें व विरोधी होत गेल्यामुळें प्रामुख्याने चिपळूणकरांचा आक्रमक राष्ट्रवादच वाढीला लागला. परंतु प्रागतिक विचार हा तितकाच जिवंत होता, हें दिसरून चालत नाही. हरिभाऊ आपटे, वा. म. जोशी, तात्यासाहेब केळकर, कोल्हटकर, यांचें लेखन जर तपासलें तर असें आढळून येईल कीं, यांच्या लेखनाचा आशय हा राष्ट्रवादी नसून प्रगतिशील उदारमतवादी—आहे. असें मान्य करावें लागेल. त्यांत रूढ अर्थाने रुक्ष, अनाकर्षक, अनादरणीय वाटणारा उदारमतवाद नसून, एका विशिष्ट मर्यादेपर्यंत या लोकांनी तर्कवादाचा आधार घेतलेला आहे असें आढळून येईल.

उदारमतवाद ( लिबरॅलिझम ) हा विचार आपल्याकडे उपेक्षेचा म्हणून गणला गेलेला आहे. याचें कारण राष्ट्रीय लढयाच्या आंदोलनांत आक्रमक असा सांकृतिक-राष्ट्रवाद वाढील लागला हें होय. व त्यालाहि ब्रिटीशाचें धोरणच

जबाबदार आहे. तथापि वाङ्मयीन विचारांचा आढावा घेतांना ह्या उदारमतवादाची उपेक्षा वा हेटाळणी करून भागत नाही. पुनरुज्जीवनवाद, बुद्धिवाद या सारखीच हीं विचारसरणी प्रभावी होती. आपऱ्याकडे ती बाह्यतः निष्प्रभ झाली असें दिसतें. तथापि आतांच उल्लेखलेल्या लेखकाचें लिखाण तपासलें तर असे आढळून येईल की या लेखकांचें अधिष्ठान ह्या उदारमतवादावर (चांगल्या अर्थानें) आधारलेलें आहे. एकोणीसाव्या शतकांतला इंग्लंडमधील तो मोठा विचार होता नि त्यांचें आपल्याकडे असें प्रतिबिंब पडले आहे. राजकीय क्षेत्रांत जरी तो अप्रभावी झाला तरी वाङ्मयीन क्षेत्राची बूज त्यानेच राखली आहे हें मान्य करावें लागेल.

तथापि १९३० नंतर इकडे नवी वैचारिक अवस्था निर्माण झाली व ती गांधीजींच्या शिकवणीने केली. एकोणीसाव्या शतकाचा वैचारिक आढावा घेतांना रस्किनचा उल्लेख मागे आलेला आहे. रस्किनने ज्याप्रमाणे युरोपीय उद्योगसंस्कृतीचें मानवी जीवनास प्रमाण मानून पुनर्मूल्यीकरण करण्याचा प्रयत्न केला त्याप्रमाणे गांधीजींच्या विचारधारेचा प्रयत्न आहे. रस्किनला गांधी स्फूर्तिदाता मानीत हें लक्षात धरण्यासारखें आहे. राजकारणांत नैतिक अधिष्ठान असावें हा गांधीजींच्या विचारसरणीचा आग्रह, तसेच, धानिक वर्ग हा राष्ट्राचा विश्वस्त आहे ही त्यांची कल्पना, इ. गोष्टीवरून गांधीजींचा भारतीय उद्योगसंस्कृतीचें पुनर्मूल्यकिरण करण्याचा होता असें स्पष्ट दिसतें. अहिंसेवर असलेला त्यांचा अतिरिक्त भर पाहिला म्हणजे भक्तिसंप्रदायाच्या चातुर्वर्ण्याच्या मान्यतेची आठवण होते. तो नि हा प्रयत्न सारखाच. त्यांना कृषिसंस्कृतीचें पुनर्मूल्यीकरण अभिप्रेत होतें तर गांधीजींच्या कालांत उद्योगसंस्कृति होती. गांधीजींच्याच बरोबरीने या बाबतीत टागोरांचें पण नांव घ्यावें लागेल. त्यांच्या गीतांजलींतील काव्याची आपला महाराष्ट्रीय कवि तुकाराम याच्या अभंगाबरोबर तुलना करून तुकारामाला श्रेष्ठ ठरविलें जातें. टागोर हे उद्योगसंस्कृतीचे प्रतिनिधि होते तर तुकाराम हा कृषिसंस्कृतीचा होता. अध्यात्मिक विचारांच्या दृष्टीने तुकाराम श्रेष्ठ असेलहि. पण टागोरांचा प्रयत्न हा उद्योग संस्कृतीचें पुनर्मूल्यीकरण करण्याचा होता. टागोरांच्या विचारांचें केंद्र मनुष्य

—मानवी जीवन—हा होता. तुकाराम हा पूर्णपणें अध्यात्मावर भर देणारा कवि होता.

परंतु ही पुनर्मूल्यीकरणाची चळवळ तिकडे चार-पांच दशकें चालली, उलट येथे इतिहास क्रमानुसार केवळ एक-दोन दशकें मिळाली. १९३५ चे सुमारास समाजवादी विचार आला. त्याने उद्योग संस्कृतीच्या बाहेर पडून जीवन मूल्यांचें परिशीलन करण्याची प्रथा सुरू केली, आपल्याकडे साहित्यांत, जीवनवाद, कलावाद या चळवळी १९२० चे पुढे झाल्या. त्यांचा पाश्चात्त्य देशांतील सांस्कृतिक विचारांशी असलेला हा अनुबंध ध्यानांत धरणें जरूर आहे.

मुद्रणोत्तर कालांत साहित्यक्षेत्राला कशी स्वायत्तता प्राप्त झाली, कसे निर-निराळे ' वाद ' त्या क्षेत्रांत निर्माण झाले तेंहि पण पाहिलें. सामाजिक राजकीय विचारांचा पडसाद कसा पडला हें पण लक्षांत घेण्यासारखें आहे. १९२० नंतर जी नवी संस्कृति जिचा उल्लेख येथे संयोजन—संस्कृति म्हणून केला आहे, ती जगातील विचारवंतांच्या विचारांस निरनिराळी चालना देऊं लागली व त्याबरोबर साहित्य-क्षेत्रांतहि नवें युग सुरू होण्याची परिस्थिति निर्माण झाली.

आपल्या कालाच्या साहित्याची ही पार्श्वभूमि आहे. आपल्या देशांतील विचार-प्रवाहांवर—व साहित्यावर ह्या परिस्थितीचे परिणाम घडल्याविना राहिले नाहीत. कारण शास्त्रांनी व त्यापेक्षा फार मोठ्या प्रमाणांत युद्धाने जग लहान लहान—केलें, व त्यायोगें देशादेशाची वैचारिक...परस्पर संबद्धता अधिक जोराने वाढीला लागली आहे.

: ५ :

**साम्यवादाचें आगमन—**

या सर्व कोलाहलांतून मार्ग काढण्याचें कार्य एका अत्यंत प्रभावी विचार-सरणीने केलें आहे. बौद्धिक व मानसिक विकासाचा खरा आढावा घ्यावयाचा असेल तर यापुढे त्या विचार सरणीचा परित्याग, अधिक्षेप किंवा उपेक्षा करून चालणार नाही. व ती विचारसरणी म्हणजे साम्यवाद-समाजवाद हा होय.

अर्थात् या विचारसरणीला विशिष्ट शास्त्रीय बैठक कार्लमार्क्सने दिली. त्यापूर्वी हा विचार जरी विचारवंतांस सुचला तरी, त्यांच्या विचारांत शास्त्रीयपणापेक्षा केवळ सत्प्रवृत्तीवरच जास्त भर होता. परंतु मार्क्सने स्वतःच्या कामगिरीनें त्या विचारसरणीला विशिष्ट तत्वज्ञानाचा चौथरा दिला. व त्यामुळे बुद्धिमंत वर्गास व नव्याने जागृत झालेल्या किंवा होत असलेल्या दलित, उपेक्षित वर्गास ती अत्यंत स्वीकारणीय वाटली. तसें वाटणें अपरिहार्य होतें...कारण त्या विचार-सरणींत एक प्रकारची गतिशीलता होती. ह्या विचारसरणीने काही जीवित-मूल्यें पुरस्कारलीं आहेत. परंतु त्यांचें अधिक सुस्पष्ट स्वरूप अद्यापपर्यंत प्रकट व्हावयाचें आहे. तीं अद्याप बनत आहेत. आज कोणतें आकर्षक मूल्य निर्माण झालें आहे ह्याचा उल्लेख पुढे येईलच. परंतु सर्व बुद्धिप्रधान जगांत एक प्रकारचें आशंकेचें दडपण असल्यानें व जीवन अत्यंत शीघ्रवाही असल्यानें निर्माण झालेलें मूल्य पण कित्येकांना, विशेषतः मध्यम वर्गास अपूर्ण किंबहुना अबोध वाटणें अपरिहार्य आहे.

**आजच्या साहित्याची धारणा—**

या शतकाच्या प्रारंभी जी सामाजिक परिस्थिति होती, तिच्यांत शिक्षणाचा लाभ सर्वांना देण्याचें राज्यसंस्थेनें मान्य केलें, व त्यामुळे सर्व साधारण व्यक्तीस

सुद्धा शिक्षणाचा फायदा घेणें शक्य झालें. गेल्या शतकांत कामगार जीवनविषयक सुधारणाची आवश्यकता वाटूं लागली त्यायोगें, त्यांचें पण जीवन थोडें सुधारून त्या वर्गांतून शिकलेला असा वर्ग बाहेर पडला. ही परिस्थिति आपल्याकडे १९२० चे पुढे आली. व हा वर्ग बहुसंख्य असल्याने, आणि या वर्गावर संस्कृतीचे संस्कार अल्प झाले असल्याने विशिष्ट प्रकारची सांस्कृतिक निष्ठा अशी त्याचे ठायीं आढळणें कठीण होतें. त्या वर्गांतून व मध्यमवर्गांतून साहित्यिकहि निर्माण होत होते झाले होते, व ह्या लेखक वर्गापुढे हा नुकताच जागृत झालेला व श्रेष्ठतम जीवितमूल्यें विशेषपणाने बाणलेलीं नसलेला असा हा वाचक म्हणून उभा होता. ह्या वाचकवर्गाला एकंदर कोणत्या विचारांचे विलोभन वाटणें शक्य आहे ह्याची पण त्याला कल्पना होती. व त्यामुळे जीविताचीं मूल्यें अर्धवट पटलेलीं असा व अर्धवट साशंक असा लेखकवर्ग, व जीवितास नुकतीच कोठें सांस्कृतिक समृद्धता येत असलेला वाचकवर्ग यांत अनुसंधान आणण्याचें अवघड कार्य साहित्यिकांना करावयाचें होतें. कारण एकंदर जीवनांत साहित्यास व साहित्यिकांस स्वतंत्र कर्तृत्वाचे दृष्टीने महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें होतें. व जीविताच्या समस्या पण अधिकाधिक अवघड व गुंतागुंतीच्या होत होत्या.

ही बदललेली व एका दृष्टीने अपूर्व अशी परिस्थिति, तिच्यांतून निर्माण झालेला वाचकवर्ग, ह्याची विशिष्ट मनोवृत्ति, व तिचें व्यक्तीकरण करणारा लेखकवर्ग, यांच्या क्रियाप्रतिक्रियांतून या कालच्या साहित्याचा जन्म झालेला आहे. व आपल्या कालच्या साहित्यांत जर कांही वेगळेपणा असा असेल, पूर्वसाहित्याचे रूपगुणांशी तुलना करतां जर कांही वैगुण्यें असतील तर त्यांची पार्श्वभूमि ही अशा प्रकारची आहे.

### आधुनिक साहित्य-संप्रदाय—

या पार्श्वभूमीचा परिणाम साहित्यांत असा झाला की साहित्यांत वेगवेगळ्या प्रणाली सुरू झाल्या व अभिव्यक्तीचे प्रयोग सुरू झाले. अशा प्रकारें आपलें साहित्य हें अशा प्रयोगावस्थेंत आहे असें म्हणावयास हरकत नाही. कारण साहित्यांची सर्वमान्य मूल्यें हीं धुळीस मिळालेलीं, जीवित मूल्यांविषयीहि आस्था बेताचीच, व साहित्याची आवश्यकता मात्र तीव्र आणि अबोध. तेव्हा

आपलें म्हणणें हे अधिकाधिक रसिकांना कळेल, त्यांना नाविन्यपूर्ण वाटेल अशी पद्धति, प्रकार, वा तंत्र लेखकवर्ग वापरूं लागला. वाचकवर्ग हा खूपच संमिश्र असल्याने एक विशिष्ट तंत्र किंवा गमक सर्व वाचक वर्गास अत्यंत आवडेल अशी परिस्थिति अर्थातच नव्हती. व या परिस्थितीत आपलें व्यक्तिमत्व हें चूर्णप्राय झालें आहे अशी जाणीव कला व वाङ्मय प्रांतांतील निरनिराळ्या कलावंतांस झाली. त्या वस्तुस्थितीवर मात करण्यासाठी, व ह्या वस्तुस्थितीचें व्यक्तिकरण करण्याचा त्यांचा अट्टहासानें प्रयत्न सुरू झाला. आजहि आहे. व यातूनच, प्रतीकवाद, ( सिंबॉलिझम् ) अभिव्यक्तिवाद ( एक्स्प्रेनिझम् ) अबोध-वाद ( सर रियालिझम् )...इ. आधुनिक साहित्यविषयक वा कलाविषयक संप्रदाय निर्माण झाले आहेत. ह्यापैकी एकाहि सप्रदायाला आनंद हें साहित्याचें एकमेव आदर्श मूल्य आहे असें मान्य नाही, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

**पुरोगामी साहित्याची चळवळ—**

आज सारें जग झपाट्यानें समाजवादी रचनेकडे व विचारांकडे आकर्षिले जात आहे. साहित्यांत पण त्याचा अविष्कार होणें हें अपरिहार्य आहे. ह्या कोलाहलांतून या जीवनसमस्या सोडविण्यास अधिकाधिक मदत करणारी अशी विचारसरणी म्हणून बुद्धिमंत वर्गानें त्या विचारसरणीची कास धरावी यांत नवल तें कसलें ? ह्या विचारसरणीचें साहित्यांतलें प्रतिबिंब म्हणजे पुरोगामी साहित्याची चळवळ. ही चळवळ निरनिराळ्या प्रगतीच्या अवस्थेत असणाऱ्या जगातील बहुतेक सर्व देशांतून झालेली आहे...परंतु एकंदर परिस्थिति अशी आहे की, या विचारसरणी विषयी सुद्धा कांही गटास शंका कुशंका येतात.

कारण आजच्या ज्येष्ठ साहित्यिकाच्या पिढीनें—धर्मादर आधारलेलीं धर्म—सत्य...नीति...इ. मूल्यें धुळीस मिळालेलीं पाहिलीं. त्याचप्रमाणे नंतरच्या पिढीने फ्रेंच राज्यक्रांतीने घुसळून वर काढलेल्या स्वातंत्र्य समतादि—मूल्यांची वासलात लागलेली पाहिली आणि आज हीं सर्व मूल्यें लोखंडाच्या कढईत वितळत पडल्याप्रमाणें पडली आहेत...ह्या अनुभवाने जी भग्नता आली आहे तिच्या पोटीं साहजिकपणें विचारवंत लेखक, कलावंत...यांस वाटूं लागलें आहे कीं, नवीं मूल्यें जरी मानलीं तरी ती अशीं आभासमय ठरणार नाहीत

ना ? अल्पकालांत तीं खोटीं ठरणार नाहींत ना ? व अशा संमूढावस्थेंत असलेल्या मध्यमवर्गांतूनच फॅसिझम व तत्सम चळवळी वाढीस लागल्या किंवा लागत आहेत.

**नवें मूल्य मानवता—**

परंतु समाजवादाविषयीं आकर्षण असो वा नसो, फ्रेंच राज्यक्रांति-प्रणित मूल्यांवर विश्वास असो वा नसो...साहित्यिकांना, कलावंतांना आज स्वतःच्या कार्यासाठीं नवें असें मूल्य असणें आवश्यक आहे. या त्यांच्या जरूरींतून व उद्रेकांतून, आजपर्यंतच्या अनुभवांतून निघालेल्या सर्व मूल्यांचा समावेश करणारें असें मूल्य असणें जरूर आहे. असें मूल्य सांस्कृतिक क्षेत्रांत आज मानतों आहोंत, पुढेंहि दीर्घ काल तें मानावें लागेल. असें सर्वसंग्राहक, सर्वकष व गतिशील मूल्य म्हणजे ' मानवता ' हें होय. व आपल्या काळाचें साहित्य त्याच्या विभिन्नतेंतून ह्या एका जीवितमूल्याची उपासना करीत आहे असें स्पष्टपणें दिसून येईल.

मानवता हें मूल्य मध्यमवर्गाच्या विशिष्ट परिस्थितींतून वा मनोरचनेंतून निघालेलें नाहीं. तें निर्माण करण्यांत समाजांतील दलित पतिताचा तितकाच हातभार आहे. त्या सर्वसाधारण समाजाचें जीविताचें मूल्य तें आहे. या वर्गास कोणत्याहि समाजावयवाची पिळवणूक करावयाची नसल्यानें, व आजपर्यंत स्वतःच्यावर झालेल्या अन्यायाचें परिमार्जन करण्याची भूमिका असल्यानें हें जें मूल्य आहे, त्यांत आभासाचा भाग कमी आहे. मानवतेचें हें मूल्य पूर्णपणें नवें आहे अशांतला भाग नाहीं. धर्माच्या शिकवणींत ह्या मूल्याचा समावेश झालेला आहे. परंतु धर्मप्रधान संस्कृतीचें केवळ अनुषंगानें ह्याचा पुरस्कार केला आहे. कटाक्षानें ह्या मूल्याचा अंमल करणें करविणें हें गुलामगिरी अभिप्रेत असलेल्या धर्म–प्रधान संस्कृतीस जमणें शक्य नाहीं. म्हणून 'सर्वेंनः सुखिनः संतु' असा उदात्त विचार आपल्याकडील समृद्ध संस्कृतीनें प्रसृत केलेला असला तरी तिला हें कार्य सक्षेपानें करण्याची आवश्यकता वाटलेली नाहीं. व त्यामुळें त्या विचारास केवळ ' सदिच्छा ' म्हणून महत्त्व द्यावयास हवें. उद्योग प्रधान संस्कृतीनें सुद्धा स्वातंत्र्य, समता, हीं मूल्ये स्वतःचे सांस्कृतिक समाधानासाठीं

निर्माण केलीं, तरीहि त्या मूल्यांचें कटाक्षाने परिपालन करणें त्या संस्कृतीस सुद्धा शक्य नव्हतें. कारण विशिष्ट प्रकारच्या पिळगुकीवर व व्यक्तिगत कर्तृत्वावरच तिचें अधिष्ठान होतें...व त्यामुळे त्या संस्कृतीच्या विचारधनांत हा सूर कोठे तरी लुप्त होऊन जातो, व व्यक्तिनिष्ठेचाच बडेजाव स्पष्टपणें ऐकूं येतो. आपल्या कालांत ही नवी—आपल्या भारतीय भाषेंत आपण 'शूद्र' संस्कृति—म्हणूं या—ह्या संस्कृतीनें आपलें म्हणून हें जें नवें मूल्य पुरस्कारलें आहे. त्यांत अशाप्रकारें आभासाचा देखाव्याचा भास असण्याचें कांहीच कारण नाही. त्याशिवाय हें मूल्य कोणत्याही असंतुष्ट समाजगटापुढे टाकण्यासाठी स्वीकारण्यांत आलेलें नाही. व त्या योगेंच त्या जीवनमूल्याचा पुरस्कार केला असतां विफलतेचा संभव राहणें शक्य नाही. शिवाय त्या मूल्यांत उपरिनिर्दिष्ट श्रेष्ठ जीवितमूल्यांचा साक्षेप व सादर समावेश केल्याने ऐतिहासिक महत्त्व सुद्धा त्या मूल्यास अधिक आहे.

**संस्कृति आणि मानवता—**

मानवी संस्कृतीच्या आजच्या अवस्थेंत मानवता हें मूल्य कसें निर्माण झालें त्याचें आतांपर्यंत विवेचन केलें. पहिल्या भागांत वर्णिलेल्या तीन संस्कृतीच्या परिभाषेंत बोलायचें झालें तर कृषिसंस्कृतीने धर्मप्रणित मूल्यांची जोपासना केली आणि परमेश्वराला प्रमाण मानलें. उद्योग संस्कृतीने समता स्वातंत्र्यादि मूल्यांची जोपासना केली आणि व्यक्तीत्वाला व्यक्तिस्वातंत्र्याला—प्रमाण मानलें. संयोजनसंस्कृति मानवतेचें एकमेव मूल्य पाळणार आहे, आणि मानवी जीवित हें प्रमाण मानीत आहे, मानणार आहे. कारण संयोजनाचा अंतिम हेतु मानवी जीविताचें श्रेय व साफल्य हाच राहाणार आहे. युगायुगांतून साहित्य ह्या संस्थेने युगाला अभिप्रेत असणाऱ्या मूल्यांचा पुरस्कार आहे. आणि त्याच नियमानुसार आपल्या कालच्या साहित्याने मानवता ह्या एकमेव मूल्याची पूजा करावयास हवी. मानवतेच्या मूल्याप्रत आपण कसें आलों आहोंत हें येथील विवेचनावरून स्पष्ट व्हावयास हरकत नाहीं.

संस्कृति हा शब्द या ठिकाणीं ज्या विशिष्ट कालिक अर्थानें वापरलेला असें प्रारंभीं म्हटलें आहे त्यांतील आशय आतापर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट होईल.

तथापि संस्कृति हा शब्द आपल्या कडे जरा निराळ्या अर्थाने वापरला गेला आहे, जातो, व म्हणून त्या ठिकाणीं अभिप्रेत असलेली संस्कृतिसंबंधाची भूमिका पुन्हा एकदा स्पष्ट करणें आवश्यक आहे असें वाटतें. त्या भूमिकेवरून नव्या मानवता ह्या मूल्याचें योग्य दर्शन वा आकलन होण्यास मदत होईल.

**संस्कृति संबंधी रूढ कल्पना—**

संस्कृति हा शब्द आपणांकडे प्रामुख्यानें प्रादेशिक अर्थानें उपयोगांत ( उ. भारतीय, चिनी इ. ) आणला जातो. कधीं पाश्चात्य, पौर्वात्य, अशा दिशा-वाचक संकेताने उपयोजला जातो. पण त्यांतील आशय हा प्रादेशिकच असतो. संस्कृति या शब्दामागे वास्तविक रीतीने अध्यात्मिक ( उच्च ) व भौतिक अशा दोनहीं प्रगतींचा समावेश होतो. आधुनिक कालांत विज्ञान–संस्कृतीचा स्वीकार करून आपण फक्त ॲटम ( वा हैड्रोजन ) बॉंब पर्यंत मजल गाठलीं एवढेंच दाखविलें जातें. पण या ठिकाणीं पाहिल्याप्रमाणें या भौतिक प्रगति-बरोबरच आपण पूर्णपणें अधिदैविक व अध्यात्मिक अशा मोक्ष, निर्वाण...... इ. पासून तों मानवनिष्ठ अशा मानवतेपर्यंत आपण प्रगती केली आहे. तिच्याकडे दुर्लक्ष करणें हें कांहीं योग्य नव्हे. परंतु तें होतें तेव्हां अशा व्यापक अर्थानें संस्कृति हा शब्द व संकेत येथे उपयोजिला आहे.

भौतिक व अध्यात्मिक या दोनहीं प्रगतीच्या बाबतींत गेल्या हजार वर्षांत आपण ( राष्ट्र म्हणून ) काही फारशी भर जागतिक संस्कृति-धनांत घातलेली नाहीं––किंबहुना जी घातली असेल ती टिकून राहिलेली नाहीं,–व म्हणून त्याबाबत आपणांस मुग्धताच स्वीकारणें प्राप्त होतें. परंतु अंतर्मनांत ती रुखरुख राहतेंच. आणि मन संस्कृतींतल्या भौतिक प्रगतीला हीन लेखण्याचा आपण प्रयत्न करतों. व संस्कृति म्हणजे अध्यात्मिक प्रगति, असा आपणांस सोयीस्कर असा संकेत कल्पून मग तत्संबंधी विवेचन सुरु होतें. मग यूरपची संस्कृति ही केवळ भौतिक म्हणून ती निश्चितपणें कमी प्रतीची आहे असें गृहित धरलें जातें. पुढे पुढें अध्यात्मिक प्रगतीवर व त्या प्रकारच्या श्रेष्ठतेवर येवढा अतिरिक्त भर दिला जातो की नकळत भौतिकाकडे तिरस्कारानें पाहण्याची प्रवृत्ति होते. व शेवटी असा आपला ग्रह होतो की, उच्च वा उन्नत

असे व्यक्तिगत गुण हे समाज परिस्थिति—निरपेक्ष आहेत. म्हणजे समृद्ध विकास-शील अशा भौतिक व सामाजिक परिस्थितींतून त्यांचा उद्गम झालेला आहे. व त्या परिस्थितींत खूप काल कंठल्यामुळें ते वर्धमान झालेले आहेत, ही वस्तुस्थिति साफ विसरून जातों. असे ' सुसंस्कृतता ' प्राप्त करुन देणारे गुण म्हणजे, सहिष्णुता वा उदारमतवाद, कर्तव्य-प्रीति, बांधवप्रेम, स्वावलंबन, कलाप्रेम, उन्नत विचारांबाबत आस्था वा निष्ठा, परोपकार, चारित्र्य, दया, सत्यप्रेम, अहिंसावृत्ति, अक्रोध, न्यायप्रेम इ. इ. होत. या गुणांची शिकवण ' भारतीय ' संस्कृतीने आपणांस दिलेली आहे असा आपला विश्वास असतो, व आपण ही शिकवण विसरलों म्हणून आपला अधःपात झाला, तेव्हा पुन्हा या गुणांना प्राधान्य देऊन ते अंगीं बाणण्याचा प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे. ह्या गुणांचे योगाने आपण ' भारतीय ' संस्कृतीचा मोठेपणा, वा कीर्ति टिकविणार आहोंत, असा आपला सांस्कृतिक उन्नती संबंधीचा मनोदय असतो.

**ह्या गुणांमागील परिस्थिति—**

हे गुण श्रेष्ठ आहेत हें निर्विवाद आहे. हे सर्व वा यापैकीं बरेच अंगीं असणारांना ' सुसंस्कृत ' म्हणावयास प्रत्यवाय नाही. ह्या गुणांचा अवलंब करणारांना व्यक्तिगत शांति, समाधान मिळेल, मान सन्मानहि मिळेल. तथापि सामाजिक अवनतीचें विवेचन करतांना केवळ ह्या विचारावर स्थिर होणें हें योग्य नव्हे. तें अप्रबुद्धपणाचें म्हणवत नसेल तर हतबुद्धतेचें द्योतक ठरेल. हे ' गुण ' विशिष्ट समृद्ध सामाजिक परिस्थितींत निर्माण झाले वाढीला लागले, व अशी परिस्थिति जर आपण निर्माण करूं शकलों तर हे 'गुण' वाढीला लागतील असा विश्वास बाळगावयास हरकत नाही. तेव्हा व्यक्तिगत गुणांवर भर देण्यापेक्षा परिस्थितींतील अवनतीला नेणारीं बीजें कशीं काढतां येतील इकडे लक्ष द्यावयास हवें.

उदाहरणार्थ ' काळा बाजार करणें ' त्याला उत्तेजन देणें हें वाइट आहे, पाप आहे, नीच कर्म आहे, असें सांगणें हें सर्वस्वी योग्य आहे. व याप्रमाणें सर्व लोक वागत गेले तर काळा बाजार अप्रभावी होईल हेंहि पटतें. तथापि अधिक खोलवर विचार करणारा म्हणेल हें सर्व ठीक आहे, पण ' काळा

बाजार ' नाही अशी समाज परिस्थिति आपणांस नाही का निर्माण करतां येणार ? काळ्या बाजाराकडे नेणारी आर्थिक परिस्थितीतील अवनतीची बीजें नाहीं का नष्ट करतां येणार ? या दृष्टीने विचार करायला लागलें की खूप खोलांत शिरावें लागतें, मग 'क्रांतिकारक' (?) निर्णय सुचतात व त्यांचा अवलंब करण्यास बद्धपरिकर झालेला समाज-प्रवाह जर जोरदार असेल तर त्यांची अंमलबजावणीहि होते, होईल व मग साहजिकपणें काळा बाजार नष्ट होईल. सर्व समाज एका नव्या व उन्नत पातळीवर जाऊं शकेल.

सांस्कृतिक विचारांचेंहि तसेंच आहे. वर उल्लेखिलेले गुण व्यक्तिगतरीत्या अंमलांत आणण्याचा प्रयत्न करणें हें चुकीचें नव्हे पण अपूरें आहे. त्यांतील अपूरेपणा घालविण्यासाठी अधिक मुलभूत दृष्टीने पाहावें लागते.—' संस्कृति ' कडे पाहतांना ती दृष्टी स्वीकारली आहे. हें येथील विवेचनावरून कळून येईल.

**ह्या गुणांची सार्वदेशिकता--**

शिवाय वर सांगितलेले मानवी गुण हे कांहीं कोणत्या एका देशापुरते नव्हत. किंबहुना कोणत्या एका देशांत त्यांचा उद्भव झालेला आहे असेंहि नव्हे. विशिष्ट संस्कृती अवस्थेंत जवळ जवळ सर्वच देशांत ते निर्माण झालेले आहेत. मग साहजिकच शंका येते की, केवळ आपल्या देशाने या गुणांचा पुरस्कार केला आहे असें म्हणण्यांत आपण नसता अहंकार तर पोसून वाढीला लावीत नाही ना? त्या त्या संस्कृती अवस्थांमधली निरनिराळ्या देशांतली उदाहरणें या ठिकाणीं मधून मधून दिलीं आहेत.

या गुणांचा आविष्कार वा पुरस्कार हा साहित्यांतून झालेला आहे, होत राहणार आहे. ह्या गुणांचा साक्षात्कार मानवी बुद्धीला होणें व त्यांपैकी काहींना जीवितमूल्यें म्हणून अतीव महत्त्व प्राप्त करण्याचा आग्रह धरणें हा मानवी प्रज्ञेच्या भव्यपणाचा भाग आहे. तथापि हीं मूल्यें ' सनातन ' 'अंतिम' ' त्रिकालातीत ' आहेत, हा जो आग्रह मधून मधून डोकावतो तो योग्य नव्हे. ह्या ठिकाणच्या विवेचनावरून हें स्पष्ट होईल.

**मनहि गतिशील आहे—**

जशी समाज परिस्थिति गतिशील आहे तसें मानवी मनहि गतिशील आहे.

व म्हणूनच या ठिकाणीं दिलेली एक जीवित–मूल्यांची उपपत्ति संभवली आहे. मानवी मनाचा अचल असा कांहीं भाग आहे. कधींहि न बदलणारे असे कांहीं भाव आहेत व साहित्य हें त्या 'अचल' अशा भावांच्या (भावनांच्या) आविष्करणांतून संभवतें असा फार मोठा प्रवाह साहित्यक्षेत्रांत रूढ आहे.

परिस्थितीनुरूप मानवी मनातहि फरक घडत असतो. हें येथे गृहीत धरावें लागलें आहे. व्यक्तिगत जीवनांत माणसांच्या भावना उदात्त होत असतात. (तसा प्रयत्न असला तर,) असें गृहीत धरलें तर मग ह्या उदात्तीकरणांचा प्रक्रियेंत मनांत बदल संभवत नाही काय ? सामाजिक मनाचें सुद्धा तसेंच आहे व तोच विचार प्रामुख्याने येथे मांडला आहे.

कृषि संस्कृतीची धारणा व मूल्यें उद्योग संस्कृतीची धारणा व मूल्यें व नव्या संस्कृतींची (संयोजन) धारणा व मूल्यें हीं भिन्न आहेत; ह्या तीन संस्कृती म्हणजे मानवी संस्कृतीच्या तीन अवस्था होत हे पहिल्या विभागांत पाहिलें आहे. साहित्याचे द्वारें ह्या संस्कृतींची मूल्यपरंपरा कसकशी बनलीं. व या मूल्यांचे आधारें साहित्य कसें बनले हें नंतर पाहिलें व शेवटीं मानवतेप्रत कसे आलोंत याचा मागोवा घेतला.

आज—

आपल्या देशांत आज जें युग नव्याने सुरू होत आहे, त्यांत साहित्यविषयक स्वरूप कसें असावें वा असेल याची कल्पना येण्यासाठी, एकंदर जागतिक विचारधनांच्या आधारें, जीवित-मूल्यांच्याद्वारें, साहित्यविषयक कार्याचा खुलासा केला. व प्रत्येक युगांत वा संस्कृतीत साहित्याचें कार्य व क्षेत्र कसें बदलत व व्यापक होत आलें आहे ह्याचा ऐतिहासिक दृष्टीने उहापोह केला. आज साहित्याकडे आपण केवळ विलासीनतेच्या आविष्काराचा मार्ग वा भाग म्हणून पाहात नाही. ती आपली जरूरी आहे. विशेषतः आपल्या ह्या कालांत साहित्याला फार मोठी कामगिरी करावयाची आहे. साहित्य म्हणजे सांस्कृतिक वा भौतिक 'राष्ट्रीय' भव्यतेचा किंवा श्रेष्ठतेचा आविष्कार करणारें एक अंग, अशा दृष्टीने त्याच्याकडे पाहूं शकत नाही. धर्मसंस्था आज सामाजिक शक्ति म्हणून

नामशेष झाली आहे. तिला कोणी वाचवूं शकत नाही ती इतिहासांत जमा झाली आहे असें तिने केलेल्या कामागिरीबद्दल आदर ठेवूनहि म्हणावेसें वाटतें. राज्यसंस्था ही आजची जास्तीत जास्त व्यापक समाजसंस्था. पण तीहि संक्रमणावस्थेंत आहे. तिचें ठायीं जें सामर्थ्य केंद्रित झालें आहे त्यायोगें ती भ्रष्ट होणें शक्य आहे. व तिच्या ठायींची ही भ्रष्टता नष्ट करण्यासाठीं आपण आज लोकशाहीचा निष्ठेने पुरस्कार करीत आहोंत वा आलों आहोंत. सांस्कृतिक क्षेत्रांत राज्यसंस्थेला कांही उज्ज्वल असें भवितव्य उरलेलें आहे असें दिसत नाही.

## पूर्व संस्कृतीचा वारसा—

आज आपण आशियावासी लोक प्रथमच निरनिराळ्या प्रकारच्या दास्यांतून मुक्त होत आहोंत. आपल्या प्राचीन संस्कृती फार भव्य व दीर्घजीवी असल्याने आणि विशेषतः त्यांचा वारसा आपणांप्रत आलेला असल्याने आपल्या मनावर तें फार मोठें दडपण आहे. उद्योगप्रधान संस्कृतीशी आपला संबंध सक्तीने व अर्धवट आलेला आहे, आणि अशा परिस्थितींत, आपण आपल्या निरनिराळ्या सांस्कृतिक संस्थांचें परिशीलन करून त्यांची मूल्यें, ध्येयें, कार्यें ठरवून घ्यावयास हवीत. त्या दृष्टीने आपल्या संस्कृतींत साहित्याचें कार्य कोणतें, स्थान कोणतें, याची रूपरेषा देणें अयोग्य होणार नाही असें वाटतें.

## साहित्याचें आजचें ‘कार्य’—

उद्योग संस्कृतीने जगाला संपन्नहि केलें व कंगालहि केलें, उलट धर्मसंस्कृतीने जगाला अध्यात्मिक श्रेष्ठतेचें महत्त्व पटविलें, व अज्ञानीहि ठेविलें. हा जो विरोध राहात आला आहे त्याचें कारण, एक प्रकारचा सामाजिक न्याय धर्म संस्कृति प्रस्थापित करूं शकली नाही, व प्रबल राज्यसंस्था करून घेऊनहि सामाजिक सुरक्षितता ही उद्योग-संस्कृति निर्माण करूं शकली नाही. हीं दोन्ही महान कार्यें करण्यावर आपला रोख आहे, असावयास हवा. अशा परिस्थितींत मनुष्याच्या मनास कांही शिक्षण द्यावयास हवें, तशी आवश्यकता निर्माण झालेली आहे, असें कित्येकांचें मत आहे. व तें पुष्कळसें सत्य आहे यांत प्रत्यवाय नाही. परंतु त्या विचाराबरोबर कित्येक जण असें म्हणूं लागले आहेत की,

माणसाला शिक्षण देऊन सत्प्रवृत्त करण्याचें काम धर्मसंस्थेने केलें, तेव्हा तिचें पुनरुज्जीवन करा. हा विचार उद्योगसंस्कृतीने ज्या ठिकाणीं फार उत्पात घडवून आणला आहे, व जीं राष्ट्रें संयोजन संस्कृति प्रत येऊं शकत नाहीत त्या पाश्चात्य, देशांत जीव धरीत आहे. आणि त्यामुळे आपण आपल्या धर्म-प्रधान संस्कृतीचा भलताच कैवार घेऊन त्याच विचारांचा उदोउदो करावयास प्रवृत्त झालेलों आहोंत असें दिसतें. आपल्या धार्मिकतेवर बेहद्द खूष आहोंत. निदान ती आपल्याला आदरणीय वाटतें. हें खास. परंतु हें लक्षांत घ्यावयास हवें कीं, धर्मसंस्था आता पुनरपि सामाजिक शक्ति म्हणून पुनरुज्जीवित होणें शक्य नाही. तिने उच्चैतरः जीवित मूल्यांचें महत्त्व सर्वसामान्य मानवी मनावर ठसवलें हें खरें, परंतु त्याही गोष्टीला वाजवीपेक्षां अधिक महत्त्व देतां कामा नये. कारण धर्माचा दावा 'सर्वज्ञ'तेचा आहे. तो आपणांस मान्य होणें अशक्य आहे. तो काढून टाकून धर्म–संस्था स्वीकारा असें म्हणणें हें दौर्बल्याचें प्रतीक आहे. शिवाय ह्या सांस्कृतिक मूल्यांच्या बाबतीत धर्म संस्कृति व उद्योग संस्कृति असें गृहीत धरून आल्या आहेत कीं, कितीहि प्रचंड फेरफार झाले तरी माणसाचें मन हें सदैव सारखेंच न बदलणारें आहे. मनांतील कांही भाव हे सनातन आहेत. व ह्या भावांना आवाहन करण्याच्या धर्मसंस्थेचा प्रयत्न होता. परिस्थिति व मानवी मन ह्या दोन्ही गतिशील आहेत, व एक स्थिर आहे दुसरी गतिशील आहे हें म्हणणें योग्य नाही. जितक्या वेगाने परिस्थिति बदलते तितक्याच वेगाने मनांत बदल होत आहेत.

### साहित्य ही पोकळी व्यापूं शकेल—

अल्पविकसित व कमी गुंतागुंतीच्या अशा समाज–व्यवस्थेंत धर्म संस्थेला महत्त्व फार असावें यांत नवल नाही. आज विज्ञानशास्त्रें तत्त्वज्ञान–यांचे द्वारां ज्ञानाची उपासना चालू आहे. जीवित अधिक भव्यतर, भरीव व समृद्ध करण्याची जबाबदारी, कार्य समाजशास्त्रें व राज्यसंस्था यांवर आपण सोंपविलें आहे. शिक्षण देण्याचें कार्यहि शिक्षण–संस्थेने राज्य संस्थेच्या साहाय्याने स्वीकारलें आहे. हीं सर्व कार्यें व समाजनियंत्रणाचें काम पण धर्मसंस्कृतींत धर्माचे आधारें होत असे.

त्यांचें विभक्तिकरण कसकसें होत गेलें, व जीवन प्रवाहाबरोबर नवीन कार्यासाठीं नव्या संस्था व नवे वर्ग कसे पुढे आले आहेत याचा उलगडा आतापर्यंत झालेला आहेच. साहित्याचें मूळसुद्धा धर्मसंस्थेंतच आपणास सापडलें आहे. तेव्हा या विभक्तीकरणांत साहित्यावर कोणतें कार्य किंवा जबाबदारी आली आहे हें पाहणें जरूर आहे. बौद्धिक जीवनांत धर्मसंस्थेने निरनिराळ्या उज्ज्वल जीवितमूल्याचा पुरस्कार केला आहे. धर्मसंस्थेची ही शिकवण सर्वसाधारण समाजाच्या अंतरंगात खोलवर गेली आहे, व त्याचा परिणाम त्याचें मन खऱ्या अर्थाने 'सुसंस्कृत' होण्यात झाला आहे. हें तिचें मोठें कार्य आहे. धर्मसंस्थाही सामाजिक शक्ति म्हणून नष्ट झाली. तिची जागा निरनिराळ्या शास्त्रांनी व समाज शाखांनी घेतली. पण हें जे मनाला उन्नत करण्याचें कार्य आहे तें कोणी घेतलें नाही तर एक मोठी पोकळी निर्माण होणार आहे. किंबहुना ती होत आहे व ती भरून काढण्यासाठी धर्मांचें पुनरुज्जीवन करावें, असा उपाय कित्येकांना सुचत आहे. परंतु अशा तकलुपी विचारसरणीचे मागे लागता उपयोगी नाही. कारण एकदा एका कार्याकरितां निर्माण केलेली संस्था मानवसमाज कधीहि परत स्वीकारीत नाही, असा इतिहासाचा कौल आहे. 'पुनरुज्जीवनाचा' यत्न हा एका दृष्टीने स्वप्नाळूपणा व दुबळेपणा होय. जीवितमूल्यें सर्वसाधारण समाजाचे मनावर बिंबविण्याचें कार्य आज साहित्याने साक्षेपाने स्वीकारावयास हवें; असें या विवेचनाचे आधारें सुचवावयाचें आहे; व त्यासाठी एवढा ऐतिहासिक स्वरूपाचा उहापोह करावासा वाटला. इतक्या व्यापक दृष्टिकोणांतून निदान लेखक व कलावंतानी तरी साहित्याकडे पाहावयास हवें. त्या दृष्टीने व्यक्तित्वाकडेसुद्धा पाहणें आवश्यक आहे. आजचें व्यक्तित्व—समाज निरपेक्ष अहंतापूर्ण—स्वार्थी व्यक्तित्व नव्हे, तर समाजाचा एक अवयव व त्याच्या आशा आकांक्षेचा एक भाग, अशी जाणीव असलेलें व्यक्तित्व, हें नवें व्यक्तित्व आहे, व याच्याच द्वारें मानवतेच्या मूल्याची सेवा होणें शक्य आहे.

### नवी समता, नवा भ्रातृभाव—

व्यक्तित्वाप्रमाणेच समता आणि भ्रातृभाव यांची परिस्थिति आहे. कृषिसंस्कृतींत समतेचें क्षेत्र एका देवाच्या पूजकांपुरतें, वा एका धर्माच्या अनुयायां-

पुरतें मर्यादित होतें. बाह्यांतरीं सामाजिक भासणारी परंतु सारी अध्यात्मिक असणारी अशी ती समता होती. उद्योग संस्कृतीने सामाजिक व राष्ट्रीय समतेची कल्पना पुरस्कारिली. याही बाबतीत असें म्हणतां येतें की, बाह्यत: सामाजिक राष्ट्रीय वाटणारी ' समता ' ही खरी ' वर्गीय ' च राहिली. मध्यम वर्गाने ह्या समतेचा पुरस्कार केला, पण तीत कनिष्ट वर्गाचा समावेश करून घेण्यास त्याचा विरोध होता. या पुढच्या काळांत खरी सामाजिक समता व भ्रातृभाव निर्माण होणार आहे. नव्या संस्कृतीला या भ्रातृभावाने एक प्रकारचें सामर्थ्य व भव्यत्व प्राप्त होणार आहे, होत आहे. तिच्या कर्तृत्वाचा तो आधारस्तंभ राहाणार आहे. यावरून आजपर्यंतच्या उन्नत मूल्यांचें समावेशक असें हें नवें मूल्य कसें आहे याची कल्पना येईल.

आपल्या युगाचें ' मानवता ' हें अत्यंत उज्ज्वल असें जीवितमूल्य आहे. धर्म, राष्ट्र, व्यक्ति-स्वातंत्र्य, यांच्या पुढचें तें मूल्य आहे. इतिहासकालांत विशिष्ठ युगांत या मूल्यांनी मानवतेची सेवा केली आहे. तथापि कालाच्या ओघांत त्यांची मानवनिष्ठा थांबली; तीं स्वयंनिष्ठ झाली. आणि त्यामुळें त्या कालांत त्यांचेकडून मानवतेची सेवा होण्यापेक्षा उपहासच झाला आहे. तसा प्रकार मानवतेच्याबाबत होण्यासारखा नाही.

कृषिसंस्कृतीत राज्यें ही धर्मप्रधान होती, उद्योगसंस्कृतींत, राज्य व राष्ट्र यांचें जवळ जवळ अविभाज्यत्व प्रस्थापित झालें. संयोजन संस्कृतीत राज्यें वा राष्ट्रें ही मानववादी (सिक्यूलर) राहणार आहेत. आपल्या राष्ट्राने त्या बाबतींत मोठा टप्पा गाठला आहे. तथापि, हा विचार अद्याप लोकांच्या अंतरंगाप्रत जावयाचा आहे. व्यक्ति हा मानवतेचा उदात्त विचार घरोघर आणि व्यक्तीप्रत नेण्याचें अत्यंत मोलाचें व भव्य कार्य साहित्याला आपल्या युगांत करावयाचें आहे.

आपल्या कालाचें साहित्य-मूल्य मानवनिष्ठ-मानवता हें असणार आहे. ह्या मानवनिष्ठेपर्यंत आपण कसें आलोंत तें साहित्याच्या आधारें येथें पहावयाचे होतें.

**समाजवादी मानवता—**

स्वातंत्र्य प्राप्त झाल्यानंतर जें नव्याने आपण आपल्या देशाचें जीवन घडवि-णार आहोंत, त्यासाठी आपल्या कांही निष्ठा निश्चित करणें आवश्यक आहे. अशा निष्ठामध्ये आजच्या आपल्या अवस्थेंत अतीव महत्वाची अशी निष्ठा मानवता ही आहे. ही मानवता धर्मप्रणित नाही, व्यक्तिप्रणित नाही, तर समाजवादी अशी आहे. मानववाद (सिक्युलियारिझम्) हा आजच्या युगाचा नव्या संस्कृतीचा नवा व जिवंत व आतापर्यंत झालेल्या मूल्यविषयक प्रगतीचा समावेशक असा विचार आहे. ती आपल्या नव्या राष्ट्रीय जीवनाची एक—एकमेव म्हटलें तरी चालेल— निष्ठा आहे, एक मूल्य आहे. संस्कृति-विकासाबरोबर या अवस्थेप्रत आपण आलो आहोंत. साहित्याने— ह्याच मूल्याची जोपासना करावयास हवी. त्याच आधारें उन्नत, श्रेष्ठ अभिजात साहित्य निर्माण होणार आहे. हा नवा विचार मानवसमाजांतल्या सर्वसाधारण व्यक्तीच्या मनाप्रत जाण्यास, तिच्याठायी त्याच्याबद्दल आत्यंतिक चाड निर्माण करण्यास साहि-त्यानेच बद्धपरिकर व्हावयास पाहिजे. या उच्च मानवतेचे थोर असे दोन महापुरुष, पुरस्कर्ते आधुनिक युगांत आपल्या राष्ट्रांत झालेले आहेत. एक गांधीजी व दुसरे पंडित नेहरू. त्यापैकी समाजवादी संस्कृतीला नेहरू हे बरेच जवळचे आहेत. व समाजवादी-संयोजन-संस्कृतीला मान्य असलेला मानवतावाद त्यांना मान्य आहे असें दिसतें.

हें जीवितमूल्यांचें पूजन हेंच साहित्याचें कार्य, ही जाणीव स्पष्टपणाने कला-वंतांच्या मनावर झाली तर आजच्या काळांतही 'महाकाव्य' शक्य आहे. कारण महाकाव्यासारख्या लेखनास विशाल जीवननिष्ठा व मूल्याबद्दल आदर हाच आवश्यक आहे. व तो ज्या कलाकाराजवळ आहे त्याला सर्व शक्य आहे, व्यक्तीनी ही स्वयंपूर्ण न मानतां मानवसमाजाचा अंश म्हणून तिच्याकडे पाहाणें, व तिच्या, बुद्धि, भावना, आकांक्षा, अध्यात्मिक इच्छा इ. सर्वांसंबंधी आदर येथे अभिप्रेत आहे.

एका अर्थाने आजपर्यंतच्या साहित्याने ह्याच मूल्याची जोपासना व उपासना केली नाही काय ?

# संस्कृति आणि सौंदर्यमूल्यें



सौंदर्यमूल्यांची एक उपपात्ति—

सुसंस्कृत मनुष्याच्या मनोव्यापारांत सौंदर्यग्राहकता ही एक अत्यंत महत्त्वाची बाब आहे. नृत्य, संगीत, शिल्प, नाट्य, स्थापत्य, काव्य, चित्र, इ. ललितकलांतून सौंदर्याचें दर्शन वा आविष्करण प्रामुख्यानें होत असतें, व त्याचा आस्वाद घेणें ही सौंदर्य समीक्षकाच्या दृष्टीने अत्यंत मोलाची गोष्ट आहे. रसिकापुढे नेहमी विशिष्ट कलाकृतींतलें मोठेपण कशांत आहे? असा प्रश्न उत्पन्न होऊन त्याची मति क्षणभर कुंठित होतेहि. कलाकृतीच्या आस्वादाचे नियम अद्यापपावेतों तरी सर्वमान्य असे कांही प्रस्थापित झालेले दिसत नाहीत. प्रत्येक कलेंत 'तंत्र' म्हणून एक कांही भाग असतो. त्यांत त्या कृतींचें सौंदर्य व श्रेष्ठता समावलेली असते असा कित्येकांचा समज असतो. त्यामुळे कित्येक कलावंत आपली कृति तंत्रशुद्ध करण्याचा प्रयत्न करतात, तर कांही तथाकथित तंत्राचा धुव्वा उडवितात, व तरीहि कलाकृति श्रेष्ठ आहे असें रसिकांस मान्य करावयास लावतात. असें जरी असलें तरी मनुष्य समाजाने सौंदर्याची कांही एक उपासना केली आहे व तींतून कांही विशिष्ट मूल्यें गृहीत धरलीं आहेत असें

दिसतें. या ठिकाणी मानवांतर्गत सौंदर्यसमीक्षकाच्या दृष्टींतून सौंदर्यमूल्याच्या एका उपपत्तीचा उपन्यास करण्याचें योजिलें आहे.

मनुष्याच्या ठायीं सौंदर्यभावना ती कोणत्या अवस्थेंत असता निर्माण झाली हें अजमावणें कठीण आहे. परंतु 'पूर्व प्राचीन' (पॅलिओलिथिक) कालातील किंवा उत्तर प्राचीन कालांतील (निओलिथिक) अवस्थेंत मनुष्य जेव्हा गुहांतून रहात होता, तेव्हा त्याने गुहाच्या भिंतीवर काढलेली त्याच्या आसमंतातील पशूंची चित्रें आज उपलब्ध आहेत, त्यावरून असें दिसतें की, माणसाची सौंदर्यभावनेची भूक व तिच्या तृप्तीची वांच्छा इतकी जुनी आहे. त्यानंतर माणसाने गुरांना माणसाळावलें, बाळगलें, शेतीचा शोध लावला, भांडीं घडवलीं, शस्त्रें केलीं, गांव वसवलें, राज्य निर्मिलें, संस्कृति निर्मिली. यानंतर लिखित इतिहासास सुरवात झाली व तो सर्व भाग इतिहासाचा भाग म्हणून आपणापुढे आहेच.

## पहिलें सौंदर्य मूल्य, ठेका-लय—

ह्या सर्व गोष्टी करीत असतांना, ही सर्व प्रगति होत असताना माणसाच्या मधला सौन्दर्य समीक्षक आपलें कार्य करीत होता. प्रत्येक वस्तू उपयुक्त खरी पण त्याबरोबर ती सुंदर दिसावी अशी माणसाची मनीषा अगदीं प्रारंभापासून आहे असें म्हणावयास हरकत नाही.

अनुकरण हीं कलेची प्राथमिक दशा किंवा मूलावस्था आहे. सृजनशीलतेचा प्रत्यय माणसास अनुकरणानेच आला असावा. जीवनक्षेत्र जसजसें रुंदावत गेलें तसतसें अनुकरणाचें स्वरूप पुष्कळ संमिश्र होत गेलें, विकसित होत गेलें. घरें बांधणें, भाषा बोलणें, गाणें...इ. गोष्टी मनुष्य-अनुकरणानेच शिकलेला आहे. या अनुकरणाच्या विशिष्ट स्वरूपाशी जेव्हा कलावंताचें व्यक्तित्व एकरूपता पावतें तेव्हा ती कलाकृति कमनीय वाटते. मनुष्याच्या अनुकरणाचें क्षेत्र प्राण्यांच्या ओरडण्यापासून तों निसर्ग व्यवहारातील घटनापर्यंत इतकें व्यापक आहे, सौंदर्य-समीक्षकाचे दृष्टीने अनुकरणाचें पहिलें स्वरूप ताल किंवा ठेका, व त्यासंबंधींचें प्रेम हें होय.

सौंदर्यशोधक दृष्टीला निसर्ग-व्यापारांतील प्रथम कशाची प्रचीति आली असेल तर ती ताल-सौंदर्याची व त्या दृष्टीने सौंदर्य समीक्षणाच्या उपपत्तीतलें हें प्रथम मूल्य आहे असें म्हणावें लागेल. सर्व सृष्टींत विशिष्ट प्रकारची तालबद्ध पुनरुक्ति आहे. तालाचें मूळ हृदयाच्या स्पंदनाइतकें जीव-सृष्टींत खोल जाऊं शकेल. त्या दृष्टीने माणसाला ठेका लावण्यांत व तो लागलेला पाहण्यास व ऐकण्यास विशिष्ट गंमत वाटली असावी. हा ठेका कांही अवकाशानंतर पुनरुक्त व्हावा व त्यांतही आणखी कांही आनंद वसला असावा, व त्याची प्रतीति व्हावी ही ह्या टप्प्यातली दुसरी व्यवस्था म्हणतां येईल.

**पुनरुक्ति —**

पुनरुक्तिसुद्धां तालाइतकीच निसर्गसिद्ध आहे. सृष्टीवरील वातावरण जरी सदैव बदलतें असें असलें तरी विशिष्ट कालांत विशिष्ट ऋतु असावा, त्याला साजेसें हवामान, त्यानंतर होत जाणारा बदल, .. हा बदल पुन्हा त्याच क्रमानें परत पुनरुक्त व्हावा हा निसर्गांतला चमत्कार वा अनुभव वर्षानुवर्षे मनुष्याच्या मनावर कांही परिणाम करीत होता. माणसांतल्या सौंदर्य शोधकाला त्यांत एक विशिष्ट सौंदर्य सामावलें असावें अशी कल्पना आली. व ही पुनरुक्तीच निरनिराळ्या कलांतून व कृतींतून प्रतीत होते. काव्यांत चार वा दोन, वा अधिक ओळींचें कडव त्याची थोड्या बदलाने पुनरुक्ति हें काव्यांतलें स्वरूप एकामागून एक अशा अनेक कमानी किंवा खांब हें स्थापत्यातलें स्वरूप, संगीतांतही एकच तान थोड्याशा फरकानें पुनरुक्त होत असते. यांतील आनंदाचें रहस्य ह्यांतच आहे. नृत्य, नाट्य, इत्यादि कला व मनोव्यापार यांत पुनरुक्तीपासून माणसास खूपच आनंद होतो असें सिद्ध करतां येईल. चित्रकलेंत निसर्गाचें दृश्य अनुकरण सरळ होत असल्यानें पुनरुक्ती अव्यक्त स्वरूप घेते. शिवाय चित्रकलेचा क्रम प्रगतीच्या टप्प्यांत बराच पुढे लावावा लागेल. कारण चित्रकलेचें साहित्य माणसाच्या सुसंस्कृत अवस्थेंतच तयार होणें शक्य आहे. तेव्हा चित्रकलेंतील सौंदर्याचें स्वरूप गुंतागुंतीचें असणें किंबहुना किंचित् प्रगत असणें अपरिहार्य आहे. कृषिपूर्व अवस्थेंत चित्रकला निर्माण होणें शक्य नाही. तेव्हा ताल हें कृषिपूर्व संस्कृतीचें सौंदर्यमूल्य चित्रकलेंत स्पष्टतया व्यक्त होणें कठिण आहे.

मेळ ( मेलडी )—

पुनरुक्तीचें आकर्षण हें निसर्गसिद्ध आहे असें म्हणावयास हरकत नाही. लहान मुलें एखादी क्रिया त्यांना आवडली कीं तीच क्रिया पुनःपुनः कितीतरी वेळां करतात. मोठ्या माणसांना एवढी पुनरुक्ति पाहून कंटाळा येतो तथापि त्यांना मात्र येत नाही. असंस्कृत समाजांतहि पुनरुक्तीचें वेड विलक्षण असतें. १ त्या दृष्टीने पुनरुक्ति हें महत्त्वाचें सौंदर्यमूल्य ध्यावें लागतें. तथापि जसजशी सुसंस्कृत अवस्था बद्धमूल होत जाते, तसतसे इतर गोष्टीचें महत्त्व लक्षांत येऊं लागतें. पुनरुक्तीच्या अतिरिक्ततेंत मजा वाटत नाही. पुनरुक्तीमध्ये जर थोडी विविधता असली तर ती बरी वाटते. कारण अतिरिक्त पुनरुक्ति कंटाळवाणी होते. व हा कंटाळवाणेपणा घालविण्यासाठी म्हणून कांही विविधता आणली जाते व ह्या दोन पुनरुक्त गोष्टींत जी विविधता येते तिचें महत्त्व पटूं लागतें. कलेंत त्या मानाने विविधता येते व त्यायोगें कलाकृतीला एक प्रकारचें सौष्ठव येतें तशा प्रकारें या 'मेळा'ने (मेलडी) पुनरुक्तीच्या पुढे पाऊल पडतें. चित्रकलेंतलें उदाहरण घेतलें तर असें म्हणतां येईल की नुसत्या-चौकटी क्रमाने काढल्या तर पुनरुक्तीवर आधारलेल्या सौंदर्यकृतीची कल्पना येईल. परंतु अशा अनेक चौकटी पाहणें कंटाळवाणें होतें. मग त्या चौकटींत एखादा वर्तुळ दाखवावेंसें वाटतें, त्यायोगाने थोडी विविधता येते. व मग सर्व कलाकृति वेगळीच व सरस होऊं लागते. दोन किंवा चार ओळींची एक कविता व प्रत्येक ओळ एकाच चालीने म्हणणें ह्या योगें पुनरुक्तीवर आधारलेल्या सौंदर्याची कल्पना येऊं शकेल. परंतु या दोन ओळी वेगळ्या रीतीने म्हटल्या असतां अधिक बरें वाटूं लागतें.—चार ओळी असल्या तर चारीही ओळी वेगवेगळ्या रीतीने म्हणणें युक्त वाटूं लागते, परंतु प्रत्येक दोन वा चार ओळींच्या विभागा पुरतीच ही विविधता मर्यादित ठेवलेली असतें.—पुढे पुढे जेव्हा विविधतेचें अधिक वेड लागतें तेव्हा मग मध्ये एखादा 'अंतरा' असावासें वाटूं लागतें. या वरून पुनरुक्तींतही विविधता येऊन त्यावर आधारलेलें सौष्ठव कसें येते याची कल्पना येईल. पुनरुक्तीनंतर अशा मेळयुक्त सौष्ठवाची कल्पना येणें ही सौंदर्य समीक्षणाचे दृष्टीने पुढची व महत्त्वाची पायरी आहे असें समजावयास हरकत नाही.

## सौंदर्याची कृषिसंस्कृतींतील जोपासना—

मानवी संस्कृतीचा कृषि अवस्थेपर्यंतचा विकास होत असतां त्याच्या मधल्या सौंदर्य-समीक्षकाचा शोधही अविरत चालूच होता. पुढे माणसाने कृषि अवस्था स्वीकारली. त्यायोगें जीवनांत बरीच क्रांति झाली, त्यांत स्वास्थ्य आलें, सवड आली, बौद्धिक प्रगतीला वाव मिळूं लागला. तिला एक प्रकारचें सामाजिक अधिष्ठान मिळालें. संस्कृति आली. तीबरोबर गावें, देवळें, मनोरे, स्तूप, धर्मशाळा, धर्ममठ इ. गोष्टी आल्या व अनुषंगाने संगीत, नृत्य, शिल्प, स्थापत्य, नाट्य...इ. कलांचा पण खूप विकास होत गेला. ह्या सर्व प्रगतीचा टप्पा गांठीत असतां त्याची सौंदर्यभावना अधिकाधिक प्रज्वलित होत होती; व मनुष्याला एका मोठ्या थोरल्या सौंदर्यमूल्याचा शोध लागला. त्याने त्याचें सर्व जीवन व्यापून टाकलें. कला व इतर वस्तू यांत तेंच मूल्य प्रतीत होऊं लागलं. हा सौंदर्य शोध माणसाच्या सौंदर्य साधनेत अत्यंत महत्त्वाचा, सर्वस्पर्शी व चिरस्थायी असा म्हणावा लागेल.

कृषि—अवस्थेंत आल्यानंतर काही सामाजिक जीवन माणसाने निर्माण केलें. त्याबरोबर काही गुण—दोषांची पण शिदोरी त्याला बरोबर घ्यावी लागली व काही गुण-विशेष कलेच्या व सौंदर्याच्या प्रांतांत सुद्धा उत्क्रांत झाले. प्रमाणबद्धता, सुसंवाद ( हार्मनी ) हे व इतर गुण यांचें मूळ सामाजिक स्वरूपात आढळणे शक्य आहे. पुढे सौंदर्याच्या स्वतंत्र अस्तित्वाची स्पष्ट कल्पना मनुष्याला आली, पण त्याच्या टार्थीच्या, सत्य संशोधनाच्या प्रवृत्तीमुळे सौंदर्यविवेचनात ''मनोज्ञ'' भागास फार भर दिला गेला व कलेतल्या धार्मिक स्वरूपाला थोडें दुय्यम स्थान प्राप्त झालें.

## 'समप्रमाणता' वा 'सिमेट्री'—

तरीपण मोठ्या शोधाने त्याचे सर्व सौंदर्यजीवन व्यापलें. आपल्या कालापर्यंतची मूल्यें त्याच आधारावर उभारलेली दिसतील व हा मोठा शोध, वा मोठें मूल्य म्हणजे, ''सिमेट्री'' वा समबद्धतेचें अस्तित्व दृष्टीस येणें हा होय. ज्याप्रमाणे माणसाला, ठेका, ताल, पुनरुक्तिसौष्ठव या गोष्टी निसर्गात सांपडल्या, त्याचप्रमाणे माणसाच्या टार्यीच्या सौंदर्यशोधकतेला निसर्ग-सौंदर्यांतच हें मूल्य

पण सांपडलें. अगदी झाडाचें पान घेतलं तरी, त्याचा आकार पाहू लागलें असतां विशिष्ट प्रकारची समबद्धता असते. मग तें पान केळीचें, चिंचेचें, माडाचें, किंवा पिंपळाचें असो. त्यांतील समबद्धता ही अगदी उघड दिसणारी आहे. वनस्पती सृष्टीच्या पलीकडील प्राणिसृष्टि हीहि पण या समबद्धतेपासून अलिप्त नाहीं. स्वतःच्या शरीराचे बाबतीत माणसास या समबद्धतेला एक एक प्रकारची परिपूर्णता आली आहे असें वाटणें साहजिक होतें. दोन हात, पाय, डोळे व एकंदर शरीराच्या सजावटीत निसर्गानें अवलंबिलेली समप्रमाणता पाहून माणसांतला सौंदर्यशोधक नव्या मूल्यांच्या दर्शनाने वेडा झाला असेल, आणि या मूल्याचा परिणाम त्यचाया सौंदर्य कृतीवर दूरगामी होणें हेहि शक्य आहे व तो तसा झालाही.

### व्यवहारांतील वस्तू व सिमेट्री—

आपण आपल्या जीवनांतल्या हरएक गोष्टीकडे—मग त्या कलाकृती नसेनात का—पाहूं लागलो तर माणसाला किती मोठें मूल्य सांपडलें याचा प्रत्यय येईल. माणसाने उपयोगासाठी बांधलेलें घर, त्याच्या दाराच्या दोन फळ्या, खिडक्या, कमानी, छप्पर, बसावयास केलेली खुर्ची...इ. कितीतरी साध्या उपयुक्त गोष्टींपासून तो यांत्रिक युगातल्या मोटारी, आगगाडीच्या रचनेपर्यंत आपणांस माणसांच्या सौंदर्यसाधनेचें एक मूल्य टसटशीतपणें प्रतीत होईल व तें म्हणजे समबद्धता—सिमेट्री.

### कलाकृति व सिमेट्री—

व्यवहारांतली ही उदाहरणें सोडून कलाकृतीकडे जरी दृष्टी टाकली तरी हेंच लक्षात येतें. आपल्या स्वतःच्या सौंदर्यानें जगांत ख्यात असलेला 'ताजमहाल' या समबद्धतेच्या दृष्टीने पुन्हा एकदां अवश्य पाहण्यासारखा आहे. कितीतरी विविध प्रकारांनी, मार्गांनी ही समबद्धता साधली आहे असें आढळून येईल. कुठे न कशाप्रकारची सिमेट्री साधावयाची हें कलावंतच जाणे. जगांतल्या सर्व स्थापत्यकृतींत हाच प्रकार आढळतो. सौंदर्याच्या या मोठ्या थोरल्या मूल्याची पूजा कलावंतांनी आजपर्यंत केली आहे असें म्हणावयास हरकत नाही जगांत गाजलेल्या स्थापत्यकृती—आपल्या देशांतील व विदेशातीलहि—या

दृष्टीने पुन्हा एकदा अवश्य पाहण्यासारख्या आहेत. देश वेगळा असो, संस्कृति वेगळी असो. कलाकृतींत समबद्धता हें तत्त्व सर्वप्रतीत आहे असें दिसून येतें.

**साहित्यांतील—**

समबद्धतेचा प्रत्यय मनुष्याच्या दृश्य सौंदर्याची कल्पना आल्यानंतरच होणें शक्य आहे. कृषिसंस्कृतीच्या अवस्थेंत मानसिक विकास झपाट्याने झाला, त्याच्या संस्कृतीच्या पसारा जसजसा वाढला तसतसें ह्या समबद्धतेच्या आविष्काराचें स्वरूप पण व्यापक होत व वाढत गेलें आणि संगीत नृत्य, काव्य. इ. कलेंतही त्याचें स्वरूप अवतीर्ण होऊं लागलें. अर्थात् तें बरेंच अस्पष्ट असणें अपरिहार्य आहे. मुळीच नाहीं असें म्हणतां येणार नाही. या कालांत मानवी मनाच्या तरल भावनांचें आविष्करण होत असल्याने सिमेट्रीचें स्वरूप उघड करून दाखवणें कठिण आहे. वाङ्मयाचें उदाहरण घेतलें तर असें म्हणतां येईल की, कथेंत नायक नायिका, नायक मित्र, नायिका मैत्रीण, सुष्टपात्र, खलपात्र, मुख्य कथानक, उपकथानक, इ. गोष्टी या समबद्धता सुचवीत नाहीत काय ? चित्रकलेंत प्रामुख्याने जरी अनुकरण [ निसर्गाचें ] दिसत असलें तरी त्या कलेला आजच्या यांत्रिक युगांत विशेषतः मुद्रणकलेचें जें साहाय्य होत आहे, व मुद्रणसौंदर्य म्हणून कांहीं दृश्य कला निर्माण होत आहे तिचा आत्मा आतापर्यंत तरी ही समबद्धता होती असें आढळून येईल. आज चित्रकलेंत व सर्वत्र दृश्य कलांत सौंदर्यमूल्याचें दृष्टीनें खूप क्रांति झाली आहे—होत आहे,— नवीं नवीं सौंदर्यमूल्यें प्रकाशांत येत आहेत. त्यापैकी यापुढचें सौंदर्य मूल्य पाहावयाचें आहे. तत्पूर्वी थोडी सामाजिक स्थित्यंतराची कल्पना देणें आवश्यक आहे.

कृषिअवस्थेंत मानवी समाजाने खूप काल कंठला आहे. गेलीं ४—५ शतकें नवी उद्योगसंस्कृति वर्धमान पावत आहे. या संस्कृतीने सौंदर्याचीं आजपर्यंत तरी जुनींच मूल्यें स्वीकारलीं होतीं असें दिसतें. परंतु या उद्योग संस्कृतीबरोबर, एकंदर जीवनाचा रागरंग बदलला, जीवनाच्या गतिशीलतेचा वेग वाढला, कलावंत व कलाप्रेमी लोकांस त्याची कल्पना अधिक तीव्रतेने आली. मध्यमवर्ग

निर्माण झाला, त्यांतून हे लोक पुढे येऊं लागले. जीवनांतील कृषिसंस्कृतीप्रणीत स्थिरता जाऊन अस्थिरता, घाई, गर्दी झाली, जीवनकलह तीव्र झाला. त्याबरोबर भव्य पुतळे, प्रसाद, महाकाव्यें, दीर्घ कादंबऱ्या, नाटकें इत्यादि गुरुताप्रधान कृती मागे पडून मानवी कलात्मकता निरनिराळ्या त्रुटित रूपांनी व निरनिराळ्या प्रकारानी व्यक्त होऊं लागली. साहजिकच मानवांतर्गत कलात्मकतेला समबद्धतेचें जुनें मूल्य अपुरें वाटूं लागलें, थिटें वाटूं लागलें, गतिहीन वाटूं लागलें. व त्यापेक्षा अधिक गतिशील, जीवननिष्ठ, व्यापक सौंदर्यतत्त्व असावें याचा शोध चालू झाला.

**समबद्धतेच्या पलीकडे—**

निसर्गात पुष्कळ ठिकाणी समबद्धता आढळली तरी समबद्धतेच्या पलीकडे विशाल सौंदर्य विनटलें आहे असें मनुष्याला आढळून आलें. झाडाच्या पानाच्या आकार सौष्ठवांत जरी समबद्धतेचा प्रत्यय येत असला तरी झाडाच्या एकंदर पसाऱ्यांत तें आहे असें पटेना; व एकंदर झाडाचा आकार मात्र मानवी दृष्टीला सौंदर्यपूर्ण वाटला. अंधाऱ्या रात्रींचें तारकांचें नृत्य पण मनास साद घालूं लागलें. पण त्यांत कुठें होती समबद्धता ? उलट रांगोळ्यांतील ठिपक्याप्रमाणे जर एखादा कलावंत चांदण्या दाखवूं लागला तर तें चित्र सौंदर्य–निदर्शक खात्रीने होणार नाही. कोणताही आकार नसलेला मेघ व इतर दृश्यें यांनी माणसाचा या सौंदर्यमूल्यावरच विश्वास उडवला व यापेक्षा व्यापक मूल्यासाठी त्याचा शोध सुरू झाला.

**नवें मूल्य : तूल्यमूल्यता, बॅलन्स वा समतोलत्व—**

आणि या शोधांत त्याला ह्या कालानुरूप एका मोठ्या सौंदर्यमूल्याचा व त्याचे अनुषंगाने जीवनमूल्याचा शोध लागला व तें मूल्य म्हणजे, तूल्यमूल्यता, समतोलत्व ( बॅलन्स ) होय.

**जीवनांतर्गत स्वरूप—**

जीवनांत पदोपदीं आपणांस तोल संभाळावा लागतो, हें थोड्या उदाहरणांनी पटण्यासारखें आहे. चालण्यासारख्या साध्या कृतींत आपण तोल अजाणता संभाळीत असतों. आहारशास्त्री आपला आहार समतोल असावयास हवा

असे सांगतील, तर अर्थशास्त्री आपलें अर्थजीवन समतोल हवें असें म्हणतील. सृष्टि-व्यवहाराच्या मागें असणाऱ्या कार्यकारणपरंतेंतही हेंच तोलाचें तत्त्व आहे असें आढळून येईल. गुरुत्वाकर्षणाच्या योगाने पृथ्वी सूर्याकडे आकर्षित झालेली असली तरी पृथ्वीच्या ठायी जी 'गुरुता' आहे, तीमुळे जो तोल साधला आहे त्या योगेंच आपलें जीवन सह्य व शक्य झालें नाही काय? उलटपक्षी असा तोल थोडासा गेला तर मोठमोठे उत्पात घडत नाहीत काय? भाषा हें जें सामाजिक हत्यार माणसाने निर्माण केलें त्याने सुद्धां माणसाच्या ठिकाणच्या अभिव्यक्तीला एक प्रकारचें समतोलक स्वरूप दिलें असें म्हणतां येईल.

"तोल हे जीवनांत आढळणारें तत्त्व आहे. असें क्षणभर मानता येईल. पण कलेंत त्याचा बडेजाव गाजें कितपत शक्य वा समर्थनपर ठरेल हा प्रश्न आहे," अशा स्वरूपाची शंका निघणें साहजिकच आहे. तथापि आपल्या काळाच्या गतिमान संस्कृतीचें तें गतिमान सौन्दर्य-मूल्य आहे हें येथें दिग्दर्शित करावयाचें आहे.

**कलाकृतींत—**

किंचित् सूक्ष्म दृष्टीने पाहूं गेलें तर "समबद्धतेंत" ही हेंच तत्त्व पाळलें गेलें नाही काय? हात पाय इत्यादि अवयवांची समानता निरनिराळ्या स्वरूपाचा तोल साधण्याचा प्रयत्न करीत नाही काय? व नुसत्या समतेपलीकडे त्यांत जी परस्पर पूरकता आहे तीमुळें एक प्रकारचा तोल साधला आहे असें दिसून येईल. स्त्री आणि पुरुष यांच्या देहठेवणीपासून तों मानसिक प्रकृतीपर्यंत एकप्रकारची परस्पर-पूरकता आहे असें मान्य करावें लागेल. निसर्गाने हें जें तुल्यमूल्यत्व साधले आहे त्याचें स्वरूप गतिशील आहे, त्या दृष्टीने समानबद्धता ही अगतिशील (स्थायी) तुल्यमूल्यता आहे असें म्हणणें योग्य होईल.

या तुल्यमूल्यत्वाचें किंवा समतोलाचें कलेंतलें स्वरूप व्यक्त करून दाखवणें कठीण आहे. परंतु कांही उदाहरणांनी पटावयास हरकत नाही. माणसाच्या मनात ज्यावेळी एकादा विचार, भावना, कल्पना इ. उत्कटत्वाने येते त्यावेळी, तिला पूरक अशी किंवा तुल्यमूल्य अशी दुसरी भावना माणसाच्या

मनांत सुप्त पण तितक्याच प्रभावी रीतीने उत्पन्न होत असते. व या दोन भावनांचें तूल्यमूल्यत्व कलाकृतींचे द्वारें कधी कधी व्यक्त होत असतें. अतीव आनंदाच्या क्षणीं माणसाच्या मनांत कुठेंतरी हुरहूर असते, व अतीव दुःखाच्या क्षणीं कुठेतरी विरंगुळा वाटत असतो. ही वस्तुस्थिति थोडीबहुत प्रत्येकाच्या परिचयाची आहे. या परस्परांशी विरोधी भासणाऱ्या पण तूल्यमूल्य असणाऱ्या अशा गोष्टी आहेत. त्यांना कृतीत-मग ती कोणतीहि ललित कला असो-योग्य अभिव्यक्ति मिळाली पाहिजे व असें होणें हें कलेचें नवें मूल्य आहे.

उदाहरणें द्यावयाचीं झालीं तर कांही देता येतील. कंठ-संगीताला वाद्यांची विशेषतः तबल्यासारख्या वाद्याची जोड का लागली? हा समतोल साधण्याचा प्रकार आहे. सिनेमा जगात 'पार्श्व-संगीत' म्हणतात तें त्या क्षेत्रातलें तूल्यमूल्यतेचें आविष्करण, नाट्यांतली तूल्यमूल्यता अत्यंत गतिशील-प्रभावी, व मनोज्ञ आहे. शिल्प इत्यादि दृश्यकलांत तूल्यमूल्यतेचें स्वरूप कृती-परत्वें भिन्नभिन्न होईल. स्थापत्य शास्त्रात आपण स्थिर अशा समबद्धतेच्या पलीकडे फारसें गेलों नाही. पण पाश्चात्य देशांत व त्याच्या योगानें आपल्या देशांत छोट्या प्रमाणांतील घरें इत्यादींहि व्यक्त होत आहे, असें दिसून येईल. अशी राष्ट्रीय स्वरूपाची कृति आज तरी आपणाकडे नाही.

### चित्रकला—

चित्र इ. दृश्य कलातील तत्त्वांच्या उदाहरणाने हें विवेचन सुस्पष्ट करतां येईल. रंग व रेखांच्या साहाय्याने विविध गोष्टींचें अविष्करण करीत असतां फार सुंदर रीतीने कलाकार हा विविध प्रकारचा 'तोल' साधतो. चित्रकला ही दृश्य कला असल्याने तिच्यांतलें सौंदर्य, रंग प्रकार, सजावट-यातील सौंदर्य-मूल्यांवर अवलंबून असतें. या प्रत्येकांत वेगवेगळा तोल साधलेला आहे असें सूक्ष्मतेने पाहिलें असतां दिसून येतें. साधारणपणें मनुष्याच्या ठायींची उत्स्फूर्तता चित्रकलेंत वा दृश्य कलांत उभ्या व उंच (व्हर्टिकल) रेषांनी, आकृतींनी व्यक्त होते. आपल्या ठायींच्या अतीव उत्स्फूर्ततेचें प्रतीक-या कालास योग्य असें आपण राष्ट्रध्वज समजतों, व तो उंच असावा ही भावना आपली जागृत

असते. व्यवहारांत तिचें व्यक्तिकरण उंच स्तंभ, काठी, यांनी होतें. चित्रकलेंत उभ्या रेषांनी होतें. याच भावनेला तूल्यमूल्यत्व आणणारी अशी दुसरी भावना मनुष्याच्या ठायीं असते व ती म्हणजे शांतता-प्रवणता. ही चित्रकलेंत आडव्या रेखांनी व्यक्त होते व प्रत्यक्ष व्यवहारांत तसेंच प्रतीक घ्यावें लागते.

सपाट मैदानांत वा समुद्रकांठीं एका विशिष्ट प्रकारच्या शांततेने भरून येतें हें प्रत्यक्षांतलें उदाहरण आहे. या दोन परस्पर पूरक ( राष्ट्रीय दृष्टीने ) भावनांचा समतोल विशेषतः राष्ट्रीय स्वरूपाच्या कृतींनी ( कल ) दर्शविला जातो. चित्रकलेंत हें तुल्यमूल्यत्व रंग, रेषा, त्या रंगांनी, रेषांनी व्यापलेली जागा, मोकळी जागा,... विशिष्ट आकार इ. प्रकारांनी दर्शविण्याचा चित्रकाराचा यत्न असतो व त्या त्या तूल्यमूल्यता पाहाणें हें रसिकास अधिक मनोहरी वाटतें.

### साहित्य व तूल्यमूल्यत.—

शेवटीं साहित्याच्या क्षेत्रांतील तूल्यमूल्यतेच्या स्वरूपाचा विचार करावयाचा. इतर ललितकलांबरोबरची एक ललितकला म्हणून साहित्याचा उल्लेख प्रामुख्याने होत असला तरी, एका दृष्टीने साहित्य ही संपूर्ण वेगळी व स्वयंपूर्ण ललित-कला मानावी लागेल. इतर ललितकलांमधून प्रामुख्याने भावनाविष्कारास प्राधान्य मिळतें तर ह्या कलेंत भावनांइतकें विचारांसही महत्त्व आहे असें आढळून येईल. सृजनशील साहित्य जरी तपासलें तरी तें केवळ भावनागर्भ असतें असें म्हणणें न्यायाचें होणार नाही व त्या विचारांनी " रसात्मकं वाक्यं काव्यं " ही काव्यव्याख्या बदलूनहि घ्यावी लागेल. दुसरें साहित्याचें व्यवच्छेदक लक्षण असें कीं, इतर कलांतून जीवनाची गतिशीलता तितक्या उत्कटत्वाने प्रतीत होत नाही. महाकाव्य, कादंबरी, नाटक, इत्यादि दीर्घ वाङ्मयप्रकारांत ताल, पुनरुक्ति... इत्यादि प्राथमिक सौंदर्यमूल्याचें प्रामुख्याने दर्शन होतें. परंतु आधुनिक संस्कृतीचें प्रतीक म्हणून जे कथा, नाट्यछटा, भावगीत, सुनीत, लघुनिबंध, नाट्यगीत... इत्यादि लघुताप्रधान वाङ्मयप्रकार आहेत त्यांत कोणत्यातरी ' एका ' गोष्टीचें परिणामकारक रीतीने आविष्करण केलें असावें. अशी अपेक्षा असते. त्या दृष्टीने स्वभाव चित्र, अनुभव, विचार, घटना, प्रसंग, भावना... इत्यादिपैकीं 'एका'चें अभिव्यक्तिकरण अपेक्षित असते वा असावें. काव्यांत ध्वनि

किंवा कलेंत सूचकता हा जो प्रकार आहे तो समतोलत्व राखण्याचाच एक मार्ग आहे. सुनीताचे बाबतींत रचनेच्या दृष्टीने समतोलाचें स्वरूप अधिक स्पष्ट आहे. त्याच्या पहिल्या आठ अगर बारा ओळींतील विचार, भावना, कल्पना, अनुभव इ. यांना समतोल व पूरक वा कलाटणी देणारी अशी भावना, कल्पना इ. शेवटच्या सहा किंवा दोन ओळींत आणून विशिष्ट परिणाम आणण्यांत हें समतोलाचें वा तूल्यमूल्यतेचें तत्त्व प्रतीत होतें. कथा, निबंध, भावगीत इत्यादि साहित्य-प्रकारांतील हें समतोलाचें तत्त्व अत्यंत गतिशील असतें. आणि कोठें कोणत्या प्रकाराने तोल साधला आहे तें एका ठराविक ठशांत बसवून सांगणें अत्यंत कठीण असतें.

साहित्य क्षेत्रांत या तूल्यमूल्यतेच्या तत्त्वाचें आणखीहि एक स्पष्टीकरण होऊं शकेल. निरनिराळ्या प्रकारच्या तूल्यमूल्यतेने जीवन व्याप्त झालें आहे याचा उल्लेख वर आला आहे. अशाप्रकारें जीवनव्यापी हें तत्त्व आहे असें मान्य झालें तर साहित्यांतील सुखांतिका आणि दुःखांतिका यांचेकडे वेगळ्या दृष्टीने पाहातां येईल. म्हणजे जीवनांत समतोल कसा सुरेख राखला गेला आहे हें एकाद्या आनंदप्रधान कृतीने कलावंत सांगेल. उलट समतोलता नष्ट झाली, तर काय उत्पात होतात हें एखाद्या दुःखांतिकेच्या आधारें कलावंत सांगू शकेल. एखाद्या कृतींत समतोल हा वरवर पाहिलें असतांना दिसण्याइतका स्पष्ट असेल तर कांही कृतींत तो जाणून घेण्यास जरा प्रयत्न करावा लागेल.

सुसंस्कृततेबरोबर आधिकाधिक सूक्ष्म व अल्प वेद्य अशा भावनाविचारांच्या आविष्करणाची आवश्यकता तीव्रतेनें भासूं लागते, त्यावेळीं भाषा अपुरी पडते अशी जाणीव होते. अर्थात कलावंताला आपलें मनोगत कोणत्या तरी प्रतीकाच्या द्वारें सांगावें लागतें. व त्या दृष्टीनें प्रतीक म्हणजे एक प्रकारें तुल्यमूल्यतेचा आविष्कारच होय. शेवटी तोलाशी संबंध असणाऱ्या तराजूचें उदाहरण घेता येईल. वाण्याची तागडी, स्प्रिंगचा ताजवा व स्टेशनवर अवजड गोष्टी मोजणारा विशिष्ठ कांटा. यात निरनिराळ्या गोष्टींचें तोलमाप केलें जातें—पण तें कसें अप्रत्यक्ष होत जातें हें या दृष्टीने पाहणें बोधप्रद आहे. कलेंतील तोलाचा प्रकार असाच आहे. साहित्यासारख्या बहुपैलूयुक्त कलेंत तर त्याचे

स्वरूप अक्षरशः बहुविध व्हावें, मनोज्ञ व्हावें, यांत नवल कसलें ? साध्या एका भावगीतांत भाव, विचार, कल्पना, रचना, ताल, रूपक, प्रतीक इ. प्रकारचा वेगळा तोल साधला आहे असें आढळून येईल. कित्येक वेळां, विशिष्ट स्वरूपांत तोल न साधतां आल्याने कलाकृतीन वैगुण्य आलें आहे असें आढळून येईल वा दाखवून देतां येईल.

## कलाकृतीचें सौंदर्य हें वस्तुनिष्ठच—

मनुष्याच्या ठिकाणच्या सौंदर्यग्राहकशक्तीला निरनिराळी मूल्यें निरनिराळ्या काली कशी प्रतीत होत गेलीं, व आपल्या कालचें सौंदर्य-मूल्य कोणतें हें दिग्दर्शित करण्याचा हा प्रयत्न केला आहे. हा कलाकृतीकडे ऐतिहासिक दृष्टीने पाहण्याचा प्रयत्न केला आहे. आजपर्यंतची सर्व मूल्यें निरुपयोगीं झाली व खोटी ठरलीं असा याचा अर्थ वा निष्कर्ष नव्हे. तर आजच्या गतिशील युगाचें गतिशील सौंदर्यमूल्य कोणतें असेल हें सुचविलें आहे. या दृष्टीने निरनिराळ्या कलांचें व साहित्यांतील कलाकृतींचें मूल्यमापन आवश्यक असलें तरी येथे शक्य नाही. सौंदर्य—विशेषतः मानवकृत कलाकृतीचें सौंदर्य,—हें वस्तुनिष्ठच असतें असे येथें गृहीत धरावें लागलें आहे. व म्हणूनच ही मूल्यांची उत्क्रांति संभवली आहे. तेव्हां सौंदर्यानंदाची मीमांसा करण्याचा प्रयत्न नसून एक मूल्य किंवा एका दृष्टिकोनांतून मूल्यपरंपरा विशद करण्याचा प्रयत्न आहे. सौंदर्यमूल्यें जीवनांतून कशीं निर्माण झाली ती आकाशांतून आलेली नाहीत हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. व त्या अनुषंगाने विवेचन शास्त्रीय करण्याचा हा एक खटाटोप. त्यातील ग्राह्यग्राह्य भाग हा रसिकांनी, कलावंतानी किंवा तज्ज्ञानी किंवा त्यांच्या मदतीने ठरवावयाचा वा टरावयाचा आहे. रसिकांस नसलें तरी कलाकारास हें विवेचन चिंतनीय वाटण्याचा संभव आहे. त्यांच्या कृतींत कलात्मकतेच्या दृष्टीने अधिक हेतुपुरस्सरता येणें शक्य आहे.

———

# कांही साधन ग्रंथ

| | | |
|---|---|---|
| डॉ. केतकर | ... | ज्ञानकोश खंड ५. |
| | | महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण. |
| डॉ. वाटवे | ... | संस्कृत काव्याचें पंचप्राण (प्रस्तावना) |
| आचार्य जावडेकर | ... | पुरोगामी साहित्य |
| | | आधुनिक राज्यमीमांसा. |
| प्रा. माटे | ... | विज्ञान बोधाची प्रस्तावना |
| पेंडसे लालजी | ... | साहित्य आणि समाजजीवन |
| आचार्य भागवत | ... | जीवन आणि साहित्य |
| साने गुरुजी | ... | कला म्हणजे काय ? |
| सुंठणकर बा. रं. | ... | महाराष्ट्रीय संतमंडळाचें कार्य |
| जोशी लक्ष्मणशास्त्री | ... | हिंदु धर्माची समीक्षा |
| डॉ. देशमुख | ... | मराठीचें साहित्यशास्त्र |
| डॉ. वाटवे | ... | रसविमर्श |
| प्रा. रा. श्री. जोग | ... | सौंदर्यशोध आनंदबोध. |
| | | अभिनव काव्यप्रकाश |
| प्रा. द. के. केळकर | ... | संस्कृति–संगम |
| | | काव्यालोचन, साहित्य विहार, |
| श्री. न. चिं. केळकर | ... | सुधारणा, सुख, सदाचार |
| | | साहित्य व संस्कृति खंड. |
| प्रा. श्री. कृ. क्षीरसागर | ... | वाङ्मयीन मूल्यें |
| श्री. पु. य. देशपांडे | ... | नवी मूल्यें |
| वि. का. राजवाडे | ... | प्रस्तावना ई. इ. |
| प्रा. रा. शं. वाळिंबे | ... | साहित्याचा ध्रुवतारा |
| वा. म. जोशी | ... | विचार सौंदर्य |
| | | विचार विहार |
| प्रभाकर पाध्ये | ... | कलेचीं क्षितिजें |
| प्रो. कवीश्वर | ... | नीति व कलोपासना |
| प्रो. फडके | ... | प्रतिभासाधन |
| | | साहित्य व संसार |

| | | |
|---|---|---|
| Durant W. | .... | Story of Civilization |
| W ells H. G. | .... | Outline of:History |
| Randall | .... | Creative Centuries |
| Cazamian | .... | English Literary History |
| Davies | .... | World History |
| Robertson A. | .... | Morals in World History<br>An essay in Humanism |
| S. Stabbing | .... | Ideals & Illusions |
| Henderson P. | .... | Literature & Changing Civilization |
| Routh H. V. | .... | Literature & ideas in the 20th Century |
| Read H. | .... | Art & Society |
| Nehru J. | .... | Glimpses of W. History<br>Discovery of India |
| Selsam | .... | Ethics of Socialism |
| E. H. Carr | .... | Soviet Impact. |
| T. Paine | .... | Rights of Man<br>Age of Reason |
| M. Colon | .... | From these Roots |
| Richards I.A, | .... | Principles of Literary Criticisn. |
| Caudwell C. | .... | Illusion & Reality |

# सूचि

—:०:—

## शुद्धिपत्रक

[ कितीहि प्रयत्न केला तरी मुद्रजदोष राहिलेच आहेत. कित्येक टाईप उडाले असून कित्येक स्पष्ट आलेले नाहीत. लेखकास याबद्दल विषाद वाटत असून वाचकांनी त्याबद्दल कृपया क्षमा करावी. प्रमुख दोषांचा येथें उल्लेख करतों. ]

| पृष्ठ | ओळ वरून | ओळ खालून | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|---|
| २७ | १२ | | म्हणजे | म्हणचे |
| | | ५ | पूर्णपणें | षूर्णपणें |
| ३१ | | ४ | हें एक | एक हें, |
| ३० | ७ | | मुद्रण-पूर्व साहित्य-मूल्य, रस— | मुद्रण-पूर्ण साहित्य, मूल्य-रस — |
| ३१ | १५ | | 'ध्वनि'चें आधुनिकत्व | 'ध्वनि'चे आधुनिकत्व |
| ४२ | | १० | महत्त्वाचें | महत्वाचें |
| ४३ | ३ | | वास्तवतेचीं-बीजें- | वास्तवतेची बिजे— |
| ४३ | ४ | | झालें, तरी | झालें तोच |
| ४५ | | ८ | प्रवृत्ति, आभिरुचि, प्रयोजन, | प्रवृत्ती,आभिरुची.प्रयोजन |
| | | ४ | सर्वंकष | सर्वंकर्ष |
| ४७ | | ३ | क्षेत्रांत | क्षत्रांत |
| ४८ | १० | | वाढलें | वाटलें |
| ४९ | | १३ | मनोविश्लेषण— | मेनीवश्लेषण— |
| ५२ | | १ | कर्तव्याची | कर्तृत्वाची |
| ५९ | ८ | | संबोधूं. | संबोधूं |
| ६१ | १० | | आणली | आणल |
| ७४ | १ | | साहसे श्रीः प्रतिवसति— | साहसे श्री प्रतिवसति— |
| ७५ | ५ | | की, जे खरोखर— | की, खरोखर— |
| ७६ | १२ | | युरोपीय | युरोपीव |
| ७६ | | १२ | वैशिष्ट्यें | वैशिष्टें |
| ७७ | १० | | उद्भव | उम्दव |
| ७७ | ११ | | ॲरिस्टॉटल् | ॲरिस्टॉटलु |

| पृष्ठ | ओळ वरून | ओळ खालून | शुद्ध | अशुद्ध |
|---|---|---|---|---|
| | ११ | | विश्रुत | विश्रत |
| ९३ | १४ | | रसव्यवस्थेंत | रसचर्चेत |
| ९४ | | १ | जन्म झाला. | जन्म झाला |
| ९९ | | ९ | सापेक्षता वाढली. | साक्षेपता वाढला. |
| १०५ | ३ | | कांहींची | कांहीची |
| १०९ | ३ | | होण्यांत झाला. | होण्यांत, झाला. |
| | | ९ | रुजूं लागून | रुजू लागून |
| १११ | | ६ | म्हणजे साहित्य जीवनासांगातीं | म्हणजे जीवनासांगातीं |
| ११२ | | ११ | क्लासिसिझम | क्लासिसिसम |
| १२३ | | ६ | आनंद हें | आनंद ह |
| १२४ | | ३ | त्यामुळे | त्यामुळ |
| १२५ | १० | | पुनर्मूल्यीकरण | पुनर्मूयीकरण |
| १२५ | | ७ | असते. | असतें. |
| १३६ | ८ | | एक्प्रेशनिझम | एक्स्प्रेनिझम |
| १३८ | | १० | व्यक्तित्वाला—व्यक्तिस्वातंत्र्याला | व्यक्तित्वाला व्यक्तिस्वातंत्र्याला— |
| १४५ | ८ | | होण्यात | होण्यात |
| १५० | | १२ | ओळींचें कडवें | ओळींचें कडव |
| १५१ | ५ | | १ हा आकडा नको. | ... |
| | ६ | | तसतसें | तसतसे |
| | १२ | | येते, व त्यायोगें | येते थ त्यायोगे |
| | | १२ | एखादें वर्तुळ | एखादा वर्तुळ |
| | | ३ | सौष्ठव | सोष्ठव |
| १५३ | ६ | | दोनहात, | दोन हान |
| | ९ | | मूल्याचा | मूयाचा |
| १५४ | ७ | | संस्कृतिचा पसारा | संस्कृतिच्या पसारा |
| १५५ | ३ | | पुतळे, प्रासाद | पुतळे. प्रसाद |
| १५६ | ५ | | ती योगेंच | त्या योगेंच |
| १५८ | ७ | | (कला) कृतींनी | कृतींनी (कल) |